# डॉ. माधवराव पटवर्धन: वाङ्मय-सूची

(वर्णनात्मक व समीक्षात्मक)

-सु. रा. चुनेकर





# डॉ. माधवराव पटवर्धन : वाङ्मय-सूची

वर्णनात्मक व समीक्षात्मक

डॉ. माधवराव पटवर्धनांचे वाङ्मय
डॉ. माधवराव पटवर्धनविषयक वाङ्मय

सु. रा. चुनेकर




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ
१९८३

प्रकाशक
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

मुद्रक
चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय
'शिव-पार्वती',
४६१/४ सदाशिव पेठ
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०

सुरेश रामकृष्ण चुनेकर, १९३६–

वेष्टन
श्री. ईश्वर दिवे

पहिली आवृत्ती
२९ नोव्हेंबर १९८३
( डॉ. माधवराव पटवर्धन पुण्यतिथि )

पृष्ठे : बत्तीस + १८०
किंमत : ४० रुपये

कोलन वर्गीकरण पद्धति क्रमांक 0155, 1 M 94a
डेसिमल वर्गीकरण पद्धति क्रमांक 016.891 461
891.461 016

ती. बाप्पा ( रा. वि. म. ) यांना

तुमच्या व माधवरावांच्यातील मैत्रीच्या
आपल्यामधील पुनर्जन्मास –

## पु र स्का र

संगमनेरच्या संगमनेर महाविद्यालयात काही निमित्ताने मी गेलो असता एका योगायोगानेच डॉ. चुनेकरांची भेट झाली. डॉ. माधवराव पटवर्धन यांचे वाङ्मय व त्यांच्याविषयीचे वाङ्मय यांची वर्णनात्मक व समीक्षात्मक विस्तृत सूची त्यांच्याकडे तयार असल्याचे व ती अप्रकाशित असल्याचे तेव्हा मला समजले. अशा प्रकारची सूची प्रकाशित होणे मला आवश्यक वाटले. आज ती प्रकाशित होण्याचा योग येत आहे. साहित्याच्या अभ्यासाला व विकासाला अशा सूची जेवढ्या होतील तेवढ्या व्हावयास हव्यातच. अशा प्रकारच्या सूची या कोणत्याही अभ्यासाचा पाया आहे, प्रारंभबिंदू आहे. सूचींच्या योगाने इतर अनेक अभ्यासकांचा वेळ व श्रम फार वाचतात, आणि अधिक सूक्ष्म, सखोल अभ्यासाच्या, चिंतनाच्या पुढच्या टप्प्याला ते मोकळे राहातात. एकेका विषयाच्या, वाङ्मयप्रकाराच्या, ग्रंथकाराच्या, ग्रंथाच्या... अशा अनेकानेक सूची वैपुल्याने निर्माण व्हावयास पाहिजेत. अशा विभागीय सूचींतूनच पुढे बृहद्‌सूची सिद्ध होते. मराठीमध्ये अशा सूची अपवादालाच आहेत. डॉ. चुनेकरांची प्रस्तुत सूची प्रकाशित करण्यामध्ये मंडळाचा एक हेतू हाच आहे की, अशा प्रकारच्या सूची तयार करण्यास इतर अभ्यासकांना प्रेरणा व प्रोत्साहन मिळावे. मंडळाने आजवर मराठी वाङ्मयकोश, शब्दकोश, नियतकालिकांची सूची यांसारखे उपक्रम अंगीकृत केले. त्यांपैकी काही पूर्णही झाले. त्याच धोरणाने या, एका, आधुनिक मराठी साहित्यातील प्रमुख साहित्यिकावरील समावेशक सूची मंडळ प्रकाशित करीत आहे.

अशा प्रकारचे साधनसाहित्य निर्माण होणे आवश्यक; पण ते कष्टाचे व किचकट, म्हणून त्याच्याकडे फार कमी अभ्यासक वळताना दिसतात. अशा कामाला सामान्य मान्यताही सहसा कमी मिळते. बाह्य प्रेरणेपेक्षा, स्वतःला महत्त्व पटले म्हणून, स्वतःच नादिष्टपणाने करीत राहावयाचे हे काम आहे. सूचिकार्य हे यांत्रिक कार्य म्हणूनही, अगदी अनेक जाणत्या समजणाऱ्यांचाही समज असलेला दिसतो. पण तो सर्वथैव अयथार्थ आहे. सूचिकार्यात संशोधकीय शिस्त, सचोटी, तशीच समीक्षेची सूक्ष्म जाण अवश्य असावयाला हवी. सूची करताना कर्त्याच्या कष्टांचा, चिकाटीचा तर

कस लागत असतोच, पण एखाद्या ग्रंथाची कमीत कमी अवकाशात यथार्थ ओळख करून देण्यात, किंवा एखाद्या मोठ्या लेखाचे सार नेमके, मोजक्याच शब्दांत सांगण्यात त्याची मर्मग्राहिता, सूक्ष्म समीक्षाबुद्धी यांचीही कसोटी लागत असते. सर्व लेखनाचा परस्पराशी अन्वय लावताना त्याला अतिशय सावधान असावे लागते. अचुकपणाचा, काटेकोरपणाचा आग्रह हे अशा सूचीचे प्राणतत्त्व असते. सूची जेवढी अचूक, तेवढे तिचे मोल, तेवढी तिची खरी मौज. अन्यथा ती वायाच गेल्यासारखी. प्रस्तुत पटवर्धन-सूचीची परीक्षाही याच निकषावर व्हावी.

प्रस्तुत सूचीत डॉ. माधवराव पटवर्धन यांच्या ग्रंथ, लेख, पत्रे, भाषणे इत्यादी सर्व वाङ्मयाचे सारांश आहेत, तसेच त्यांच्याविषयीच्या वाङ्मयाचे – ग्रंथ, आठवणी, व्यक्ती व वाङ्मयविषयक लेख, त्यांच्या वाङ्मयावरील समीक्षणे, अभिप्राय, त्यांना आलेली पत्रे, वेगवेगळ्या ग्रंथांत त्यांच्याविषयी झालेले लेखन, त्यांच्यावरील ग्रंथांची समीक्षणे, गेल्या सुमारे पंचेचाळीस वर्षांत त्यांच्या स्मृतिदिन प्रसंगी झालेली त्यांच्यावरील भाषणे, त्यांच्यावरील काही कविता या सर्वांच्या नोंदी, सारांश आहेत. एका अर्थाने ही सूची म्हणजे 'अक्षर न् अक्षर माधवराव' आहे. या दृष्टीने ही एका आधुनिक प्रमुख मराठी साहित्यिकाची समावेशक सूची आहे. सूची ही कधीच परिपूर्ण नसते. परंतु परिपूर्णतेच्या दिशेने केलेला हा एक व्यापक प्रयत्न आहे.

पीएच्. डी. पदवीच्या निमित्ताने १९५८ पासून डॉ. चुनेकर डॉ. माधवराव पटवर्धनांचा अभ्यास करीत आहेत. त्यांच्या पटवर्धनांच्या अभ्यासाचे हे रौप्यमहोत्सवी वर्ष. या वर्षात त्यांच्या अभ्यासाचे आणखी एक फलित या सूचीच्या रूपाने प्रकाशित होत आहे.

मंडळाच्या वतीने या सूचि-ग्रंथाचा पुरस्कार करताना मला विशेष आनंद होत आहे.

२९ नोव्हेंबर १९८३

सुरेंद्र बारलिंगे
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

## अ नु क्र म णि का

विभाग दुसरा

डॉ. माधवराव पटवर्धनविषयक वाङ्मय



% %

## प्रा स्ता वि क

" माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन " [ मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९७३ ] या माझ्या ग्रंथामध्ये परिशिष्टात [ परिशिष्ट पाचवे ] पटवर्धनांचे वाङ्मय आणि त्यांच्याविषयीचे वाङ्मय यांची यादीवजा सूची जोडलेलीच आहे. तेव्हापासूनच पटवर्धनांच्या व त्यांच्यावरील वाङ्मयाची वर्णनात्मक विस्तृत सूची करण्याचे मनात होते. तो संकल्प आता बऱ्याच कालावधीने पुरा होऊन प्रकाशात येत आहे.

एकेका लेखकाच्या अभ्यासाची सर्व साधने संकलितपणाने उपलब्ध व्हावयास हवीत. लेखकाच्या स्वतःच्या व त्याच्यावरील वाङ्मयाच्या समग्र सूची हे त्याच्या अभ्यासातील एक महत्त्वाचे साधन आहे. इंग्रजीमध्ये अशी एकेका लेखकावरील अभ्यासांची साधने, सूची कितीतरी आहेत. चॉसर, कोलरीज, डिकन्स, हार्डी, मिल्टन, पोप, शेक्सपियर अशांसंबंधी किती तरी सूची आहेत. एकेका लेखकावर तेथे अनेक सूची झालेल्या आहेत. उदाहरणादाखल Dictionary to the plays and novels of Bernard Shaw, with a bibliography of his works and of the literature concerning him, with a record of the Principal Shavian Productions ( London, Black, 1929 ) या सी. एल्. ब्रॉड आणि व्ही. एम्. ब्रॉड यांच्या पुस्तकाचा उल्लेख करता येईल.[1] दिल्ली विद्यापीठातील डॉ. सत्यपाल नारंग यांची Kalidas Bibliography[2] प्रसिद्ध आहे. कालिदासाचे जीवन, त्याचे वाङ्मय, त्याच्याविषयीचे वाङ्मय यांची ती समावेशक सूची आहे. कालिदासाचे जीवन व त्याचे वाङ्मय यांविषयीच्या मूलभूत व दुय्यम अशा दोन्ही स्वरूपाच्या साधनांच्या द्वारा माहिती गोळा करून या ग्रंथात संकलित केली आहे. त्यात एकूण

१. **An Introduction to Research in English Literary History :** Chauncey, Sanders, sixth edition, 1961,

२. **Kalidas Bibliography :** editor Satyapal Narang, Heritage Publishers, M.–16, Connaught Circus, New Delhi, 1976, pp. 412, 100 Rs.

३६०० पेक्षा अधिक नोंदी आहेत. केवळ भारतीय किंवा इंग्रजी भाषेपुरतीच ही सूची मर्यादित नाही. जगातील इतरही बहुतेक भाषांतील ग्रंथांची तिच्यात नोंद आहे. विविध नियतकालिकांतील लेखांचाही या सूचीत समावेश आहे. नियतकालिकांप्रमाणे गौरवग्रंथ, स्मारकग्रंथ इत्यादी संकलित स्वरूपातील ग्रंथांतील लेखांच्या नोंदीही समाविष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. ग्रंथांतील आशयाची व विवेचनपद्धतीची ओळख करून देण्याचाही उपक्रम केला आहे.[३] मराठीमध्येही अशी अनेक लेखकांवर संदर्भसाधने व्हावयास हवी आहेत. अपवाद वगळता अशा सूची मराठीत नाहीतच म्हटले तरी चालेल. डॉ. म. प. पेठे यांनी "ज्ञानदेव वाङ्मयसूची"[४] तयार केली आहे. ती पुष्कळच विस्तृत, समावेशक आहे. बाळकृष्ण अनंत भिडे यांचे वाङ्मय,[५] त्यांच्या कविता,[६] अ. का. प्रियोळकर यांचे वाङ्मय[७] यांच्या मी केलेल्या सूची प्रकाशित झालेल्या आहेत. त्यांतील वाङ्मयसूची या वर्णनात्मक आहेत. पण त्यांचेही स्वरूप मर्यादित आहे. प्रस्तुत "पटवर्धन-सूची" चे स्वरूप अधिक व्यापक व समावेशक आहे, आणि तिच्यामागे अधिक निश्चित अशी विशिष्ट दृष्टी आहे, सूत्र आहे. त्यामुळे ती फक्त पटवर्धनांच्याच अभ्यासाला उपयुक्त ठरेल असे नाही, तर तिला स्वतंत्रपणाने अभ्यसनीयता राहील. एका लेखकाचा अभ्यास करीत असताना तो किती प्रकारांनी होऊ शकतो, किती प्रकारांनी त्या लेखकाचा विचार करता येतो, अशा अभ्यासातून कोणते चरित्रात्मक व वाङ्मयीन प्रश्न निर्माण होऊ शकतात, किती विविध, भिन्न, आणि परस्परविरोधीही मते, दृष्टिकोण व्यक्त होऊ शकतात याची या सूचीवरून कल्पना येईल. एकाच साहित्यिक व्यक्तिसंबंधाने भिन्नभिन्न व्यक्तींचे आकलन कसे भिन्नभिन्न होऊ शकते ते लक्षात येऊन व्यक्तीच्या आकलनातील गुंतागुंत अधिकच जाणवू लागते. या सूचीचे समग्र, सलग वाचन केल्याने एकाच लेखकाच्या अभ्यासात, आकलनात, मूल्यमापनात बदलणाऱ्या काळाप्रमाणे कसा, किती बदल होत जातो, समीक्षकांच्या प्रकृतिभिन्नतेप्रमाणे कसा वेगळेपणा येत

---

३. रा. के. लेले, 'महाराष्ट्र टाइम्स', शनिवार, दि. ७ ऑगस्ट १९७६.

४. **ज्ञानदेव वाङ्मयसूची** : डॉ. म. प. पेठे, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, १९६८.

५. **बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए. यांच्या वाङ्मयाची सूची** : मराठी संशोधन मंडळ, मुंबई, १९६९.

६. **बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए., यांच्या कवितांची सूची** : मराठी संशोधन मंडळ, मुंबई १९६९.

७. **प्रा. अ. का. प्रियोळकर यांच्या वाङ्मयाची सूची** : मराठी संशोधन मंडळ, मुंबई, १९७३.

जातो याचीही कल्पना येईल. म्हणजे अशी सूची समीक्षेच्या ऐतिहासिक विकासाच्याही अभ्यासाला उपयुक्त ठरेल. ती केवळ यांत्रिक सूची नव्हे; तिचे स्वरूप केवळ संदर्भाचे, संकलनात्मक साधन असेच नाही; केवळ पटवर्धनांच्या अभ्यासात नव्हे, तर या सूचीला स्वतंत्रपणाने संशोधनात्मक व समीक्षात्मक मोल आहे.

या सूचीचे दोन विभाग असून पहिल्या विभागात पटवर्धनांचे ग्रंथ व इतर स्फुट लेखन, पत्रे यांची वर्णनात्मक नोंद आहे. त्यांच्या काही महत्त्वाच्या, लेखरूपात प्रसिद्ध झालेल्या नाहीत अशा भाषणांचीही नोंद केली आहे. (लेखरूपात प्रसिद्ध झालेल्या भाषणांची नोंद लेखसूचीतच केली आहे.) दुसऱ्या विभागात पटवर्धन-विषयक वाङ्मयाची सूची आहे. या विभागातही (अ) ग्रंथ, (ब) नियतकालिकांचे विशेषांक, (क) लेख, आणि (ड) इतर, असे उपविभाग आहेत. 'क' विभागातच पटवर्धनांना आलेल्या प्रकाशित किंवा उपलब्ध, प्रकट किंवा व्यक्तिगत पत्रांची नोंद केली आहे. पटवर्धनांच्या किंवा त्यांच्यावरील लेखांची व्यक्तिविषयक, कविजीवन-विषयक, आठवणी, वाङ्मयविषयक अशी काटेकोर विभागणी करणे शक्य नाही. लेखांचे स्वरूप संमिश्र असते. हे लक्षात घेऊन, काहीशा तारतम्याने विभागवारी केली आहे. पटवर्धनविषयक ग्रंथांतर्गत उल्लेख नोंदविले आहेत. याला अर्थात् फारच मर्यादा आहेत. तथापि पटवर्धनांचे जीवन किंवा वाङ्मय यासंबंधाने काही वेगळा विचार, माहिती, आठवण, दृष्टी ज्यांत आलेली असेल अशा नोंदी उपलब्ध झाल्या त्या संकलित केल्या आहेत. पटवर्धनांवरील ग्रंथांची जी परीक्षणे आली त्यांचीही नोंद एवढ्याकरिता करून ठेविली आहे की, त्यांतूनही पटवर्धनांच्या अभ्यासाला व आकलनाला काही चालना मिळेल. याच विभागात पटवर्धनांवरील भाषणांच्या उपलब्ध झालेल्या नोंदी करून ठेविल्या आहेत. पटवर्धनांवरील कवितांच्याही नोंदी करून ठेविल्या आहेत. परिशिष्ट म्हणून पटवर्धनांच्या ज्या कविता ध्वनिमुद्रित झाल्याची माहिती मिळाली त्यांचीही माहिती नोंदवून ठेविली आहे. थोडक्यात म्हणजे पटवर्धनांसंबंधी जी जी माहिती मला उपलब्ध झाली, तिच्यातील बहुतांश येथे पुढील अभ्यासकांसाठी खुली केली आहे. बहुतेक सर्व साहित्य मी बघितलेले, वाचलेले आहे. काही थोडे लेख मुळात मला बघावयाला मिळालेले नाहीत. पण इतर विश्वसनीय साधनांवरून मिळालेल्या माहितीवरून त्यांचीही नोंद, अधिक शोध घेण्याची वाट मोकळी असावी म्हणून करून ठेविली आहे. "मराठी नियतकालिकांच्या सूची"तूनही[८] काही अधिक नोंदी मिळाल्या त्या टिपून ठेविल्या आहेत.

---

८. **मराठी नियतकालिकांची सूची** : संपादक शं. ग. दाते, दि. वि. काळे, शं. ना. बर्वे, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, भाग १, भाग २–खंड १ ते ५; १९६९–१९७८ [संक्षेप : 'म. नि.']

तथापि या सूचीलाही मर्यादा आहेतच. सावरकरांनी म्हटले आहे, ' इतिहासाचा आरंभ दुसऱ्या पानापासून होतो. ' त्याप्रमाणे सूचीची अखेर शेवटच्या पानापूर्वी होते. सूचीला शेवटचे पान असत नाही. इतिहास ' अनादि ' असतो, तर सूचि ' अनन्त ' असते. परंतु अशा सूचीच्या दिशा कळाव्यात म्हणून काही नोंदी अपुऱ्या असल्या तरी करून ठेविल्या आहेत. सूचीत भर घालावयाला अवसर पुष्कळ आहे. तथापि या स्वरूपातही ती पुरेशी व्यापक व समावेशक आहे असा विश्वास आहे. यामध्ये आणखीही काही जोड देता आली असती. पटवर्धनांच्या जीवनाचा जास्तीत जास्त तपशीलवार, दिवसांनुसार कालपट देता आला असता. समकालीन वाङ्मयीन, सामाजिक, राजकीय घटनांचाही कालपट जोडता आला असता. पटवर्धनांच्या स्वतःच्या पुस्तकांच्या अर्पणपत्रिका, आणि त्यांना अर्पण केलेल्या पुस्तकांच्या अर्पणपत्रिका यांच्याही नोंदी करता आल्या असत्या, आणि त्या बोधक ठरल्या असत्या. पटवर्धनांच्या वाङ्मयामध्ये आलेल्या विषयांचीही सूची करणे शक्य आहे—केली पाहिजे. परंतु आहे या स्वरूपातच सूची प्रारंभीच्या कल्पनेपेक्षा विस्तृत झाली, त्यामुळे अशा काही कल्पना बाजूला ठेविल्या.

पटवर्धनांच्या वा त्यांच्यावरील ग्रंथांचा परिचय थोडक्यात देण्याने त्यावर मर्यादा पडली आहे. पटवर्धनांच्या ग्रंथांचा परिचय शक्यतो त्यांच्या शब्दातच दिला आहे. ग्रंथ किंवा लेख यांचे वर्गीकरण करणे कठीण आहे. ' पटवर्धन–वाङ्मया 'मध्ये प्रथम गद्य ग्रंथ नोंदले आहेत. त्यांत प्रथम विषयानुसार वर्गीकरण केले आहे. एकेका विषयावरील ग्रंथात कालानुक्रम ठेविला आहे. नंतर पद्यग्रंथांची नोंद केली आहे. त्यांत प्रथम दीर्घकाव्ये, नंतर रुबायांची भाषांतरे आणि नंतर स्फुट काव्यसंग्रह असा क्रम प्रथम–प्रकाशनाच्या कालानुसार ठेविला आहे. त्या त्या प्रकारात पुन्हा कालानुक्रम ठेविला आहे. लेखसूचीमध्ये प्रथम विषयानुसार वर्गीकरण केले असून पुढे प्रत्येक वर्गात कालक्रम संभाळला आहे. वर्गीकरण काटेकोर करता येत नाही; त्यात तारतम्य संभाळावे लागते. त्याप्रमाणे काही ठिकाणी एखाद्या विषयावरील लेख, कालक्रम थोडा डावलून, एकत्र दिले आहेत. ( उदाहरणार्थ, कवि चंद्रशेखरांवरील विभाग १, ब. २८, ब. २९, ब. ३०, ब. ३१ हे लेख एकत्र नोंदले आहेत. ) वर्गीकरण सोय व तारतम्य पाळून केलेले आहे. ' इंग्रजी ' या गटात विविध वर्गांतील लेख आहेत; सोयीसाठी ते एकत्र नोंदले आहेत. लेखांचे सार शक्यतो पटवर्धनांच्याच शब्दांत सांगितले आहे.

पटवर्धनांचे वाङ्मय, त्यांच्यावरील वाङ्मय यांचे सार देताना त्यांवर संकलकाच्या व्यक्तिमत्तेचा थोडाफार परिणाम होण्याचा संभव आहेच. जास्तीत जास्त वस्तुनिष्ठपणाने ते देण्याची कसोशी बाळगली आहे. संकलकाचे भाष्य असेल तेथे ते वेगळे लक्षात यावे अशी सावधानता ठेविली आहे. सार शक्य तेवढ्या संक्षेपाने दिले आहे.

संपूर्ण लेखाचे काही थोड्या ओळींत सार काढणे दुष्कर आहे. तसे सार काढताना काही गोष्टी बाजूला पडणे अटळ आहे. तथापि असे सार काढताना लेखाचा विपर्यास न व्हावा, किंवा त्याच्यावर अन्याय न व्हावा किंवा त्याच्याविषयी अपुरा समज निर्माण न व्हावा याची शक्य तेवढी दक्षता घेतली आहे. संपूर्ण लेखाचे सार देण्यापेक्षा काही ठिकाणी त्या लेखात कोणत्या विचारावर, विशेषावर भर दिला आहे त्याच्याकडे लक्ष वेधले आहे. विशेषतः ललित स्वरूपाच्या लेखाचे सार सांगणे जास्तच बिकट, प्रायः अशक्यच. लालित्याचे सार काढता येत नाही. विचार तेवढे सांगता येतात. ' माधव जूलियन : वाङ्मयदर्शन ' ( क. २.१२१ ) अशासारख्या लेखाच्याबाबतीत सारसंकलनाची ही मर्यादा जाणवते. लेखसारावरून लेखाचे एकंदर स्वरूप, धोरण ध्यानी यावे, अधिक अभ्यासासाठी मुळाकडे जावे अशी अपेक्षा आहे. ज्यांचे सार सांगितलेले नाही अशांतील बरेच लेख तसे महत्त्वाचे नाहीत, किंवा त्यांच्यांतील प्रतिपादन अन्य लेखांत येऊन गेलेले आहे. काही टीकालेखांत काही विधाने अपुरी, किंवा चुकीची आहेत हे लक्षात येते. अशी सर्वच ठिकाणे निर्दिष्ट केली आहेत असे नाही. लेखांवर काही ठिकाणी संकलनकाराने भाष्य केले आहे. नियतकालिकांपेक्षा पुस्तके अधिक सुलभपणाने उपलब्ध होतात, म्हणून जे लेख पुस्तकनिविष्ट झाले आहेत, त्यांचा तसा निर्देश केला आहे.

ग्रंथाच्या शेवटी ' लेखक–निर्देशिका ' जोडली आहे. पटवर्धनांवरील वाङ्मयाच्या ( विभाग दोन ) लेखकांची ही निर्देशिका आहे. पटवर्धनांचे विशेष अभ्यासक कोण, त्यांचे एकंदर प्रतिपादन कुठे कुठे विखुरले आहे, ते काय आहे याची या योगे साकल्याने कल्पना करता येईल.

पुढे प्रत्यक्ष सूचीत ज्यांच्या नोंदी आल्या नाहीत अशा साधनसामग्रीचा येथे प्रस्तावनेत उल्लेख करीत आहे.

प्रारंभी महत्त्वाच्या अप्रकाशित साधनांचा परिचय करून देतो.

( १ ) प्रस्तुत सूचि-ग्रंथ ज्यांना अर्पण केला आहे ते पटवर्धनांचे बालमित्र रा. वि. मराठे यांना पटवर्धनांनी पाठविलेली पत्रे. मराठे यांनी ही पत्रे मित्रनिष्ठेने संभाळून ठेविली आहेत. या संग्रहातील पहिले पत्र २९ ऑगस्ट १९११ चे असून अखेरचे पत्र १० सप्टेंबर १९३९ चे आहे. या अठ्ठावीस वर्षांतील एकूण ३६२ पत्रांचा हा संग्रह आहे. या पत्रांत १९११ ते १९१८ या काळातील १७१, १९१९ ते १९२८ या काळातील १६३, आणि १९२९ ते १९३९ या काळातील २८ पत्रे आहेत. म्हणजे पटवर्धनांच्या पूर्ववयातील पत्रे सर्वाधिक आहेत. [ अनुक्रमे वार्षिक सरासरी कालखंड १ : २१$\frac{३}{८}$, कालखंड २ : १६$\frac{३}{१०}$, कालखंड ३ : २$\frac{६}{११}$.] यामध्ये या पत्रसंग्रहाचे महत्त्व आहे. पटवर्धनांचे पूर्ववय या पत्रांतूनच जास्त समजते. उत्तर-

काळात पटवर्धनांचे जीवन जास्त विस्तृत, प्रसिद्ध झाले, अधिक ज्ञात, परिचित झाले. जेव्हा ते कोणीच नव्हते तेव्हाच्या काळातील 'माधव' या पत्रांतून दिसतो. पटवर्धनांच्या काही अप्रकाशित कविता, किंवा प्रकाशित कवितांची पूर्वरूपे या पत्रव्यवहारातून मिळतात. ( रा. वि. मराठे व प्रस्तुत संकलक या पत्रव्यवहाराचे संपादन करीत आहेत. )

( २ ) पटवर्धन आणि लीलाबाई यांचा पत्रव्यवहार. १९२८ ते १९३९ या अकरा वर्षांतील या उभयतांचा पत्रव्यवहार वाचीत असताना या काळातील पटवर्धनांचे जीवन झरझर डोळ्यांपुढून जाते. तेथे पटवर्धन कवी नाहीत, पंडित नाहीत, प्राध्यापक नाहीत. तेथे ते पती, पिता आहेत. पत्नीच्या दृष्टीतून ते येथे दिसतात. [ " माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन ", पृ. ३४–३५ पहावे. ]

( ३ ) लीलाबाईंची आत्मलेखनपर टिपणवही. लीलाबाई लग्नानंतर जी. ए.–[ गृहीतागमा ] साठी पुण्याला हिंगण्याला वसतिगृहात राहात होत्या. तेव्हा त्यांनी स्वतःच्या तत्कालीन मनःस्थितीचे आलेखन करणारी आत्मवृत्तपर व्यक्तिगत टिपणे लिहिली होती. ती टिपणवही अतिशय महत्त्वाची आहे. " आमची अकरा वर्षे "-पेक्षाही ही टिपणे हृद्य आहेत. ती अगदी स्वतःसाठी लिहिलेली आहेत. प्रकाशनाच्या विचारांचा स्पर्शही त्यांना झालेला नव्हता. त्यात ३ डिसेंबर १९२८ चे पहिले टिपण आहे. ३ डिसेंबर १९२८ पासून २८ मार्च १९२९ पर्यंतच्या साडेतीन-पावणेचार महिन्यांतील ही टिपणे आहेत. शेवटची अडीच पृष्ठे ११ जुलै १९४० ची, पटवर्धन वारल्यानंतरची आहेत. वहीची एकुण ६३ पृष्ठे आहेत. ( प्रारंभीची दोन पृष्ठे नाहीत. ) त्या त्या दिवसांत लीलाबाईंनी टिपून ठेवलेल्या स्वतःच्या मानसिक प्रतिक्रिया यात आहेत. या नोंदी दैनंदिन नाहीत. जेव्हा काही मानसिक प्रक्षोभ झाला असेल तेव्हा केलेले हे आत्मप्रकटन आहे.

( ४ ) पटवर्धनांनी गं. दे. खानोलकरांना पाठविलेली पत्रे. ७ जुलै १९२३ ते ३० एप्रिल १९३७ या काळातील ही पत्रे आहेत. ती खानोलकरांकडे आहेत.

( ५ ) पटवर्धन-लीलाबाई आणि पटवर्धनांचे श्वशुर बाबासाहेब गरुड यांच्या पत्रांतूनही वडील-मुलगी, सासरे-जावई यांचे परस्परसंबंध दिसतात तेही मोठे जिव्हाळ्याचे आहेत.

ही सूची करीत असताना पटवर्धनांच्या, तसेच त्यांच्यावरील वाङ्मयाचे काही अपुरे संदर्भ मिळाले तेही येथे अधिक संशोधनासाठी नोंदवून ठेवीत आहे.

( १ ) 'लोकसंग्रहा'त आपले पत्र आल्याचा उल्लेख रा. वि. मराठ्यांना ३० डिसेंबर १९१९ ला पटवर्धनांनी पाठविलेल्या पत्रात आहे.

( २ ) ११ सप्टेंबर १९२२ ला त्यांनी 'चंद्रशेखर आणि त्यांची कविता' हे

व्याख्यान दिले, त्याच्या आदल्या वर्षी त्यांनी 'चंद्रशेखर व गोदागौरव' हा लेख तयार केला होता. त्या वर्षीच्या ऑक्टोबरात ते हा लेख घेऊन चंद्रशेखरांच्या भेटीला गेले होते. [ रा. वि. मराठे-पत्रसंग्रह, १ नोव्हेंबर १९२१. या लेखाचाच समावेश पुढे 'चंद्रशेखर व त्यांची कविता' ( नवयुग, सप्टेंबर ऑक्टोबर १९२२ ) या लेखामध्ये ( पहा, विभाग १. ब. २८ ) केला का ? ]

( ३ ) "सुधारक" वर स्वतः पटवर्धनांचे परीक्षण 'ज्ञानप्रकाश' मध्ये आल्याचा उल्लेख रा. चिं. श्रीखंडे यांनी केला आहे. [ 'यशवंत', जानेवारी १९४०, पहा, क. २. ४९ ]. 'ज्ञानप्रकाश', शुक्रवार, २७ जुलै १९२८च्या अंकात "सुधारक" चे परीक्षण आले आहे. [ पहा, क. ३.४४ ]. परीक्षण अनाम आहे. त्यात कसलेच वैशिष्ट्य नाही.पटवर्धनांचे असावे असे वाटत नाही.

( ४ ) 'सह्याद्री'च्या जानेवारी १९४० च्या पटवर्धन–अंकातील लेखात [ पहा, क. २.६४ ] द. सी. पंगूंनी लिहिले आहे, 'प्र. प्रों. कानिटकरांनी "रुक्मिणी-हरणा" तील शब्दचर्चेनंतर स्वतंत्र पुस्तिका प्रसिद्धिली. तीत मजवर अन्याय झाला आहे हे बघून पटवर्धनांनी मला 'सामराज' निबंध लिहिण्यास प्रोत्साहन दिले, व 'ज्ञानप्रकाशा'त स्फुट लेख लिहून माझ्यावरील अन्यायाचे परिमार्जन केले.'

( ५ ) कृ. पां. कुलकर्णी यांनी 'लोकशिक्षण'च्या पटवर्धन–अंकातील लेखात [ क. २.७५ ], पृ. ६५६ वर म्हटले आहे, 'त्यांची 'ज्ञानप्रकाशा'त प्रसिद्ध झालेली टिपणे मूलगामी असली तरी ती फार्सी भाषेच्या अध्ययनाची अधिक निदर्शक आहेत.' [ ही टिपणे म्हणजे 'महाराष्ट्र शब्दकोशास जाहीर सूचना', लेखांक १,२, २८ जानेवारी व १४ फेब्रुवारी १९३२, विभाग १, ब.१५७, ब.१५८ ही तर नव्हेत ?]

पटवर्धन व लीलाबाई पत्रव्यवहारातून पुढील चार लेखांची नोंद मिळते –

( ६ ) "प्रो. विष्णु गोविंद बिजापूरकर" [ चरित्र, गं. दे. खानोलकर, १९२८ ] या पुस्तकाला आपण प्रस्तावना लिहिली आहे, परंतु 'प्रसिद्ध प्रस्तावनाकार' हे बिरुद लागायला नको म्हणून ती खानोलकरांच्या नावाने लिहिली आहे असे पटवर्धनांनी लीलाबाईंना एका पत्रात लिहिले आहे. सार्वजनिक शिक्षण संस्थांतील आजीव सेवक-बुवांच्या वागण्यावर यात टीका आहे.

( ७ ) १० एप्रिल १९३० च्या सुमारास पटवर्धनांचे 'ज्ञानप्रकाश'च्या 'काव्य-शास्त्रविनोद'–पुरवणीत एक परीक्षण आले होते.

( ८ ) "सुशीलेचा देव" [ प्रकाशन १९३० ] या कादंबरीवर बरीवाईट, पण टीका लिहिण्यास पटवर्धनांना लीलाबाईंनी सांगावे असे वामनराव जोशांनी लीलाबाईंना सुचवले होते.

( ९ ) सामराजाच्या "रुक्मिणीहरण"वरचे 'ज्ञानप्रकाशा'तील पटवर्धनांचे परीक्षण–'तीन कविमित्रांकडून' अशा नावाने, ११ ते २१ एप्रिल १९३०च्या दरम्यान.

(१०) 'मी एक गोष्ट लिहिली आहे' असा उल्लेख पटवर्धनांच्या रा. बि. मराठ्यांना १९ ऑगस्ट १९२९ ला लिहिलेल्या पत्रात आहे.

(११) "छंदोरचने"च्या इंग्रजी भाषांतराचा पटवर्धनांचा मानस होता. जोवर शक्ती होती तोवर त्यांनी हे काम केले. अवघे चाळीस पाने भाषांतर झाले. [ सह्याद्रि, पटवर्धन-अंक, पृ. ४८; आमची अकरा वर्षे, पृ. १५४ ]

(१२) "प्राजक्ताची फुले" या (कै.) श्रीनिवास कृष्ण पाटणकर यांच्या काव्यसंग्रहावरील [ प्रकाशन १९३७ ] पटवर्धनांचा चार ओळींचा अभिप्राय. 'आपल्या कवितांनी संस्मरणीय चटका लावून अकाली दिवंगत होणारे कवी बालकवींच्या मागून हेच होत.' [ उद्धृत, "पोतदार : विविध दर्शन", १९३९, शेवटी जाहिरात. ]

(१३) एक शास्त्री व प्राध्यापक यांनी पटवर्धनांची वेळी अवेळी वाटेल तिथे वाटेल तशी निंदा केली. सत्यवादी पटवर्धनांना वाईट वाटले व त्यांनी 'सत्याग्रही' या टोपणनावाने वर्तमानपत्रात लेख लिहिले. (शं. के. कानेटकर. 'माधव ज्यूलियन यांच्या काही कवितांच्या जन्मकथा', पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९.)

(१४) 'व्युत्पन्नाची अब्रू' (मा. ह. पुरंदरे यांस उत्तर) या एका लेखाची नोंद गं. दे. खानोलकरांकडील पटवर्धन-दप्तरात आढळते.

(१५) '"प्रेमावाचुनच्या सुखास दिधली केव्हाच आम्ही रजा" या माधव ज्युलियनच्या अनन्यसाधारण श्रद्धेची कास धरावी.' असे पटवर्धनांच्या एका ओळीचे अवतरण वि. द. घाटे यांच्या, पुण्यात भरलेल्या कविसंमेलनातील (१९४९) स्वागताध्यक्षीय भाषणात आढळते. ही ओळ कोणत्या कवितेत ?

पटवर्धनविषयक लेखांचेही असे अपुरे संदर्भ मिळतात. तेही पुढील संशोधनासाठी नोंदवून ठेवणे युक्त वाटते.

(१) लो. टिळकांना मानपत्र देण्याच्या सभेत पटवर्धनांनी विरोध केल्यावर 'संदेश'मध्ये ७ ते ९ डिसेंबर १९११ च्या दरम्यान अच्युतराव कोल्हटकरांनी पटवर्धनांची रेवडी उडविणारे लेख लिहिल्याचा उल्लेख मिळतो. [ "माधव जूलियन", गं. दे. खानोलकर, आ. २, पृ. ९९. ]

(२) पटवर्धनांना डेक्कन एज्युकेशन सोसायटी सोडावी लागली त्यावेळी 'केसरी'त त्यांच्याविरुद्ध बरेचसे लिहिले गेले होते असा संदर्भ मिळतो.

(३) १९२७ च्या सुमारास सातार्‍याच्या 'प्रकाश' साप्ताहिकात "विरहतरंग"-वर लं. वि. काशीकर यांचे तीन लेख आले होते. [आठवण, श्री. लं. वि. काशीकर]

(४) पटवर्धन-लीलाबाई पत्रव्यवहारात माडखोलकरांनी "द्राक्षकन्ये"चे विपर्यस्त परीक्षण केल्याची माहिती मिळते.

( ५ ) " अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक ", खं० १ चे विरोधी परीक्षण 'महाराष्ट्रा'त [ नागपूर, संपादक माडखोलकर ] आले होते. त्यात बहुधा त्या खंडातील पटवर्धनांच्या केशवसुतांवरील लेखावर प्रतिकूल टीका असावी. [ संदर्भ, पटवर्धनांचे १ फेब्रुवारी १९३२ चे खानोलकरांना पत्र. ]

( ६ ) 'प्रतिभा' पाक्षिकात ह. वि. मोटे–माडखोलकर वाद चालू असता, त्यात गो. गो. अधिकाऱ्यांचे विस्तृत पत्र उद्‌धृत केले आहे. त्या पत्रात पटवर्धन–बेहेरे वादामागे माडखोलकर असल्याचा आरोप अधिकाऱ्यांनी केला आहे. माडखोलकरांच्या " मुक्तात्मा " कादंबरीनंतर 'विविधवृत्ता'त प्रसिद्ध होणाऱ्या " बद्धात्मा " कादंबरीत पटवर्धनांवर येणारी अप्रत्यक्ष टीका—'जी वस्तुतः खरी नव्हती'– ती माडखोलकरांनी दिलेल्या माहितीवरूनच लिहिली गेल्याची साक्ष रा. का. तटणीस, माधवराव पटवर्धन देतील असे सांगून पुढे 'ही माहिती देऊन वर बनावट व खोट्या हकिकती प्रसिद्ध करतो म्हणून "बद्धात्मा"च्या लेखकावर टीका करण्यास, व पटवर्धनांना सहानुभूतीची पत्रे टाकण्यास माडखोलकर तयार' अशी माडखोलकरांवर टीका केली आहे. " बद्धात्मा " ही विडंबनात्मक कादंबरी क्रमशः श्री. व्यतिपात या टोपण नावाने 'विविधवृत्ता'त प्रसिद्ध होत होती. 'विविधवृत्ता'च्या १९ नोव्हेंबर १९३३ च्या अंकातील तिच्या प्रकरणात रविकिरण मंडळ, मंडळाची उद्दिष्टे, त्याचे सभासद वगैरेंचे स्वैर विडंबन आले आहे.

( ७ ) प्र. के. अत्रे ( केशवकुमार ) यांच्या " झेंडूच्या फुलां"तून रविकिरण मंडळाच्या सदस्यांच्या, आणि विशेषतः पटवर्धनांच्या कवितांची झालेली विडंबने प्रसिद्धच आहेत. 'मी विडंबनकार कसा झालो' या लेखात अत्र्यांनी पटवर्धनांच्या काव्यासंबंधाने टीका केली आहे. 'रविकिरण मंडळातील रवी माधवराव, बाकीची तेव्हा तरी किरणे होती.' हे अत्र्यांचे प्रसिद्ध विधान त्यातीलच.

केवळ मराठीतच नव्हे, तर मराठीतर भारतीय, किंवा इंग्रजी अशा भाषांतील वाङ्मयातही मराठी वाङ्मय–काव्य यांच्या परिचय–परामर्शाच्या निमित्ताने, " वाङ्मय-कोशा"तून, किंवा स्वतंत्रपणाने पटवर्धनांविषयी काही मजकूर आला असणारच. पण त्या सर्वांचा शोध घेणे, आणि त्यांची नोंद करणे हा एक तर स्वतंत्रच, मोठा उद्योग आहे आणि दुसरे, क्वचित् एखाद्या मूलभूत, मार्मिक विचाराखेरीज त्यात, जे मराठीत आले नाही असे येण्याची शक्यताही कमी. असा एक मिळालेला संदर्भ : 'मानसी' या गुजराती त्रैमासिकात पटवर्धन जळगावला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले तेव्हा श्री. देसाई यांनी लेख लिहिला आहे.[९]

९. " छंदोरचना ", परीक्षण, ना. ग. जोशी, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर १९३८, व. ११ अं. ४. [ क. ३.१२० ].

आणखीही वेगवेगळ्या प्रकारांनी असे उल्लेख येत असतात, आणि त्यांनाही महत्त्व असते. श्री. ना. पेंडसे यांच्या " कलंदर " कादंबरीचा [ प्रकाशन १९५९ ] काळ १९३३ चा उत्तरार्ध आहे. ' त्या दिवसांत लोकप्रिय असलेले गीत ' म्हणून ' सङ्गमोत्सुक डोह 'चा तिच्यात उल्लेख आहे. कंचा ते गाणे म्हणते ( पृ. २२१–२२२ ). हेमीही ते गाणे सिंधूला ग्रामोफोनवर ऐकवते ( पृ. ३४२ ). अशा उल्लेखांवरून पटवर्धनांच्या कवितेला त्या काळात कोणते स्थान होते याची कल्पना येते.

पटवर्धनांना प्रत्यक्षतः नायक कल्पून त्यांच्यावर ललित वाङ्मयकृती निर्माण झालेली नाही. पण पटवर्धनांवरून जिच्यातील व्यक्ती निर्माण केली असावी असे वाटते, तसे म्हटले गेले, त्याबद्दल वादही झाले अशा ललित वाङ्मयकृतीचाही येथे उल्लेख करावयास हवा. माडखोलकरांच्या " भंगलेले देऊळ "चा [ १९३४ ] नायक अरुण याच्यामध्ये पटवर्धनांचे ( विकृत ? ) दर्शन होते असे म्हटले गेले आहे, त्याच्यावर वादही झाले आहेत.

" पहिले प्रेम " या वि. स. खांडेकरांच्या कादंबरीत [ आ० १, १९४०; तत्पूर्व-प्रकाशन ' किर्लोस्कर ' मासिकातून क्रमशः ] पृ. १०७ वर पुढील उल्लेख आहे : प्रभाकर हा कोल्हापूरच्या कॉलेजातील विद्यार्थी. प्रेमभंग झाल्याने तो आत्महत्येच्या विचाराने पछाडलेला आहे. तो सांगतो, ' माधव ज्यूलियन माझे गुरु. त्यांची कविता मी मोठ्या आवडीने वाचू लागलो. ' पृ. १०८–१०९ वर माधवरावांचा अतिशय हृद्य उल्लेख आहे. बेपत्ता प्रभाकराच्या शोधार्थ निवेदक ( ' मी ' ) कोल्हापूरला, प्रभाकराच्या खोलीवर येतो. या ठिकाणी माधवराव प्रत्यक्ष एक पात्र म्हणून आलेले दाखवले आहेत. या वेळचे त्यांचे दर्शन लढाऊ, आशावादी, सहृदय म्हणून घडविले आहे.

१९६४ च्या आरंभी रायटर्स सेंटरच्यातर्फे हरि नारायण आपटे अभ्यासवृत्तीसाठी ललित लेखनाच्या योजना मागविण्यात आल्या होत्या. दरमहा पाचशे रुपये सहा महिन्यांसाठी अशी ही अभ्यासवृत्ती होती. या अभ्यासवृत्तीसाठी मी पटवर्धनांच्या जीवनावरील ललित वाङ्मयकृतीची योजना पाठविली होती. प्राथमिक चाचणीत ही योजना पसंत पडून, ज्यांना मुलाखतीसाठी मुंबईला बोलावण्यात आले ( ५ एप्रिल १९६४ ) त्यात मी होतो. दिलीप चित्रे, रत्नाकर मतकरी, चिं. त्र्यं. खानोलकर, दि. बा. मोकाशी, उद्धव शेळके यांनाही बोलावले होते. त्या वर्षी ही अभ्यासवृत्ती खानोलकरांना मिळाली.

' युगवाणी ' मासिकाच्या १९६७ सालच्या दिवाळी अंकांत कुंदा पारसनीस यांची ' आम्ही दोघं ' या नावाची कथा आली आहे. वसंतराव आणि मोहनराव हे दोघे जुने स्नेही दीर्घ कालाने म्हातारपणी परस्परांना भेटतात, आणि जुन्या आठवणींची उजळणी होते. मोहनरावांच्या पूर्वायुष्यातील एका घटनेसंबंधाने वसंतरावांनी

तेव्हा जी भूमिका घेतली, कृती केली त्यासंबंधाने, मध्यंतरी दुरावलेले हे स्नेही मने मोकळी करीत आहेत, असा त्या कथेतला आशय आहे. ती कथा वाचताना माधवराव (मोहनराव) आणि श्री. बा. रानडे (वसंतराव) यांच्या परस्परसंबंधाची आठवण अगदी सहजपणाने होते. कुंदा पारसनीसांनी–श्री. बा. रानडे यांच्या कन्येने– ती कथा लिहिल्याने ती अधिक अर्थपूर्ण वाटावयाला लागते.

ब. ह. पिटके यांच्या निधनानंतर माधव पिटके यांनी त्यांच्यावर लिहिलेल्या लेखात [ प्रतिष्ठान, एप्रिल-मे १९७८ ] पुढील उल्लेख आहे: 'माधव जूलियन यांच्या जीवनावर एक भली मोठी व उत्कृष्ट कादंबरी ब. ह. पिटके लिहिणार होते. त्यासाठी त्यांनी गेले वर्ष-दीड वर्ष फार मोठी तयारी चालविली होती. जिथे मिळेल तिथून, वाटेल ते कष्ट घेऊन कै. माधव जूलियनांविषयी माहिती ते गोळा करीत होते. यासंबंधी किती तरी टाचणे, टिपणे फायली भरभरून त्यांच्या कपाटात आहेत.'

कधी एखाद्या समर्थ लेखकाच्या लेखनात एखादी प्रतिमा म्हणून पटवर्धनांसंबंधी सहज उल्लेख येतो, पण तोही विचारांना एक वेगळी दिशा दाखवतो. जी. ए. कुलकर्णी यांच्या "हिरवे रावे" (१९६२) या कथासंग्रहातील 'माणूस नावाचा बेटा' कथेत 'माधव ज्यूलियनच्या शैलीसारखे जिवंत चढउताराचे शरीर तिने खुशाल शो-रूममध्ये ठेवले आहे.' (पृ. २४१) असे पटवर्धनांच्या शैलीसंबंधाने महत्त्वाचे विधान येऊन जाते.

विठ्ठलराव घाटे यांच्या 'गॉन बुइथ द विंड' या निबंधात 'डॉसनची भावगीते वाचताना मला कधी संस्कृत कवींची, तर कधी माधव जूलियनांच्या गज्जलांजलीची पदोपदी आठवण येते'. असे विधान जाताजाता येऊन जाते, आणि विचारांना एक नवी दिशा दाखवून जाते. [ "विचारविलसिते", वि. द. घाटे, १९७३, पृ. ८३ ].

१९२० ते १९४५ या वाङ्मयीन कालखंडातील डॉ. पटवर्धन ही एक प्रमुख नि प्रभावी व्यक्ती व प्रवृत्ती असल्याने या संदर्भात जेथे जेथे लेखन झाले किंवा होईल तेथे तेथे पटवर्धनांचा उल्लेख क्रमप्राप्त आहे. मराठी वाङ्मयाचे इतिहास, मराठी काव्याचे इतिहास, मराठी समीक्षेसंबंधीचे ग्रंथ, साहित्यविमर्शक ग्रंथ, पद्यरचनाशास्त्रावरील ग्रंथ, कोशवाङ्मयविषयक लेखन, फार्शी-मराठी संबंधाबाबतचे वाङ्मय, उमरखय्यामसंबंधीचे लेखन, भाषाविचार करणारे, लिपिविचार करणारे वाङ्मय अशा सर्वांतूनच पटवर्धनांविषयी कमीजास्त महत्त्वाने लेखन येते. रविकिरण मंडळ, त्याचे सदस्य यांच्यावरील, किंवा त्या सदस्यांचे लेखन यांतूनही पटवर्धनांचे उल्लेख येणे स्वाभाविक आहे. या काळातील इतर साहित्यिक किंवा अन्य व्यक्ती यांची चरित्रे, आत्मचरित्रे, आठवणी, त्यांच्यावरील परिचय-परामर्शात्मक वाङ्मय यांतूनही पटवर्धनांचे उल्लेख भेटतात. अनेक पुस्तकांच्या प्रस्तावनांतून पटवर्धनांच्यासंबंधाने काही विवेचन झालेले मिळते. अनेक मान्यवर कवींनी आपल्या आठवणी, आत्म-

निवेदनपर लेखन यांत पटवर्धनांपासून आपल्याला प्रेरणा, प्रोत्साहन, मार्गदर्शन मिळाल्याचे लिहून ठेविले आहे. काही कवि-अभ्यासकांनी पटवर्धनांना आपली पुस्तकेही अर्पण कली आहेत. त्या अर्पणपत्रिकांतून पटवर्धनांसंबंधी काही भाव-भावना व्यक्त झाल्या आहेत. पत्रसंग्रह, वेगवेगळ्या स्वरूपाचे चरित्रकोश, संस्थावृत्ते अशांतूनही पटवर्धनांसंबंधी काही निर्देश आलेले आहेत. पटवर्धनांच्या वैयक्तिक वा साहित्यिक जीवनातील फर्गसन महाविद्यालय प्रकरण, महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होणे, डी. लिट्. पदवी मिळविणे, मृत्यू अशांसारख्या महत्त्वाच्या घटनांच्या वेळीही विविध वृत्तपत्रे, नियतकालिके यांतून त्यांच्यावर प्रसंगोपात्त लेख, स्फुट टिपणे आली. पटवर्धनांच्या स्मृतिदिन-प्रसंगी अजूनही अनेक ठिकाणी, संस्थांतून भाषणे होतात, त्यांचे वृत्तांत येतात, वृत्तपत्रे-नियतकालिकांतून लेख येतात. अशा लेखांतून, त्यांमधील अशा एखाद्या विधानातूनही पटवर्धन-व्यक्तिविषयक किंवा वाङ्मयविषयक काही महत्त्वाचे विधान मिळून जाते. असे उल्लेख कुठे, कसे, किती आले असतील ते सांगणे, आणि त्या सर्वांचा शोध घेणे व नोंद करणे अशक्यप्राय आहे. नाहीतर संशोधनाला आणि विस्ताराला सीमा उरणार नाही. त्यांतल्या काही थोड्यांची कल्पना यावी, सूचीचा विस्तार किती होऊ शकतो ते समजावे एवढ्या-पुरता हा काहीसा विस्तार केला.

ही सूची वाचतानाही लक्षात येते ते हे की, एवढ्या सातत्याने आणि वैपुल्याने पटवर्धनांवर चर्चा होत आली आहे. अशी चर्चा फारच थोड्या साहित्यिकांवर झाली आहे. पटवर्धनांवरील ही चर्चा मुख्यतः त्यांच्या काव्यावर होत आली आहे. त्यातही "विरहतरंगा"वर ती जास्त झाली आहे. पटवर्धनांचे प्रमुख कार्य काव्यनिर्मिती-विषयक की, संशोधनात्मक याचे एक हे अप्रत्यक्ष उत्तर ठरेल. पटवर्धनांच्या कोणत्या काव्याने रसिक मनावर अधिक मोहिनी घातली आहे त्याचेही प्रत्यंतर यातून मिळेल.

पटवर्धनांच्या काही अप्रकाशित, हस्तलिखित वाङ्मयाचीही नोंद येथे करीत आहे.

देवी अघोरकामिनी : मि. शिवप्रसाद यांच्या 'देवी अघोरकामिनी' या गुजराथी पुस्तकाचा अनुवाद. वहीची १६ पृष्ठे. शनिवार दि. २३ नोव्हेंबर १९१८. [रा. वि. मराठे–संग्रह.]

पटवर्धनांची काही हस्तलिखिते, त्यांच्या टिपणवह्या लीलाबाईंनी स्वतःच्या शेवटच्या आजारात विठ्ठलराव घाटे यांना दिल्या. घाटे यांनी ते सर्व साहित्य माझ्या-कडे दिले. त्यामध्ये पटवर्धनांचे अद्यापही प्रकाशित न झालेले काही साहित्य आहे. त्या संग्रहाची माहिती पुढे दिली आहे. यांपैकी कोणत्याही लेखनाचा कालोल्लेख नाही.

१. "काव्य–कुतूहल" या संपूर्ण ग्रंथाचे पूर्व–हस्तलिखित त्यामध्ये आहे. "माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन" या माझ्या ग्रंथात मी असा तर्क केला होता

की, 'वाङ्मयानंद-मीमांसेवरील आणि रसचर्चेवरील तीन लेखांतून पटवर्धनांचा अखेरच्या काळातील अभ्यासाचा नवा विषय कोणता होता ते दिसते. परंतु हे लेख एखाद्या मोठ्या योजनेतील भाग असावा असे त्यांच्या सद्यःस्वरूपावरून तरी वाटत नाही. आहे त्या स्थितीत त्यांतील प्रतिपादन पूर्ण आहे.' (पृ. ३२६). परंतु आता नव्याने उपलब्ध झालेल्या या साहित्यावरून असे दिसते की, पटवर्धनांच्या संकल्पित ग्रंथात त्यातील भाग यावयाचा होता. शक्यता अशीही आहे की, प्रारंभी वेगवेगळे, सुटे भाग म्हणून लिहिलेले सर्व काव्यसंबंधित विवेचक लेख एका सूत्रात आणून त्यातून एक सलग ग्रंथ सिद्ध करावयाचा अशी नंतर कल्पना आली असेल. 'सध्या मी अलंकार, रस वगैरेंचा अभ्यास सुरू केला आहे व त्याच अभ्यासासाठी मी या वेळी श्री. XXX शास्त्रीबुवांकडे शिकावयास जात असतो. "छंदोरचने"प्रमाणे याही विषयावर एखादे पुस्तक लिहावे अशी माझी फार इच्छा आहे.' गोपाल कृष्ण चिरमुले यांच्याकडे काढलेल्या या उद्‌गारांतून [ सह्याद्रि, जानेवारी १९४० ] सूचित होणारा ग्रंथ म्हणजेच हा "काव्य-कुतूहल" असावा. "आमची अकरा वर्षे", "माधव जूलियन", "स्वप्नभूमी" या कशांत या ग्रंथाचा उल्लेख नाही.

पटवर्धनांचे हे जे लेखन मिळाले ते त्यांनी केव्हा लिहिले वगैरेचा तपशील उपलब्ध नाही. परंतु "छंदोरचने"तील ( आ. २ ), "पद्यप्रकाश"मधील, किंवा 'रस-व्यवस्थेचे वैयर्थ्य', 'रसव्यवस्था नि आस्वाद्यमानता', 'वाङ्मयानंद-मीमांसा' वगैरे लेखांतील काही मजकूर संस्कारित होऊन या अपूर्ण ग्रंथात आलेला आहे त्यावरून त्या लेखनानंतर, म्हणजे १९३७ नंतर, १९३८-३९ मध्ये हे लेखन झालेले असावे. पटवर्धनांची दक्ष परिष्करणवृत्ती, अथक परिश्रमशीलता, निरलस चिकाटी यांचा प्रत्यय येथेही येतो. आपल्याच जुन्या लेखनातील मजकूर पुन्हा नव्या ग्रंथात घेताना पटवर्धन तेवढ्यातही काही संस्कार, सुधारणा करतात. जुना उतारा नकल-तानाही त्याच्यावर संस्कार करून तो ते अधिक नेटका करतात.

सदर ग्रंथ अद्यापपर्यंत अप्रकाशित राहावा याचे थोडे आश्चर्य, विषाद वाटतो. ( आणि पटवर्धनांसारख्यांचाही ग्रंथ इतकी वर्षे अप्रकाशित राहातो यातून काहीसा दिलासाही मिळतो, अनेक वर्षे अप्रकाशित लेखन आहे अशांना! ) आणि व्यक्तिशः माझ्या दृष्टीने आनंदही होतो, त्याचा प्रथम परिचय करून देण्याचा भाग्ययोग मला लाभला म्हणून.

हा ग्रंथ उपलब्ध झाला आहे तो पूर्ण स्वरूपात नाही. त्याची आरंभीची, अधली-मधली काही पाने गहाळ झालेली आहेत. परंतु या ग्रंथाची संपूर्ण अनुक्रमणिका—त्यात आलेले विषय व त्यांच्या ओळी—यांचे टिपण या ग्रंथासोबत असल्याने कोणता भाग गहाळ झाला आहे ते नेमके समजू शकते, आणि या गहाळ भागातील विषयांचा संस्कारयुक्त विस्तार केलेले काही लेखन स्वतंत्रपणाने उपलब्ध होते, व हा खंडित

भाग सांधता येतो.

या हस्तलिखितावर ग्रंथाचे नाव नाही. परंतु पटवर्धनांची दुसरी एक संधारिका (file) आहे, त्यात यातील आरंभीचा विषय विवेचिला आहे, आणि त्या संधारिकेच्यावर "काव्य-कुतूहल" हे शीर्षक लिहिलेले आहे. त्यावरून या संयोजित ग्रंथाचे नाव आणि स्वरूप समजू शकते.

या हस्तलिखिताची एकूण १३८ पाने ( २१×१७ सें.मी. ) आहेत. त्यांपैकी ११३ पाने उपलब्ध आहेत. अधलीमधली एकूण २५ पाने गहाळ आहेत. पानाच्या एका बाजूला मजकूर लिहिलेला आहे. हस्तलिखितात अधूनमधून भर घातली आहे, सुधारणा केल्या आहेत. समासात किंवा अवतीभवती काही टाचणे केली आहेत. सर्व पानांवर पृष्ठांक आहेत. पण त्यांत खोडाखोड, जुने पृष्ठांक खोडून नवे घालणे वगैरे केले आहे. त्यावरून पटवर्धनांनी लेखनाच्या ओघात मांडणीत काही बदल, फिरवाफिरव केल्याचे कळते. अधूनमधून लेखन विस्कळीत वाटते. मधला काही मजकूर गहाळ झाला असावा. या सर्वांवरून हा ग्रंथाचा कच्चा खर्डा असावा असे लक्षात येते.

या संकल्पित ग्रंथात पटवर्धनांनी काव्याशी संबंधित विविध घटकांचा, प्रश्नांचा विचार केला आहे. वेगवेगळया ठिकाणी, वेगवेगळ्या वेळी शब्दविचार, पद्यरचना, रसविचार, वाङ्मयानंद-मीमांसा वगैरेंवर त्यांनी जे लिहिले ते या ग्रंथात एकसूत्रान्वित, सलगपणे, ग्रंथरचनेच्या बैठकीवरून समन्वित करण्याचा, व त्यात भर घालून विषयाला पूर्णता आणण्याचा त्यांचा विचार असावा.

या ग्रंथाच्या सोबत असणाऱ्या अनुक्रमणिकेच्या अनुरोधाने या ग्रंथातील विषय-विवेचनाचा तपशील पुढे नोंदविला आहे. [ विषयांचे अनुक्रमांक पटवर्धनांच्या अनुक्रमणिकेच्या टाचणाप्रमाणे ठेविले आहेत. अनुक्रमणिकेतील विषय-नावे क्वचित् आत ग्रंथात बदललेली दिसतात. मुळात परिच्छेद नाहीत. विषयानुसार परिच्छेद मी पाडले असून परिच्छेदांना अनुक्रमांक मी दिले आहेत. ] :

१. पृ. १-८ नाहीत. [ ( १ ) वाङ्मय म्हणजे काय? ( २ ) वाङ्मय ही एक ललितकला आहे या मुद्यांचे या पानात विवेचन आल्याचे समजते. या विषयांचा स्वतंत्रपणाने विस्तार केलेला मजकूर एका सुट्या संधारिकेत आहे. या संधारिकेत वहीच्या १३ पानांएवढा मजकूर असून त्यांत पुढील विचार आले आहेत : 'ज्यातील विषयासम्बन्धीं नि मांडणीसम्बन्धीं मनुष्यमात्राला कुतूहल वाटते आणि ज्याच्या रचनासौन्दर्यापासून आनन्द होतो असा ग्रंथ वाङ्मय होय.'-इंद्रियतृप्तीपेक्षा मनाला समाधान देणारी कला ती ललितकला. कलावंत आपला संस्मरणीय अनुभव इतरांना आणून देण्याचा प्रयत्न करतो.-वाङ्मय ही कला निवळ अनुकारक नाही.] ( ३ ) वाङ्मयाचा इतर उपयोग. वाङ्मयाच्या वाचनापासून होणारा आनंद.- वाङ्मयनिर्मितीच्या प्रेरक शक्ती. प्रतिभेचे स्वरूप. स्फूर्तीचे स्वरूप. निर्मितीची प्रक्रिया.-विचार, भावना, व

कल्पना या काव्याच्या तीन घटकांचे विवेचन.

२. ( ४ ) काव्य म्हणजे काय ? ( पृ. ३२ ). ( ५ ) पद्य हे काव्याचे शरीर, अथवा वस्त्रपरिधान. पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना. ( ६ ) पद्याच्या उपयुक्ततेची अंगे. ( ७ ) पद्याची कृत्रिमता. कृत्रिमतेला भिण्याचे कारण नाही ( पृ.३५-३८ ).[10] ( ८ ) काव्य वाचनीय का असावे ? ( ९ ) गायनाने होणारी फसगत. ( १० ) गेयता आणि अर्थगौरव यांचे व्यस्त प्रमाण. ( पृ. ४१-४५ )[11] ( ११ ) किमान गेयता.

३. ( १२ ) काव्यगुण, कवितापण ओळखायचे कसे ? रसाचा थोडा विचार. ( १३ ) काव्याचा आनंद कुतूहलपूर्तीने नि सहानुभूतीच्या चालनेने होतो. सामग्र्याने विचार करण्याची आवश्यकता. द्राक्षापाक-नारिकेलपाक.–काव्यानंदमीमांसा.

४. (१४) काव्य आणि विज्ञान. काव्य-शास्त्रांच्या क्षेत्रांची अभेदता. केवळ दृष्टि-भेदता. ( १५ ) काव्य शास्त्रीय ज्ञानाचे पुरक आहे. ( १६ ) काव्यात्म सत्य म्हणजे काय ? ( १७ ) काव्याचे विज्ञानविरुद्धत्व क्षम्य नाही. ( १८ ) मनःपूर्वकतेचे महत्त्व. (१९) बुद्धीचे कार्य (अप्रत्यक्ष). (२०) कवित्वाची थोरवी कशावर अवलंबून आहे ?

५. ( २०अ )[12] रसविचार.-काव्यानन्दमीमांसा. ( पृ. ८३-८४ )

६. (२१) मराठी काव्याचे समालोचन. (२२) काव्यप्रकार. महाकाव्य. आख्यान-काव्य. ( पृ. ८७-८९ ) ( २३ ) भावगीत. ( २४ ) नवकौतुकी आणि शिष्टाचारी ( Romantic and Classic ) वृत्ती. ( २५ ) सुनीत आणि गज्जल; कणिका ( पृ. ९५-९७ ).

७. ( २६ ) शब्द म्हणजे काय ? संकेत. [ अनुक्रमणिकेतील ( २७ ) वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, आणि व्यङ्ग्यार्थ. ( २८ ) गोचरवाचकता. ( २९ ) यौगिकार्थ, प्रांतिक, ग्रांथिक, ग्राम्य. पृ. ९९-१०६, गहाळ.[13] ]

८. ( ३० ) रीतिविचार. ( ३१ ) वैदर्भी आणि गौडी.

९. ( ३२ ) प्रसाद. [अपूर्ण]. (३३) माधुर्य. ( ३४ ). ओज. (३५) शैथिल्य [?]

---

१०. " छंदोरचना " ( आ०२ ), पृ. ५-७ वरील विवेचन येथे संस्कार करून समाविष्ट.

११. " छंदोरचना " ( आ.२ ), पृ. ११-१२.

१२. हे विषय मूळ अनुक्रमणिकेच्या टिपणात क्रमांकनिर्दिष्ट नाहीत. मागून यांचा समावेश केला आहे. 'रसव्यवस्थेचे वैयर्थ्य ', ' रसव्यवस्था नि आस्वाद्यमानता ', ' वाङ्मयानंद-मीमांसा ' [ अनुक्रमे विभाग १. ब. १०४, ब. १०५, ब. १०६ ] या लेखांतील मजकूर, त्यावर संस्कार होऊन, येथे समाविष्ट झाला आहे.

१३. ' शब्दविचार ' हा स्वतंत्र, अप्रकाशित लेख या संग्रहात आहे. त्यात हा विचार आला आहे.

( ३६ ) निर्दोषता. ( ३७ ) सदोषता.

१०. ( ३८ ) काव्यमय–अकाव्यमय शब्दवर्गीकरण. [ पृ. ११२–१२२ गद्दाळ. ]

११. ( ३९ ) मराठी भाषेच्या शब्दसंपत्तीचा विचार. ( पृ. १२३–१३१ )[14] ( ४० ) फार्सी शब्दांचे अकाव्यमयत्व.[15]

२. ( १ ) 'शब्द' या विषयावर मराठी मंडळाच्या [ स्थलनिर्देश नाही ] वार्षिक संमेलनप्रसंगी [ काल-निर्देश नाही ] पटवर्धनांनी दिलेले एक व्याख्यान या संग्रहात आहे. वहीची २४ पाने भरतील. [ आकार १६॥ × २१ सें. मी. ]. त्यात पृ. १ ते १९ या भागात शब्दांचा अर्थदृष्टया विचार केला असून पृ. १९ ते २४ 'शब्दांचा ध्वनींच्या दृष्टीने विचार' केला आहे. या उत्तर भागाचा विस्तार करून, त्यावरून पक्की प्रत करून 'शब्दांचा नाददृष्टया विचार' हा लेख 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'च्या जून १९३९ च्या अंकात प्रकाशित झाला आहे. [ विभाग १. व. १३८ ]. पूर्व भाग अप्रकाशित आहे.[16]

( २ ) 'शब्द' या व्याख्यानातील 'शब्दांचा अर्थदृष्टया विचार' या भागाची संस्कारित, पुनर्लिखित प्रत 'शब्दविचार' या नावाने यात आहे. त्याची वहीची २३ पाने [ आकार १६॥ × २१ सें. मी. ] आहेत. ( "काव्य-कुतूहल" या ग्रंथात या विषयाचा विचार झालेला आहे. ) या लेखात शब्दांचा वाचकाच्या नि लेखकाच्या दृष्टीने विचार केला आहे. यातील विषय : 'शब्दार्थविचार आधी करून शब्दनाद-विचार मागाहून करू.' असे म्हणून, या लेखात शब्दार्थविचारच केलेला आहे. शब्दाच्या अभिधा, लक्षणा, व्यञ्जना या तीन शक्तींचे सोदाहरण विवेचन. शब्दांचे जिणे लोकसंमतीवर अवलंबून असते. ( टिंगल, मोर्चा या शब्दांची उदाहरणे ). अर्थबोधास साहाय्यक होऊन शब्दाने जर नड भागविली, आणि शब्दघडणीचे स्वातंत्र्य घेणारी व्यक्ती जर समर्थ असेल, तर त्या प्रमाणात नवशब्दाला मान्यता मिळते. ( उदाहरणार्थ, नोकरशाही, प्राध्यापक, अन् ). – ललित लेखकाच्या दृष्टीने शब्दयोजनेचा विचार. भाषेतील शब्दसंग्रहाची पाहणी. – लाक्षणिक शब्द वापरण्याचे कारण. – समासविचार. – वस्तुवाचक शब्दाचे महत्त्व. – कवितेची भाषा शक्य

---

१४. यातील विचार "भाषाशुद्धिविवेक" मध्ये आले आहेत.

१५. यातील "भाऊसाहेबांच्या बखरी"तला उतारा (पृ. १३३–१३५) संस्कारित करून "भाषाशुद्धिविवेक", पृ. १२–१४ वर उद्धृत केला आहे. पुढचाही भाग "भाषाशुद्धिविवेक", पृ. १४–१५ वर आला आहे.

१६. याच वहीत वेद-उपनिषदांतील ऋचा-सूक्ते यांचे अनुवाद आहेत. "मधु-लहरी०" तील 'सामुदायिक प्रार्थने'त ( म. ल. २ ) ते समाविष्ट आहेत. "मधु-लहरी०" तील 'अनन्य ऐशा०' हा अनुवाद तेवढा या वहीत नाही.

तितकी सुबोध, स्वाभाविक हवी. – कवीला उपलब्ध शब्दसंग्रह. – वेगवेगळ्या प्रदेशांत एका अर्थी भिन्न शब्द. – कित्येकदा शब्द तोच, रूप भिन्न. – अशिक्षितांच्या बोलीतील शब्दांचा स्वीकार व्हावा. –'भाषेची शब्दसंपत्ती कशी वाढेल ही एक दृष्टी या लेखामध्ये आहे.

३. ' अलङ्कार विचार ' ही एक स्वतंत्र संचारिका आहे. तिच्यात वहीची ५७ पाने ( आकार १७×२१ सें.मी. ) आहेत. तिचाही लेखनकाल नमूद नाही. रा. श्री. जोग यांच्या " अभिनव काव्यप्रकाश "चा संदर्भ आहे. म्हणजे १९३० नंतरचा हा लेख आहे हे स्पष्ट आहे. अप्रकाशित आहे. पहिल्या पृष्ठात अलंकारांविषयी सर्वसामान्य प्रास्ताविक भाग असून पृ. १ ते ५ शब्दालंकारांचे, व पृ. ६ ते ५७ अर्थालंकारांचे विवेचन आहे. एकेक अलंकाराचे सोदाहरण विवेचन आहे.

४. वाङ्मयीन अभिरुचीवर वहीच्या ८ पानांचे एक टिपण आहे. वाङ्मयीन अभिरुचीचे स्वरूप, नाटक–कादंबरीपेक्षा काव्याचे वाचक कमी का ? बाल्य–यौवन–प्रौढ य वयोऽवस्थांत बदलत जाणारी अभिरुची यांवर हे छोटे टिपण आहे. अप्रकाशित.

५. ' रसविचार ' लेख. वहीची २९ पाने. अपूर्ण. आणखी एखादे पान असावे ' रसव्यवस्थेचे वैयर्थ्य ' आणि ' रसव्यवस्था नि आस्वाद्यमानता ' या दोन लेखांचे हे हस्तलिखित आहे. काही किरकोळ बदल करून, मांडणीत थोडा फरक करून ते लेख तयार केले आहेत.

६. ' रुद्रास आवाहन ' या आकाशवाणी भाषणाची प्रत. दोन आवृत्त्या. ७–७ पृष्ठे. लेखनकाल नाही. अप्रकाशित. ( 'रुद्रास आवाहन', साप्ता. ' प्रगति ', " काव्य-चिकित्सा ", विभाग १, व. ४६ ).

७. १९३२ मध्ये कोल्हापूरला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ( १ ) स्वागताध्यक्ष ( रावबहादुर दत्तोबा मा. भोसले ) यांचे भाषण ( वहीची ६ पृष्ठे ), आणि ( २ ) उद्घाटक ( श्रीमंत राजाराममहाराज छत्रपती ) यांचे भाषण ( वहीची ५ पृष्ठे ) यांच्या हस्तलिखित प्रती. पटवर्धनांनी ही भाषणे लिहून दिली असावीत. ( पटवर्धनांसारख्यांना संस्थानी सेवेत कशी कामे करावयाला लागत असावीत याची यावरून कल्पना येते. ) संमेलनवृत्तात ही भाषणे प्रकाशित.

८. Rubaiyat of Omar Khayyam of Naishapur. २० पाने. संपूर्ण रुबाया उतरविलेल्या आहेत. पुस्तके अनेक उपलब्ध असताना पटवर्धनांनी हा उद्योग का केला असावा लक्षात येत नाही.

९. इंग्रजी टिपणांच्या चार वह्या. वही १ : ( १ ) From ' The Changing School ', by Dr. Philip Boswood Ballard. ( २ ) From P. Gurrey's ' The Appreciation of poetry ' ( २९ पाने ). वही २ : ( १ ) बहुधा ' The Appreciation of Poetry'ची टिपणे. ( २ ) From 'Thought and Language'

by A. P. Ballard. ( ३ ) From 'Poetry in School' by Dr. Iagger (?). ( २ ) From 'Types of Aesthetic Judgement' by E. M. Barlett (?) ( ३८ पाने ). वही ४ : From 'The Psychology of Literary Appreciation' by D. C. Griffith ( पाने ३५ ).

१०. वाचनविचार. फार्सी भाषेचा वाचनविचार. मराठीत. प्रास्ताविक, आणि पुढे १० धडे. ( वहीची २६ पाने ). पुढील उल्लेखात या अभ्यासाचा संदर्भ असावा का ? 'ह्याच सुमारास फार्सी भाषेचे एक व्याकरण त्यांनी लिहावयास घेतले होते. पण उमरखय्यामचे भाषांतर पूर्ण करण्याची उत्सुकता वाढत गेल्यामुळे हेही काम अर्धवट राहिले. १९२९ साली त्यांनी 'फार्सी शिक्षक' लिहिण्याचे योजून बराचसा भाग लिहूनही काढला होता. ह्या पुस्तकाचे काम त्यांनी मध्यंतरी पुन्हा हाती घेतले होते. पण त्याचीही गत ह्या व्याकरणाप्रमाणेच झाली.' ( गं. दे. खानोलकर, 'माधव जूलियन", आ० २, पृ. १९४ ).

पटवर्धन-वाङ्मयाची ही सूची एका परीने माझ्या "माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन" या ग्रंथाची पूरणिका ठरेल. ग्रंथामध्ये पटवर्धनांच्या कवितांचे लेखनकाल, प्रकाशनांचे स्थल व काल परिशिष्टांत नोंदले आहेत ( परिशिष्ट चौथे ). पटवर्धनांच्या जीवनाची रूपरेषाही एका परिशिष्टात दिली आहे ( परिशिष्ट पहिले ). या सूचीतूनही पटवर्धनांचे समग्र दर्शन घडू शकेल.

सूचीचे काम अनेक वर्षे चालू होते. १९५८ मध्ये पटवर्धनांच्या अभ्यासाला आरंभ केला. १९६३ मध्ये पीएच. डी. मिळाली. त्या प्रबंधावर आधारलेला स्वतंत्र ग्रंथही १९७३ मध्ये प्रसिद्ध झाला. १९७७ मध्ये "समग्र माधव जूलियन" चे सह-संपादन केले. १९८० मध्ये साहित्य अकादमीसाठी तयार केलेले "माधव जूलियन" प्रसिद्ध झाले. सूचीची मुद्रणप्रत १९७४ मध्ये, "माधवराव पटवर्धन : वाङ्मय-दर्शन" च्या प्रकाशनानंतर एक वर्षानेच तयार करून ठेविली होती. पण तेव्हा प्रकाशनाचा योग आला नाही. आता पुन्हा संस्कार करून ही अद्ययावत मुद्रणप्रत तयार केली आहे. दीर्घ काळ काम चालू होते. नोंदींचे लेखनही वेगवेगळ्या काळात झाले आहे. त्यामुळे काही ठिकाणी नोंदींच्या लेखनस्वरूपात थोडा फरक पडला असण्याची शक्यता आहे. मात्र त्यामुळे सूचीच्या आकलनाला कसलाच बाध येणार नाही.

अशा प्रकारची वाङ्मय-सूची खासगी प्रकाशकांनी प्रकाशित करणे आपल्याकडील आजच्या वाङ्मयीन परिस्थितीत प्रायः अशक्यच. विद्यापीठे, संशोधन संस्था यांचे हे कार्य. पण त्यांच्याकडूनही अशी अपेक्षा आज अनाठायीच ठरेल. अनेक कारणांनी अशा परिस्थितीत, ही सूची प्रसिद्ध होतच नाही असे समजून, स्वतःपुरते तिला

पूर्णता आणण्याचे माझे काम चालले असता, एका संस्मरणीय योगायोगाने महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांची भेट झाली. अनेक विषय निघता निघता या सूचीचा विषय निघाला. त्यांना ती कल्पना आवडली. पुढे प्रत्यक्ष हस्तलिखित पाहिल्यावर त्यांना ते पसंत पडले; आणि मंडळाच्या वतीने त्यांनी प्रकाशनार्थ स्वीकृत केले. त्यांच्यामुळेच मुख्यतः ही सूची प्रकाशित होत आहे. त्यांचा मी अतिशय आभारी आहे.

अशा सूचीची छपाई हीही तशी त्रासदायक. श्री. लाटकरांनी हे काम स्वीकारले, आणि आत्मीयतेने, त्यांच्या नेहमीच्या लौकिकाला साजेशा पद्धतीने उत्तम प्रकाराने केले. हे काम नेहमीच्या कामापेक्षा किचकट, जिकिरीचे. शुद्ध मुद्रणाचा यात विशेष आग्रह. पण त्यांच्या जुळणिसांनीही या कामाचा कसला त्रास न मानता आस्थेने ते केले त्याचा, विशेषतः श्री. वरघडे यांचा मला आवर्जून उल्लेख करावासा वाटतो.

पुण्या-मुंबईसारख्या केंद्रस्थानापासून बाजूला असणाऱ्या संगनेमरात राहून असे काम स्वतःच्या मनाप्रमाणे करवून घेणे फार कठीण जाते. अनेक अडचणी येतात. मुद्रण एके ठिकाणी, संदर्भ-सामग्री वेगवेगळ्या ठिकाणी, अशा स्थितीत लगेचच्या गेच काही संदर्भ पडताळून पाहाता येत नाहीत. यामुळे सूचीला काही मर्याद पडल्या आहेत. त्याची जाणीव मला आहे, आणि त्याचा मला विषादही वाटतो. तथापी अशा काहीशा प्रतिकूल स्थितीतही जास्तीत जास्त पूर्ण, निर्दोष काम करण्याची धडपड केली आहे.

काम करण्यात कसूर केलेली नाही. इच्छा ही आहे, त्याची दखल घेतली जावी. मुद्दाम असे लिहून टेवीत आहे. केवळ या सूचीपुरतेच नव्हे, तर कोशात्मक कामे आपल्याकडे बऱ्याच अंशी दुर्लक्षित राहातात. ही प्रवृत्ती दूर व्हावी एवढ्यासाठीच हा उल्लेख केला. माझ्यापुरते मी काम चोख केले आहे, आणि मी मोकळा झालो आहे.

ही सूची श्री. रा. बि. मराठे यांना अर्पण केली आहे. 'त्याच्या गुणांचे वर्णन करण्यापेक्षा कृतज्ञतापूर्वक स्मरण करणेच बरे.' म्हणून छपन्न वर्षांपूर्वी पटवर्धनांनी आपल्या या 'अप्रसिद्ध मित्रा' च्या नावाची केवळ आद्याक्षरेच [रा. बि. म.] जाहीर करून त्यांना "विरहतरंग" अर्पण केले होते. त्यानंतर चाळीस वर्षांनी श्री. मराठे यांनी 'ज्यांच्याशी माझा स्नेह झाल्यामुळे अशा तऱ्हेच्या उद्योगाबद्दल मला गोडी उत्पन्न झाली व आपण प्रत्यक्ष काही करावे असे वाटू लागले' असे म्हणून आपला "इंग्रजी मराठी स्थापत्य-शिल्प-कोश" 'माधव ज्यूलिअन यांच्या प्रेमळ स्मृतीस' अर्पण केला होता. "विरहतरंगा" च्या वेळचा हा 'अप्रसिद्ध मित्र' आता माधवराव पटवर्धनांच्या जीवनविषयक व वाङ्मयविषयक अभ्यासाला प्रारंभिक महत्त्वाचे साधन म्हणजे

पटवर्धनांचा पत्रव्यवहार उपलब्ध करून देणारा 'सुप्रसिद्ध मित्र' म्हणून पटवर्धनांच्या चाहत्यांचे, अभ्यासकांचे कुतूहलाचे, आदराचे स्थान झाला आहे. त्यांना ही " डॉ. माधवराव पटवर्धन : वाङ्मय-सूची " अर्पण करण्यात मला विशेष आनंद होत आहे.

संगमनेर महाविद्यालय, संगमनेर, ४२२६०५ सु. रा. चुनेकर
२९ नोव्हेंबर १९८३ ( माधवराव पटवर्धन-स्मृतिदिन )

## सूचीच्या मांडणीचे स्पष्टीकरण

सूचीतील माहितीचा क्रम पुढीलप्रमाणे आहे—

विभाग १ : ( १ ) ग्रंथ—ग्रंथनाम / प्रकाशक / मुद्रक / प्रकाशन–काळ / पृष्ठ संख्या / आकार / मूल्य.

( २ ) लेख, पत्रे, भाषणे वगैरे—लेखशीर्षक / प्रकाशन-स्थळ / प्रकाशन-काळ / पृष्ठ.

विभाग २ : ( १ ) ग्रंथ—ग्रंथनाम / लेखक-नाम / प्रकाशक / मुद्रक / प्रकाशन-काळ / पृष्ठसंख्या / आकार / मूल्य.

( २ ) लेख – लेखशीर्षक / लेखक-नाम / प्रकाशन-स्थळ व काळ / पृष्ठ.

यांतील काही नोंदी जर उपलब्ध झालेल्या नसतील तर नोंदीतील पुढच्या क्रमाची माहिती येते.

उपलब्ध जास्तीत जास्त माहिती नोंदवून ठेवण्याचे धोरण ठेविले आहे.

% %

# डॉ. माधव त्र्यंबक पटवर्धन (माधव जूलियन) : जीवनपट

१८९४, जानेवारी २१ : जन्म ( बडोदे येथे आजोळी )

१८९४–१९०३ : बालपण. पहिली चारपाच वर्षे प्रायः गुजरातमध्ये ( बडोदे, भडोच इत्यादी ठिकाणी ). पुढील चारपाच वर्षे पटवर्धनांचे मूळ गाव आवळस ( मुळशी पेटा, पुणे जिल्हा ) येथे राहून प्राथमिक मराठी शिक्षण.

१९०३ : आवळस येथे व्रतबंध होऊन बडोद्यास प्रयाण.

१९०९ : मॅट्रिक्युलेशन.

१९१८ एप्रिल : एम्‌ ए. ( फार्शी–इंग्रजी ).

१९१८ जून–१९२५ ऑक्टोबर : डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणे, मध्ये अध्यापन. प्रारंभी न्यू इंग्लिश स्कूलमध्ये अध्यापक. जून १९१९ पासून फर्गसन महाविद्यालयात फार्शी, इंग्रजी या विषयांचे अध्यापन.

१९२४, जून १७–१९२६, एप्रिल २४ : खानदेश एज्युकेशन सोसायटी, अमळनेर, या संस्थेच्या प्रताप हायस्कुलात शिक्षक.

१९२४, जून २०–१९२५, ऑक्टोबर : डेक्कन एज्युकेशन सोसायटीतून निर्वेतन रजेवर.

१९२५ ऑक्टोबर : डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा राजीनामा.

१९२६, एप्रिल २५ - १९२६, जुलै ३१ : पुण्यात. अनिश्चित जीवन. नोकरी नाही.

१९२६, ऑगस्ट १–१९२८, जून १५ : महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी, पुणे, या संस्थेच्या भावे हायस्कुलात शिक्षक.

१९२८, मे २९ : विवाह, कु. गंगुबाई गरुड यांच्याशी.

१९२८, जून २०–१९३९ : राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर, येथे फार्शीचे प्राध्यापक.

१९३३, सप्टेंबर १६, १७ : अध्यक्ष, महाराष्ट्र कविसंमेलन, नाशिक.

१९३४, डिसेंबर २४, २५, २६ : अध्यक्ष, काव्यशाखा, महाराष्ट्र साहित्य संमेलन, बडोदे.

१९३६, नोव्हेंबर १०, ११ : अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य संमेलन, जळगाव.

१९३९, फेब्रुवारी १५ : डी. लिट्‌. ( "छंदोरचना" ग्रंथास. मुंबई विद्यापीठ ).

१९३९, नोव्हेंबर २९ : लिव्हर कॅन्सरने पुणे येथे मृत्यू.

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | ९ | जघन्यवृत्ती | जघन्यवृत्ती |
| १८ | ७ | महाप्रस्थात | महाप्रस्थान |
| २० | ३ | १९ नोव्हेंबर | २१ नोव्हेंबर |
| २२ | १६ | अतिशयोक्ती. | अतिशयोक्ती |
| २५ | ३० | बाघक | बाधक |
| ३७ | २९ | जून १९३९ | एप्रिल १९३९ |
| ४९ | १५ | (१) | (२) |
| ७१ | २ | २२ + १४ | २२ × १४ |
| ७१ | ९ | २२ + १४ | २२ × १४ |
| ७४ | २१ | प्रयत्न. ] | प्रयत्न. |
| ८५ | १७ | यांच्या कंसात. | यांच्या, कंसात |
| १०० | ८ | समजत | समज |
| १०१ | १ | अनुषंगाने | अनुषंगाने विवेचन |
| १०४ | ३१ | व्याथ | व्यथा |
| ११४ | १८ | खळाली | खळाळी |
| १२० | १६ | (१) | [ हा अंक नको. ] |
| १२७ | १ | ४७८ | ५७८ |
| १३४ | १३ | क्र. ३. ८४ | क्र. क. ३. ८४ |
| १५० | २० | क्र. ४. ब. ३५ | क्र. ब. ४.३५ |
| १५८ | २३ | त्रयस्याच्या | त्रयस्थाच्या |

विभाग पहिला

# डॉ. माधवराव पटवर्धन यांचे वाङ्‌मय

## ग्रंथ

### गद्य

**१. फार्शी–मराठी–कोश :** भारत–इतिहास–संशोधक–मंडळ–स्वीय–ग्रंथमाला, क्र. २९ / दत्तो वामन पोतदार, गंगाधरराव नारायणराव मुजुमदार, चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणे / अनंत विनायक पटवर्धन, आर्यभूषण छापखाना, पुणे / २३ डिसेंबर १९२५ / पृ. २ ( प्रस्तावना ) + ३२ ( उपोद्घात इ. )+२८०+३६ ( शब्दसूची )/ १४×२१॥ / ४ रु.

[ या आधी ( १ ) भाऊसाहेबांची बखर, संपा. काशिनाथ नारायण साने, आ.४, १९२२, याला पटवर्धनांनी तयार केलेला अरबी व फारसी शब्द किंवा त्यांची अपभ्रष्ट रूपे यांचा वर्णानुक्रमाने लघुकोश, व ( २ ) आज्ञापत्र, संपा. अनंत आत्माराम मोरमकर, याला पटवर्धनांनी तयार केलेला ' अरबी, फारशी व तुर्की शब्दांचा कोश' हे जोडले आहेत ].

या कोशास फार्शी-मराठी कोश म्हटले असले तरी त्यात फार्शीद्वारा मराठीत अरबी, तुर्की शब्दांचाही समावेश आहे. मराठी लिखाणातील फार्शी शब्दांचा संदर्भ पाहून व त्यांचा तौलनिक दृष्टीने अभ्यास करून हा कोश तयार केला आहे. मध्यकालीन मराठीत म्हणजे स्थूल मानाने एकनाथापासून प्रभाकरापर्यंत होऊन गेलेल्या लेखकांच्या लिखाणात आढळणारे आणि पटवर्धनकालीन बोलीत ऐकू येणारे फार्शी शब्द या कोशात समाविष्ट करण्याचा प्रयत्न केलेला आहे. विस्तृत ' उपोद्घाता 'त मराठी लेखनपद्धती, फार्शीतून मराठीत आलेल्या शब्दांचे विशेष, व्युत्पत्तिविचार, फार्शीतून मराठीत आलेले व्याकरणविशेष, शब्दसिद्धी आदींचा विचार.

**२. छन्दोरचना :** वा. गो. परांजपे, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / १९२७/ ८ + २४० / १२ × १८ / २ रु.

मराठी छंद आणि जाति यासंबंधी सोपपत्तिक व सोदाहरण छाननी. प्राचीन संस्कृत व प्राकृत वृत्तांची ( आणि अरबी वृत्तांचीही) माहिती. काव्याच्या जडांगाचा विचार

पूर्ण व्हावा म्हणून पद्यातील व्याकरणविशेष व पद्याची भाषा ही प्रकरणे घातली असून ‘ प्रस्ताव ’ या प्रकरणात कवीचे निरंकुशत्व वगैरे काव्यरचनानुषंगी विषयांचा ऊहापोह केला आहे.

आ० २ / मं. ना. कुलकर्णी, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई / कर्नाटक प्रिंटिंग प्रेस, मुंबई / १९३७ / २८ ( सिंहावलोकन, अनुक्रमणिका इ. ) + ५९८ / १२×१८/ ४ रु.

भरत-पिंगलादी संस्कृत छन्दःशास्त्रकारांचे ग्रंथ अभ्यासून आणि संस्कृत नि मराठी प्राचीन–अर्वाचीन वाङ्मय डोळयाखाली घालून पुष्कळच नवीन सामग्री मिळवून, जुळवून “छन्दोरचने”ची ही आवृत्ती अथपासून इतिपर्यंत नवीनच लिहून काढलेली आहे. ‘ पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना ’ या तत्त्वाप्रमाणे, पद्यरचना ही वृत्तस्वरूप असो, जातिस्वरूप असो, वा छन्दः स्वरूप असो, ती कशी सम, अर्धसम आणि विषम असू शकते ते या ग्रंथात विस्ताराने दाखविलेले आहे. प्रारंभीच्या दोन अध्यायांत काही पद्यरचनाविषयक प्रश्नांचा विचार केला असून शेवटच्या अध्यायात छन्दः-शास्त्राचा इतिहास सांगितला आहे.

३. **पद्यप्रकाश** : म. ना. कुलकर्णी, कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई / कर्नाटक, मुंबई / १९३८ / २ (प्रस्तावना) + ४ (संक्षेप, अनुक्रमणिका इ.) + १३२ / १२ × १८ / बारा आणे.

मराठदेशात चालू असलेल्या पाठ्य पुस्तकांतील पद्यप्रकारांची शुद्ध स्वरूपे समजण्यास साह्य व्हावे म्हणून हे पुस्तक लिहिण्यात आले आहे. हे पुस्तक अभ्यासिल्याने वृत्त, जाति नि छन्द या तिन्ही वर्गातील महत्त्वाच्या पद्यप्रकारांचे ज्ञान तर होईलच, पण या शास्त्रांतही चांगला प्रवेश होईल.

४. **भाषाशुद्धि-विवेक** : ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / १ एप्रिल १९३८ / ८ (प्रस्ता.) + २०१ / १२ × १८ / १ रु.

भाषाशुद्धिविषयक लेख व भाषणे यांचा संग्रह. शेवटी बहिष्कार्य शब्दांचा कोश.

५. **काव्यविहार** : मनोहर ग्रंथमाला प्रकाशन ४७ / म. म. केळकर, पुणे / न. वि. सरदेशपांडे, आदर्श, पुणे / २९ नोव्हें. १९४७ / ३ (प्रस्ता.) + १९३ / १२ × १८ / ४ रु.

कवि-परिचयपर, आणि काव्य-चिकित्सापर लेखांचा व भाषणांचा संग्रह.

६. **काव्यचिकित्सा** : संपादक गं. दे. खानोलकर / स. कृ. पाध्ये / व्हीनस, पुणे / वि. पु. भागवत, मौज, मुंबई / नोव्हेंबर १९६४ / ८ + १८५ / १२ × १८ / ६ रु.

‘ प्रगति ’ साप्ताहिकातील ‘ काव्यचिकित्सा ’ लेखमाला, व वाङ्मयविषयक निवडक स्फुट लेख यांचा संग्रह.

## पद्य

### दीर्घकाव्ये

७. **विरहतरङ्ग** : संपादक व प्रकाशक चिं. रा. देवधर, पुणे / ग. का. गोखले, गणेश प्रिंटिंग वर्क्स, पुणे / ९ सप्टें. १९२६ / १० (प्रस्ता.) + ४१ / १२ × १८ / आठ आणे.

इंदू आणि प्रभाकर यांच्या प्रीतीची हळवी कहाणी.

आ० २, ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / जुलै १९३३ / ६ + १० + ३८ / १२ × १८ / आठ आणे. संस्कारित आवृत्ती.

आ० ३ (सप्टें. १९४८) पासून प्रा. रा. श्री. जोग यांचे संपादन; 'परामर्श'; आ० १ व २ यांची पाठभेदसहित आवृत्ती; टीपा. आ. ४ (१९५३) मध्ये 'मेघदूत आणि विरहतरङ्ग' हा प्रा. रा. श्री. जोग यांचा लेख (पृ. ११८–१२८).

आ० ७. व्हीनस, पुणे / श. म. देव, सुलभ, पुणे / एप्रिल १९७१ / ६–१५ (माधव जूलियन यांनी दुसऱ्या आवृत्तीस लिहिलेली प्रस्तावना) + १६ – ४५ ('परामर्श', रा. श्री. जोग, वाढवलेला) + ४६ – ४७ (शब्दलेखनविषयक टिपण) + ४७ – ४८ ('विरहतरंग'विषयक वाङ्मय) + १ - ६२ (काव्य) + ६३–१०४ (टीपा).

८. **सुधारक** : वा. गो. परांजपे / आर्यसंस्कृति पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / १९२८ / ६ + १८ ('प्रवाहपतिताचे तरङ्गारोहण' माधव जूलियनांची प्रस्तावना) + १७६ / १२ × १८ / १॥ रु.

धासु राजे या धीरोदात्त नायकाचे चरित्र. सामाजिक उपरोधकाव्य.

आ० २ / नवीन किताबखाना, पुणे.

आ० ३ / स. कृ. पाध्ये, व्हीनस, पुणे / वि. ग. माटे, विश्वकर्मा, पुणे / मार्च १९६२ / ३ – ११ ('आवाहन', रा. श्री. जोग) + १३ – २८ ('प्रवाहपतिताचे तरङ्गारोहण', माधव जूलियन) + ३ – १९२ (काव्य) + १९३ – १९६ (कै. वै. का. राजवाडे यांचे पटवर्धनांना पत्र व त्याला पटवर्धनांचे उत्तर) + १९७–२२० (टीपा).

९. **तुटलेले दुवे म्हणजेच सुनीताञ्जलि** : ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / २१ जाने. १९३८ / ७ – ९ (प्रस्ता.) + १०१ (काव्य) + १०२ – १०४ (टीपा) / १२ × १८ / १ रु.

१९१२ पासून १९३८ पर्यंतच्या काळातील बहुतेक सुनीतांचा संग्रह. १०१ सुनीते. एका कवीची–शारदा-किंकराची ही दैनंदिनी. वेगवेगळ्या काळी लिहिलेल्या सुनीतांना

एका कथासूत्रात गुंफण्याचा प्रयोग.

१०. **नकुलालङ्कार** : श्री. वि. दामले, एन् के. पब्लिशिंग हाऊस, पुणे / गो. ब. जोशी, आनंद, पुणे / २९ मे १९३९ / १–८ ( सम्पादणी ) + १ – २ ( अनुक्रमणिका ) + १ – १०१ ( काव्य ) + १०२ ( अधिक टीपा ) / १२ × १८ / १ रु.

कविभूषण कविकल्पद्रुम दण्डी म्हणजेच रा. ब प्रो. भय्यासाहेब नकुलराव दण्डे कुलकर्णी यांचे यशस्वी जीवन भविष्यपुराणावरून. लटपट्या मनुष्य समाजात कसा लब्धप्रतिष्ठित होतो, आणि तो आपल्या पायाखाली काय जळत आहे हे न पाहता शिष्टपणाने दुसऱ्या दुबळ्या लोकांवर कशी आग पाखडू शकतो हे दाखविणारे उपहासात्मक दीर्घकाव्य.

## भाषांतर

११. **उमरखय्यामकृत रुबाया** : वा. गो. परांजपे, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / १५ ऑगस्ट १९२९ / १ – १७ ( प्रस्तावना ) + १८ – २० ( अनुक्रमणिका ) + १ – १०६ ( काव्य ) + १– ६ ( टीपा ) + १ ( फित्झजेरल्डची सूची ) / १२ × १८ / १॥ रु.

उमरखय्यामच्या मूळ फार्शी रुबायांचे झळझळीत भाषांतर. एकूण ५२४ रुबाया. प्रस्तावनेत भाषांतराचे महत्त्व, उमरखय्यामचा संप्रदाय, उमरखय्यामची चरित्रविषयक माहिती, फार्सी कवितेची अप्रागतिकता, रुबाई म्हणजे काय? रुबायांच्या मूळाची अवस्था, उमरखय्यामचे विचार, वगैरे मुद्यांचा परामर्श.

१२ **द्राक्षकन्या** : सी. वा. फडणीस, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / १५ ऑक्टो. १९३१ / १ – १८ ( प्रस्तावना ) + १ – ७७ ( इंग्रजी व मराठी रुबाया ) + ७८ – ८४ ( टीपा ) / १२ × १६॥ / बारा आणे.

एडवर्ड फिज्जेरल्डकृत Rubaiyat of Omar Khayyam of Naishapur या जगप्रसिद्ध काव्याच्या पहिल्या आवृत्तीचे निव्वळ भाषांतर. प्रस्तावनेत उमर, त्याचे काव्य, फिज्जेरल्डचा अनुवाद, त्याच्या मोहिनीची मीमांसा, भाषांतरविषयक मते वगैरे मुद्यांचा परामर्श.

## स्फुटकाव्य

१३. **गज्जलाञ्जलि** : ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे / २९ मे १९३३ / ६+६ ( प्रस्तावना ) + ४ + १४० / १२ × १८ / १ रु.

अरबी–फार्सी वृत्तांतील माधव जूलियनांची सारीच रचना प्रस्तुत 'गज्जलाञ्जली'त पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहे. १०८ गज्जल. सुरुवातीला गज्जल या काव्य-

प्रकाराविषयी विवेचन करणारी प्रस्तावना.

आ० २ / नवीन किताबखाना, पुणे/गो. ब. जोशी, आनंद, पुणे/फेब्रुवारी १९४७/ ८+१+२+५+१०४ / १०॥ × १६॥ / २ रु.

१४. **स्वप्नरञ्जन** : ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति, पुणे / आर्यसंस्कृति, पुणे/२७ नोव्हें. १९३४ / ८+१६४ / १२×१८ / १॥ रु.

गज्जलाञ्जलि व सुनीताञ्जलि वगळून बहुतेक स्फुट भावकवितांचा संग्रह.

आ० २ / स. कृ. पाध्ये, व्हीनस बुक स्टॉल, पुणे / श्री.र. राजगुरु, पुणे / १९४९/ ८+१-२३ ( 'माधवरावांची स्वप्नभूमि', शं. के. कानेटकर यांची प्रस्तावना )+१-१५९ ( ११३ कविता )+ १६० (कठिण शब्दांचे अर्थ)+ १६१-२१९ (टीपा)+ २२० - २२२ ( माधव जूलियनांच्या भाषांतरित कवितांची मुळे )+ २२३ ( छंदोरचनाविषयक माहितीपर टीप )+ १ - ४ ( प्रथम-चरणांची सूची ) / १२×१८ / २ रु.

आ० ३ / जुलै १९६७ ( पुनर्मुद्रण ) / ६ रु.

१५. **मधुलहरी व इतर कविता** : स. कृ. पाध्ये, व्हीनस बुक स्टॉल, पुणे / वि.ग. केतकर, लोकसंग्रह, पुणे / सप्टें. १९४० / २४ ( निवेदन—लीलाबाई पटवर्धन, विनंति—न. चिं. केळकर, पण्डित कवि माधवराव पटवर्धन-चरित्र व काव्यविषयक टिपण, कवि माधव जूलियन यांचे हस्ताक्षर इ. )+ १ - १८ ( फिज्जेरल्डकृत उमर खय्यामच्या रुबायांच्या अनुवादाच्या चवथ्या आवृत्तीचे भाषांतर )+ १९ - ६५ ( 'इतर कविता' २८ कविता )+ ६७ - ७१ ( टीपा, शब्दार्थ व स्पष्टीकरण ) / १२×१८ / १ रु.

पटवर्धनांच्या पश्चात प्रकाशन.

१६. **स्वप्न-लहरी** : संपादक गिरीश / कॉन्टिनेन्टल, पुणे / राजगुरु, पुणे / १९५३ / २४ ('स्वप्नांचा सुगंध', गिरीशांची प्रस्तावना इ.)+ १ - ११९ ( कविता )+ १ - ८० ( टीपा इ. ) / १२×१८/५ रु.

आ० २ - १९६६ / ६ रु.

माधव जूलियन यांच्या निवडक कवितांचा संग्रह.

१७. **समग्र माधव जूलियन** : संपादक : रा. श्री. जोग, द. न. गोखले, सु. रा. चुनेकर / स. कृ. पाध्ये, व्हीनस प्रकाशन, पुणे / चिं. स. लाटकर, कल्पना मुद्रणालय, पुणे / २१ जानेवारी १९७७ / १४ × १२ / १५० रु. ( याशिवाय डीलक्स आवृत्ति ). - खंड १ : स्फुट काव्ये. पृ. ५-७ ('संपादकीय निवेदन', रा. श्री. जोग ), पृ. ८-२९ ( प्रस्तावना, 'माधव जूलियन यांची स्फुट कविता', द. न. गोखले ) / डॉ. माधवराव पटवर्धन यांचा जीवनपट, हस्ताक्षर / एकूण पृष्ठे ५४२ / परिशिष्टे :

'स्वप्नरंजन' व 'गज्जलांजलि', 'तुटलेले दुवे', 'अवशिष्ट कविता' यांचे स्थल-काल-निर्देश / 'वृद्ध भट' (भिन्न पाठ), 'गज्जलांजलि' चा लगक्रम, शब्दार्थ-कोश. – खंड २ : खण्डकाव्ये. पृ. ५–८ ('संपादकीय निवेदन', रा. श्री. जोग), पृ. ९–३८ (प्रस्तावना, 'माधव जूलियन यांची खण्डकाव्ये', सु. रा. चुनेकर) / एकुण पृष्ठे ६५० / परिशिष्टे : द्राक्षकन्या-मधुलहरी-उमरखय्यामकृत रुबाया यांतील रुबायांचे तुलनात्मक कोष्टक / शब्दार्थ-कोश / प्रकाशन-इतिहास.

%%

## लेख, पत्रे, भाषणे वगैरे[1]

### १. स्वतःसंबंधी लेख

१. प्रो. माधव त्र्यम्बक पटवर्धन : " मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण-प्रबंधकार ", संपादक मो. स. मोने / १९२७ / २ पृष्ठे.

स्वचरित्रविषयक त्रोटक टिपण. (१) नोकरीत ताबडतोब शिरण्याच्या दृष्टीने वडिलांनी फार्सी घेण्याची जबरदस्ती केली. पण मामांचे प्रोत्साहन, आनुवांशिक आग्रही व महत्त्वाकांक्षी स्वभाव, एका उदार नातलगाची सक्रिय सहानुभूति, आणि मुख्यत्वे शिष्यवृत्त्या, शिकवण्या यांतून पदवीधर झाले. ( २ ) डेक्कन एज्युकेशन सोसायटीत प्रवेश. निकराचा बेबनाव. १९२५ त राजीनामा. लेख व ग्रंथ यांच्या प्रकाशनाचा इतिहास.

२. मी व माझे लेखन : अरुण, व. ४, अं. १२, फेब्रुवारी १९२९ / समाविष्ट, " मी आणि माझे लेखन ", संपादक मो. ग. रांगणेकर, १९४३, पृ. ११–१३.

जुलै १९२८ पासून ' अरुण 'मध्ये लेखमाला. संपादकांनी दिलेल्या १२ प्रश्नांच्या अनुरोधाने ही लेखमाला. यांत २८ प्रसिद्ध लेखक–कवींची उत्तरे. यात माधवराव पटवर्धन, गिरीश, यशवंत, माडखोलकर हे रविकिरण मंडळांतील सदस्य.

( १ ) स्फुट लघुकाव्यांत आवडती ' वाग्यत मोहिनी ', नवतीच्या आनंदासाठी ' विरहतरङ्ग ' प्रिय, अन्यायी जगाच्या आठवणीसाठी ' सुधारक '. ( २ ) मध्यवर्ती कल्पना स्वतंत्र. विस्तारताना अनुभवांचा फेरफाराने उपयोग. ( ३ ) लेखन मंदावण्याचे कारण पुढे पुढे कल्पना सुचूनही टाक हाती घेण्याचा कंटाळा येतो. स्फूर्तीचा अभाव नव्हे, शिस्तीचा अभाव होय. ( ४ ) तद्रूप होण्यासाठी बाह्य गोष्टींची प्रेरणा जरूर

१. * अशी खूण असलेले लेख उत्तर–प्रत्युत्तर स्वरूपाचे आहेत.
□ अशी खूण असलेले लेख " काव्यचिकित्सा "मध्ये समाविष्ट आहेत.
+ अशी खूण असलेले लेख " काव्यविहार "मध्ये समाविष्ट आहेत.
• अशी खूण असलेले लेख " भाषाशुद्धि-विवेक "मध्ये समाविष्ट आहेत.

नाही. ( ५ ) शोकान्त वा विनोदी अशी रचना मला साधत नाही. ( ६ ) काव्य-लेखनाला आरंभ १९१० साली. ( ७ ) नाटक, कादंबरी यांवर उपजीविका शक्य; काव्यावर नाही. ( ८ ) कवि–टीकाकार संबंध-टीकाकारांच्या टीकेचा योग्य तऱ्हेने फायदा होतो

३. **पटवर्धन–बेहेरे वाद** : साप्ता. 'प्रगती'तून ३ डिसेंबर १९३१ ते २४ डिसेंबर १९३१ या चार अंकांतून पटवर्धन आणि प्रो. बेहेरे यांचा वैयक्तिक पातळीवर वाद झाला. 'केशवसुत' या निबंधातील [ अ. म. वा. सेवक, खड. १ ] 'केशवसुत नावाचा प्रो. बेहेरे यांनी केलेला अपहार स्तुत्य वाटत नाही' अशा आशयाच्या पटवर्धनांच्या विधानाने संतापून बेहेरे यांनी 'अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवकातील 'केशवसुत' चरित्र' हा लेख लिहून वादाला आरंभ केला. यावर 'टोपण नावाचा अपहार आणि प्रो. बेहेरे' हा पटवर्धनांनी लेख लिहिला [ १० डिसेंबर १९३१ ]. यावर बेहेऱ्यांचा लेख 'प्रो. पटवर्धन यांचा खोडसाळपणा'. अखेर 'अवभृथस्नान' हा पटवर्धनांचा लेख [ २४ डिसेंबर १९३१ ]. या उत्तर-प्रत्युत्तरीं वैयक्तिक आरोप-प्रत्यारोप झाले. परस्परांचे चारित्र्य निघाले. काही मोघम उल्लेख स्वतःकडे लावून घेऊन बेहेऱ्यांनी पटवर्धनांना फर्गसन–कॉलेज प्रकरणाची आठवण दिली. स्वभाव, वर्तन यांवर शिष्टपणा, अहंमन्यता यांसारखे इतरही आरोप केले. प्रौढ शब्दांत शिव्या देण्यापर्यंत तोल सुटला होता स. प. कॉलेजचे प्रो. रा. प. सबनीस, मो. शा. शहाणे यांनीही प्रातिनिधिक मतप्रदर्शन केले. संपादकांनीहि खुलासा केला. बहुतेकांनी बेहेऱ्यांचे लिखाण अनुचित ठरवले. तथापि पटवर्धनांनाही तोल न सोडण्याच्या सूचना झाल्या.

४. **माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावर परिणाम** : साप्ता. 'सकाळ', मंगळवार दि. १५ मे १९३४.

महत्त्वाचा, विस्तृत ( सुमारे १० स्तंभ ) लेख. या मालेत यापूर्वी यशवंत, वा. म. जोशी, ना. सी. फडके, ना. ह. आपटे यांचे लेख.

लेखनात चरित्र शोधणारे टीकाकार, स्नेही यांविषयी अत्यंत कटु उद्‌गार. भाषा-शुद्धिवगैरेसंबंधी भूमिका. स्वतःच्या कष्टप्रसव भाषाशैलीची जाणीव. काव्यलेखनाचा आरंभ, संस्कार. 'माझ्या काव्याची निर्मिति आत्मप्रकटीकरणासाठी आणि मूलतः आत्मरंजनासाठी.' 'माझी कृति आत्मप्रकटनार्थ आहे, तथापि आत्मचरित्रपर नाही.'

५. **प्रो. पटवर्धन यांची विचारसरणी** : 'विजय' ( सांगली ), २५ नोव्हेंबर १९३६ / मुलाखत १॥ स्तंभ.

नवमतवाद, परिषद–संमेलनवाद, रशियातील धर्मबंड यांसंबंधीची पटवर्धनांची विचारसरणी.

६. **मी व माझे टीकाकार :** ज्योत्स्ना, एप्रिल १९३७ / पृ. ७–१६.

महत्त्वाचा, विस्तृत लेख. आरंभींच्या प्रकाशनाचा इतिहास. काही अप्रसिद्ध व्यक्तिगत घटनांचा सूचक संदर्भ. लेखात ज्याप्रमाणे कृतज्ञता आहे त्याप्रमाणे बऱ्याच टीकाकारांबाबत कडवटपणा आहे.

( १ ) टीकाकार व टीका यांचे कार्य, योग्यता. ( २ ) ' पहिला टीकाकार माझा मीच. इतरांच्या टीकेचा ताटस्थ्याने विचार करू शकतो. प्रकाशनापेक्षा परिष्करणाचे महत्त्व अधिक वाटू लागले. ' " विरहतरंगा " वर प्रकाश टाकणारी काही महत्त्वाची विधाने. " सुधारक " पर्यंतच्या टीका कठोर असल्या तरी प्रामाणिक होत्या. यानंतर मात्र संतापार्ह जघन्यवृत्ती दिसू लागली. गज्जलांजलि, स्वप्नरंजन यांवरील अभिप्रायांत सामान्यतः अभ्यासाचा नि सूक्ष्म दृष्टीचा अभाव दिसतो. टीकाकाराकडून अपेक्षा.

[ या लेखावर डॉ. रा. चिं. श्रीखंडे यांचा प्रतिवादात्मक लेख- ' पटवर्धन व त्यांचे काही टीकाकार ', ' ज्योत्स्ना ', मे १९३७. संदर्भ, ' पटवर्धनविषयक वाङ्मय ', क्र. क. २–२०. ]

## २. स्वतःच्या काव्यकृतींविषयक प्रस्तावना, लेख इत्यादि

७. **प्रस्तावना :** मधुमाधव, २० ऑक्टो. १९२४.

विठ्ठलराव घाटे व माधव जूलियन या उभयतांची मिळून. दोन परिच्छेद

बारा वर्षांपूर्वीच्या, बडोद्यातील विद्यार्थिदशेतील आठवणी, संकल्प यांचे स्मरण. ' आम्ही सांप्रदायिकही नाही. साहाजिक स्फूर्तीने आमच्या मग्दूराप्रमाणे जी काव्य-रचना आमच्याकडून झाली ' ती येथे सादर केली आहे.

८. **प्रस्तावना** ( १ सप्टें० १९२६ ) : विरहतरङ्ग / आ. १, प्रका. ९ सप्टें. १९२६/ ९ पृष्ठे.

( १ ) र. कि. मंडळाची प्रकाशनव्यवस्था. मंडळाची माहिती. मनोरमाबाई रानडे यांना आदरांजली. मंडळाच्या निधीतून पैका खर्च करून मंडळानेच पुस्तक प्रकाशित करण्याचा नियम काढून टाकला. सर्व सदस्यांचे लिखाण असावे हाही नियम शिथिल करावा लागला. मंडळाचा जन्म, धोरण, स्वरूप, उद्दिष्ट. ( २ ) काव्यविषयक भूमिका इत्यादी. ( परिष्करण करून ' विरहतरंग 'च्या द्वितीय आवृत्तीत समाविष्ट ).

९, **' शारदेचा विश्रब्ध विहार '**[१] : प्रतिभा, ६ सप्टें. १९३५. या सदरात

१. **विश्रब्ध शारदा :** संपादक ह. वि. मोटे / मोटे प्रकाशन, मुंबई / १९७२ / पृष्ठे ३९३-३९४ वर पुनर्मुद्रित. ज्या पत्राला हे उत्तर ते वा. ना. देशपांडे यांचे ७ फेब्रु. १९२७ चे पत्रही पृ. ३९०–३९३ वर मुद्रित.

पटवर्धनांचे ‘ विरहतरंगा ’ बाबत महत्त्वाचे पत्र. १८ फेब्रु. १९२७ चे.

अभिनंदन करणाऱ्या व शंका विचारणाऱ्या पत्राला उत्तर. ( १ ) सागुतीच्या उल्लेखाचे औचित्य. प्रिय मनुष्याचे अनुकरण व्यक्ती वेडेपणाने करते. नायिका ब्राह्मण नाही. तात्यांचे सहिष्णुत्व सूचित होते. वाङ्मयात संकुचित सोवळेपणा नको. ( २ ) नायक-नायिकेचे अखेर लग्न झाले असे म्हटलेले नाही. दोघांचेही स्थानांतर झाले. ( ३ ) इंदू विवाहसंस्थेला अनुकूल नाही असे नाही. तिच्या आयुष्यात काहीतरी गूढ. पतीची प्रतिमा का नाही ?

१०. **प्रस्तावना :** विरहतरङ्ग, आ. २ ( १५ जून १९३३ ) प्रका. / १५ जुलै १९३३ / पृष्ठे ९.

पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत अधिक–वजावाट करून ही प्रस्तावना. प्रथम–प्रकाशनानंतरच्या टीका, अभिप्राय यांची थोडी दखल घेतलेली दिसते. पटवर्धनांची वाङ्मयविषयक अनेक मते या प्रस्तावनेत. वाङ्मय, प्रेम, विवाह, समाज यांवर स्वतंत्र निबंध म्हणूनही प्रस्तावना लक्षणीय.

( १ ) प्रस्तुत काव्याचा विषय. पात्रांच्या भूमिकांचे स्पष्टीकरण. प्रतिभा, प्रथम-पुरुषी लेखन यांसंबंधी सूचना. ( २ ) प्रेमभावनेचे जीवनातील महत्त्व. प्रेमकाव्ये–त्यांवरील टीका. प्रेमकाव्याचे समर्थन. प्रेम आणि विवाह. ‘ शरीरसंबंध हा प्रेमाचा आद्य व अंतिम हेतु असलाच पाहिजे असे नाही. ’ प्रेमकाव्याच्या प्रसाराच्या मर्यादा. ( ३ ) ‘ सौंदर्याचे अन्वेषण करून ते इतरांस प्रतीत करून देणे हे ललितकलेचे आद्य कर्तव्य ठरते. ’ ( ४ ) बाह्य परिवेष. भाषादृष्ट्या प्रस्तुत काव्य प्रयोगावस्थेत. ( ५ ) समारोप. या काव्याच्या रचनेचा इतिहास.

११. **प्रवाहपतिताचे तरङ्गारोहण :** प्रस्तावना, सुधारक, ( २१ जाने. १९२८ ) / प्रका. फेब्रु. १९२८ / १८ पृष्ठे.

पटवर्धनांचे सामाजिक विचार, विवाह आणि समाज, प्रेमविचार यांसाठी महत्त्वाची. “ विरहतरङ्ग ”च्या आणि या प्रस्तावनेत काही विचारांची पुनरावृत्ती. काही उद्‌गारांत वैयक्तिक अनुभवांचा पडसाद ऐकू येतो. एक विफल कटुता.

( १ ) एक तृतीयांश भाग टीकाकार आणि टीका यांविषयी. प्रस्तावनेच्या तत्कालीन टूमीवर टीका. टीकाकाराचे कार्य. वाचक-लेखक अशा दोघांकडून त्याच्यावर अन्याय. प्रांजल प्रतिकूल टीकेचे समर्थन. ( २ ) टीकेच्या दोन पद्धती–त्याप्रमाणे सामाजिक टीकेच्याही दोन पद्धती. स्थितिनिष्ठ नवविद्वेषी आणि गतिनिष्ठ नवाभिमानी. व्यक्ती व समष्टी यांचे संबंध कवीचेही दोन वर्ग. कवीने केलेली संसृतिटीका. कवी व समाजशास्त्रज्ञ यांच्यांतील अंतर. कवी प्रतिष्ठित तमाशेकार; ( ३ ) ‘ सुधारक’ची भूमिका, हेतू , स्वरूप. हेतुपुरस्सर रचना. व्यक्तिमाहात्म्य व विवाहसुधारणा हे दोन

हेतू. व्यक्तिस्वातंत्र्याच्या मर्यादा. प्रेम आणि विवाह, प्रेम आणि लैङ्गवृत्ति.—या काव्याच्या रचनेची प्रेरणा, इतिहास.

**१२. पटवर्धन यांचे वै. का. राजवाडे यांना पत्र :** "सुधारक" (आ. २) परिशिष्ट. छोटे पत्र. वै. का. राजवाडे यांच्या "सुधारक"च्या प्रशंसापर पत्राला उत्तर. २९ फेब्रुवारी १९२८. ज्येष्ठ ज्ञानोपासकाबद्दल अभिजात विनय. आपल्या कृतीचे चीज झाल्याची धन्यता. दाखवलेल्या दोषांबद्दल नम्र पण स्पष्ट मतभेद.

**१३. प्रस्तावना :** गज्जलाञ्जलि, २९ मे १९३३. [.पटवर्धन-वाङ्मय, क्र. ८८]

**१४. प्रस्तावना :** स्वप्नरञ्जन, (२६ नोव्हेंबर १९३४), प्रका. २७ नोव्हेंबर १९३४. अगदी छोटी. ५–६ कवितांचे मूळ सांगितले आहे. 'बघे प्रथम मी बालवयीं' (स्व. ११२) कवितेचे पूर्वी केलेले भाषांतर, भाषांतरप्रक्रियादृष्ट्या ताडून पाहाण्यासाठी, पूर्ण उद्धृत. काव्यनिर्मितीची प्रक्रिया, स्वतःची भूमिका यांचे निवेदन. 'रसिकाला मूळ सत्याशी काही कर्तव्य नाही, त्याला हृदयङ्गम सत्याभास पुरे असतो.' 'आत्मरञ्जनासाठी आरंभ केला तरी काव्याची समाप्ति ही रसिकरञ्जनासाठीच असते.'

**१५. उत्तर नव्हे, थोडे स्पष्टीकरण :** लोकशिक्षण, जाने. फेब्रु. १९३६.
'लोकशिक्षण', डिसें. १९३५ मध्ये डॉ.रा. चिं. श्रीखंडे यांनी "स्वप्नरंजन"च्या केलेल्या परीक्षणातील काही विधानांचे स्पष्टीकरण. 'नावेतील गाणे', 'रसिकांस', 'सर्वा खल्विदं माया' या तीन कवितांमागील भूमिकेचे स्पष्टीकरण. साहित्यक्षेत्रातील कंपूशाहीबद्दल थोडे.

[या लेखावर श्रीखंडे यांचे 'पुनश्च थोडे स्वप्नरंजन', लो. शि., मार्च १९३६. क्र. क. ३.८७. मार्च १९३६ च्या संपादकीय समारोपात पटवर्धनांची १३ डिसेंबर १९३५ आणि १८ डिसेंबर १९३५ ची अशी दोन पत्रे उद्धृत].

**१६. प्रस्तावना :** तुटलेले दुवे (१ जाने. १९३८) / प्रका. २१ जाने. १९३८ / ३ पृष्ठे.

(१) या पुस्तकाचे स्वरूप एका कवीच्या दैनंदिनीचे. सुनीतरचनेचे प्रयोग म्हणूनही बघता येईल. (२) कथानक. प्रेम आणि जीवन यांचा शोकान्त खेळ. या लिखाणात एक विषण्ण स्वर—सुनीतरचनेची लाट पंधरा वर्षांपूर्वी उसळलेली. तिची पहाणी व्हावी

**१७. सम्पादणी :** नकुलालङ्कार / २९ मे १९३९ / ८ पृष्टे.

(१) या काव्याची पहिली प्रेरणा. त्याचे स्वरूप. उपहासात्मक. उपहासकाव्याचे स्वरूप व त्याची मर्यादा. ते व्यक्तिविषयक असता कामा नये. उपहास दोषांचा

असावा. तो हृदयंगम होतो. ( २ ) या काव्यातील पात्रांविषयी. समाजाच्या एका अंगाचे हे चित्र आहे. ( ३ ) या काव्यात संदेश–प्रतिपादन नाही. (४) या काव्याची लेखनपद्धति. अलंकारमंथर भाषाशैलीचे उद्दिष्ट. 'परन्तु चमत्कृति म्हणजे काव्य नव्हे, चमत्कृति म्हणजे सरसता नव्हे.' जिवंत सौंदर्य निर्माण करणारी प्रतिभा कष्ट-साध्य नाही.

१८. **'मराठी असे आमुची मायबोली'** : ( १ ) सह्याद्रि, जाने. १९४० / पृ. २१–२२ / ( २ ) यशवंत, जाने. १९४०.

नभोवाणीसाठी, मुलांकरिता, स्वतःच्या प्रस्तुत कवितेसंबंधाने लिहिलेले भाषण. या कवितेच्या निर्मितीची हकीकत.

## ३. भाषांतरे

१९. **भाषान्तर व रूपान्तर** : ज्ञानप्रकाश / ३ मार्च १९२३

□ २०. **उमर खय्याम** : लोकशिक्षण / फेब्रु. १९२९, ( व. १, अं. २ )

( १ ) उमरचा संप्रदाय. त्याचे फार्सीतील स्थान. त्याची पाश्चिमात्यांतील प्रसिद्धि. अन्य भाषांतरे. उमरची चरित्रविषयक माहिती व आख्यायिका. ( २ ) फार्सी कवितेची अप्रागतिकता. ( ३ ) रुबाई म्हणजे काय? रुबायांच्या मुळाची अवस्था. उमरच्या रुबाया कोणत्या याची माहिती. ( ४ ) उमरच्या विचारांचे विस्तृत विवेचन. त्यातून निर्माण होणारा प्रश्न. मदिरा वैषयिक की आध्यात्मिक? वस्तुतः उमर कसा असेल?

२१. **प्रस्तावना** : उमरखय्यामकृत रुबाया / २९ मे १९२९ / प्रका. १५ ऑगस्ट १९२९ / १७ पृष्ठे.

क्र. २ ते क्र. १६ परिच्छेद म्हणजे काही थोडे शाब्दिक बदल, सुधारणा करून लिहिलेला 'लोकशिक्षण'मधील उपरोक्त 'उमर खय्याम' लेख. प्रारंभी भाषांतराच्या महत्त्वासंबंधी निवेदन. क्र. १७ पासून परिच्छेद अधिक. त्यात प्रस्तुत भाषांतराविषयी थोडी हकिकत. हे भाषांतर मूळास किती धरून आहे याचे विस्ताराने निवेदन.

+ २२. **उमरखय्याम** : साप्ता. प्रगति / ८ जून १९२९.

छोटा, परिचयपर स्फुट लेख. ( १ ) खय्यामविषयी उपलब्ध ऐतिहासिक माहिती. दंतकथा. काही रुबायांसंबंधीच्या आख्यायिका. ( २ ) फित्झ–जेरल्डच्या आवृत्तींची, भाषांतरांची, पाश्चात्त्य देशातील प्रसाराची माहिती.

२३. **स्वतन्त्र, रूपान्तर आणि भाषान्तर** : लोकशिक्षण, जून १९२९ (व.२ अ.६)/ ८॥ पृष्ठे.

साहित्यविषयक टीकालेख. पटवर्धनांची साहित्यविषयक भूमिका, दृष्टि समजण्यास उपयुक्त.

( १ ) स्वतंत्र म्हणजे काय ? स्वतःचे, इतरांचे अनुभव, पंचेंद्रियांद्वारां ग्रहण झालेले ज्ञान, संस्कार इत्यादी कच्च्या मालातून कलात्मक निवड करून, संयोजक कल्पनाशक्तीच्या साहाय्याने त्याचे योग्य प्रमाणात मिश्रण निर्माता करतो. त्यात वैशिष्ट्य, नावीन्य, पृथगात्मता असते, निर्मात्याच्या व्यक्तिमत्तेचा जिवंतपणा असतो. ( २ ) वाङ्मयात साधारणतः श्रमविभागणी संभवतच नाही. उसनवारी म्हणजे काय ? ( ३ ) एखाद्या वाचनीय ग्रंथाचे रूपांतर करावे की भाषांतर ? रूपांतरापेक्षा भाषांतर अधिक बिकट, पण अधिक हितकारी, भाषांतर म्हणजे राष्ट्राचे देशाटन व कालाटन होय. ' भाषान्तर हे रूपान्तर, स्वतन्त्र लेखनापेक्षा अधिक किचकट व कमी सुखावह व यशोदायक असते. '

२४. **प्रस्तावना** : द्राक्षकन्या / १५ ऑगस्ट १९३१ / प्रका. १५ ऑक्टो. १९३१/ पृष्ठे १८.

परिचयपर. ( १ ) उमरची चरित्रविषयक माहिती, आख्यायिका. इराणात त्याची मान्यता बेताची. त्याच्या नावावरील रुबायांची संख्या. ( २ ) फिट्ज्जेरल्डच्या भाषांतरासंबंधी. त्याच्या भाषांतराचा, प्रकाशनाचा इतिहास. त्याच्या इंग्लंडमधील लोकप्रियतेची मीमांसा. त्या देशवासीयांतील एक प्रकारच्या असमाधानाला जुळत्या अशा रुबाया. या काव्याचे रसदर्शन. ( ३ ) फिट्ज्जेरल्डचे भाषांतर. या निमित्ताने भाषांतरविषयक चर्चा. 'परभाषांतील आदर्शभूत कृतींचे शुद्ध भाषान्तरच व्हायला हवे.' मराठीत भाषांतर करताना येणाऱ्या अडचणींचा विचार. (४) या भाषांतराच्या रचनेचा इतिहास.

२५. **करुणविलासाची दोन भाषान्तरे** : लोकशिक्षण / जून १९३२ / १२ पृष्ठे.

( १ ) कोणती कृती भाषांतरयोग्य असते, कोणती दुष्कर असते याची चर्चा. जगन्नाथरायाच्या करुणविलासाच्या भाषांतर-योग्यतेची मीमांसा. त्या कृतीवर टीका. ( २ ) कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे भाषांतर [ विरही विलाप, १८६५ ] आणि प्रो. लक्ष्मणशास्त्री लेल्यांचे भाषांतर [ महाराष्ट्र करुणविलास, १९०३ ] यांची तुलना. भाषांतर-कार्याचे हेतु. त्यावर टीका ( ३ ) भाषांतरात येणाऱ्या अडचणी. संस्कृताचे मराठी भाषांतर करताना मिळणारे लाभ. (४) मूळ कृती व तिची ही दोन भाषांतरे यांची वृत्तयोजना, शब्दयोजना, अलंकार इत्यादींची सूक्ष्म तुलनात्मक चिकित्सा. कृष्णशास्त्रींचे भाषांतर अधिक रसभावपूर्ण व परिणामकारक. लक्ष्मणशास्त्र्यांच्या पुढे ते असावे.

## ४. टीकालेख

### (अ) आधुनिक मराठी कविता

+ २६. **काव्यविषयक भ्रामक कल्पना :** १६, १७ सप्टें. १९३३ रोजी नाशिक येथे भरलेल्या कविसंमेलनातील अध्यक्षीय भाषण.

(१) चंद्रशेखरांचे ऋण. (२) कवीला मान उरला नाही–त्याची मीमांसा. आधुनिक मराठी कविता उत्कृष्ट, भव्य नसली तरी तद्विषयक तुच्छतेच्या बुडाशी अभिरुचीचा अभाव व भ्रामक कल्पनांचा प्रभाव. (३) रसिकतेचे विवेचन. (४) काव्यवाचनासंबंधी चुकी या भूमिकांचा परामर्श. (५) कवींच्या स्वतःसंबंधीच्या भ्रामक कल्पना. स्फूर्ती व परिश्रम यांचे विवरण. (६) काव्य आणि त्याची भाषा, काव्य आणि पद्य, काव्यात संगीताचे स्थान, भाषांतरे यांविषयी विचार.

+ २७ **आधुनिक मराठी कविता :** बडोदे येथे २४, २५, २६ डिसेंबर १९३४ ला भरलेल्या महाराष्ट्र–साहित्य संमेलनातील काव्यविभागाचे अध्यक्षीय भाषण.

(१) चंद्रशेखरांविषयी गौरवोद्‌गार. (२) आधुनिक कवितेचे विहंगमावलोकन. (३) या कवितेच्या मर्यादा-परपुष्टता आणि अनुकरणशीलता. (४) वाङ्मय-निर्मितीची प्रक्रिया. 'उत्कृष्ट वाङ्मय हे जसे अननुभूताचे सूचक असते तसेच ते अनुभूताचे स्मारकही असते.' (५) हृदयंगम कृती हृदयापासून प्रस्फुरित. अनुभूतीचे गूढ संयोजन. भूमिकागीत. दीर्घकाव्य. (६) वाङ्मयावर कायदेशीर नियंत्रण, वाङ्मय आणि समाजजीवन, नवमतवाद, कला व प्रचार, कवी व कालप्रतिनिधित्व यासंबंधी चर्चा. भाषांतर, गूढगुंजन यांवरही मत. (७) उत्कृष्ट कवितेचे विशेष. अंतर्गत जिव्हाळा. प्रामाणिकपणा. मानवी संसारातूनच तिचा उद्‌भव हवा. (८) समारोप. सर्व थरांतून लेखक निपजले पाहिजेत. काव्यावर निष्क्रियतेची, स्त्रैणपणाची छाया. बहुजनसमाजाच्या सांघिक भावना रंजवणारी, उत्तेजित करणारी गीते हवीत.

### (ब) कविपरिचय व टीका

+ २८. **(कवि) चन्द्रशेखर व त्यांची कविता :** (१) नवयुग, सप्टेंबर-ऑक्टोबर १९२२, पृ. ४६७-४७५/(२) "काव्यचर्चा," शारदा-मंदिर प्रकाशन, १९२५.

११ सप्टेंबर १९२२ ला डेक्कन कॉलेजातील शारदोपासक मंडळात वाचलेला निबंध. चंद्रशेखरांची खरी ओळख करून द्यावी ही भूमिका. पुढे "काव्यचर्चा"मध्ये, पुन्हा मांडणी करून, संक्षेप-विस्ताराने लिहिलेला लेख. ३६ पृष्ठे. या लेखाआधी 'चंद्रशेखर व गोदागौरव' लेख लिहिल्याचा संदर्भ [रा. वि. मराठ्यांना पत्र : नोव्हेंबर १९२१]

( १ ) चंद्रशेखरांकडील बैठकीचे रंगतदार वर्णन. चंद्रशेखरांची वृत्ती, अंतरंग-दर्शन.

( २ ) अनुत्तेजक, निराशाजनक परिस्थितीतही काव्यलेखन हे जिवंत स्फूर्तीचे, खऱ्या उमाळ्याचे द्योतक. यशलाभासाठी लेखन, पण उपेक्षा. त्यांच्या कवितारतीचे मनोज्ञ दर्शन.

( ३ ) १८७० पासून पुढील पन्नास वर्षांतील मराठी कवितेचे स्वरूप. त्यात चंद्रशेखरांचे स्थान. ' चन्द्रशेखरांची कविता कथनपरच अधिक असून खऱ्या वैणिक तत्त्वाचा त्यात जवळजवळ अभावच आहे. '

( ४ ) त्यांच्या कवितांचा उताऱ्यांसुद्धा परिचय.—या लेखात वाङ्मयसंबंधी विविध प्रश्नांची चर्चा ओघाने आली आहे.

* २९ चुकीची दुरुस्ती : ' काव्यशास्त्रविनोद ', ज्ञानप्रकाश, रवि. १८ एप्रिल १९२६. ' चंद्रशेखर व त्यांची कविता ' लेखाबाबत. या लेखात ' Sussex Miracle' ऐवजी ' The Suffolk Miracle ' हवे. त्या कवितेची माहिती. मूळ कवितेचा हृदयंगम विस्तार ' काय हो चमत्कार ' मध्ये. मुळात नायिकेने दिलेला रुमाल शवाच्या कवटीला आढळतो; रूपांतरात जिऊचे हृदयत्राण शिवबाचे शिरस्त्राण होते. —हिंदु कुणब्यांत प्रेते पुरण्याची चाल आहे का ?

+ ३०. **राजकवि चन्द्रशेखर** : लोकशिक्षण, एप्रिल १९३७ / पृ. ७४९–७५५. अतिशय मोकळ्या, शुद्ध वाङ्मयीन दृष्टीने चंद्रशेखरांच्या कवितांचे गुणदर्शन घडविणारा मृत्युलेख.

( १ ) सामाजिक कीर्ती आणि बनल्यास राजसंभावना यांची इच्छा अपूर्ण राहिल्याने विषादाची व संशयाची छाया त्यांच्या मनावर. ( २ ) यशाचे पृथक्करण. काव्यवाचन रसिकाकडून स्वयंप्रेरणेने आणि आत्मानंदासाठी झाले पाहिजे. केशवसुत, टिळक, विनायक, गोविंदाग्रज, बालकवि यांच्याशी थोडक्यात तुलना. चंद्रशेखरांची रचना-चातुरी अनन्यसाधारण. पण व्यक्तिवैशिष्ट्य नव्हते. ते आत्मपरही नव्हते.

३१. **राजकवि चंद्रशेखर** : सह्याद्रि, मार्च १९३९ / पृ. १६२–१६६.

चंद्रशेखरांच्या छायाचित्राचा अनावरण समारंभ २६ डिसें. १९३८ ला बडोदे येथे सहविचारिणी सभेच्या विद्यमाने मध्यवर्ती वाचनालयात झाला त्यावेळचे अध्यक्षीय भाषण चंद्रशेखरांवरील पूर्वलेखांपेक्षा फारसे निराळे, नवीन नाही. चंद्रशेखरांविषयी पूज्यभाव—१९१० साली पहिला परिचय झाला. ३–४ वर्षे सतत सहवास. आठवणी. काव्यलेखनासाठी उपवास ! १९२१ सालातील आठवण. – महाकाव्य लिहिण्याची आकांक्षा. अभिजात संयम. वैभवशाली भूतकालात संचार करीत.

+ ३२ **कवि ताम्बे : परिचय व गुणनिदर्शन.**[1] : लोकशिक्षण, पूर्वार्ध, सप्टें. १९३०/ उत्तरार्ध, ऑक्टो. १९३०.

( १ ) ‘ महाराष्ट्रात कवितेची आवड आहे. पण रसज्ञता तितकीशी नाही. ’ तांब्यांची प्रसिद्धीबाबत उदासीन ( काव्यमय ) वृत्ती. काव्यबैठकीचे सुरस वर्णन. ( २ ) त्यांच्या काव्याचे विशेष–गोचरपद्धति, उदात्तता. ( ३ ) वर्गवारीने त्यांच्या कवितांचे रसदर्शन. देशभक्तिपर, सुधारक–विधवाविषयक ( ४ ) प्रेमविषयक कविता-पत्नीसंबंधी. ( ५ ) महाप्रस्थात गीते.

( यातील “ काव्यविहार ”, पृ. ४७ वरील आक्षेपासंबंधी तांबे यांचे पत्र– “ राजकवि तांबे यांचा पत्रव्यवहार ” मध्ये, पृ. १०७ ).

३३ **‘ सम्पादकीय निवेदन ’** : “ राजकवि भास्कर रामचन्द्र ताम्बे यांची समग्र कविता ” ( सुधारून वाढविलेली दुसरी अधिकृत आवृत्ती ), नोव्हें. १९३५. या आवृत्तीचे संपादन पटवर्धनांनी केले आहे. ‘ सम्पादकीय निवेदन ’ हा वाङ्मयविषयक प्रश्नांची चर्चा करणारा निबंधच ( ८ नोव्हें. १९३५ ). १०–१५ ओळींत कवि-चरित्रकथन. काव्यसंग्रहप्रकाशनाचा इतिहास. स्वतःच्या प्रयत्नांची हकिकत.– संपादकीय कार्यातील अडचणी. संपादनांतील भूमिका.

परिशिष्ट २—**टीपा** : पटवर्धनांच्या. स्पष्टीकरणापेक्षा कवितेचे सौंदर्य खुलवून सांगण्यासाठी टीपा. अनेक साम्यस्थलांचे दर्शन. तांब्यांच्या पत्रांचा भरपूर उपयोग.

परिशिष्ट ३—[ आ० २, १६ सप्टें. १९३९ मध्ये ] **‘ पद्यरचनाविषयक संपादकीय टीपा ’** तांब्यांच्या कवितारचनेसंबंधी स्वतंत्र निबंध. १४ पृष्ठांचा पुरवणी लेख. “ छन्दोरचने ” नंतर लेखन. २५ ऑगस्ट १९३९ ( मृत्यूपूर्वी तीन महिने ).

३४. **कविवर्य तांबे लोकप्रिय का नाहीत ?** : कलाविलास, नोव्हें. १९३६ ( व. २ अं. ३–४ ) / १॥ पृष्ठाचा छोटा, पण महत्त्वाचा लेख.

+ ३५. **तांबे यांची कविता** : ज्योत्स्ना, जाने. १९३९ / १४ नोव्हें. १९३८ ला मुंबई नभोवाणीवर केलेले भाषण.

रसिकतेने तांब्यांच्या कवितांचे घडविलेले सौंदर्यदर्शन. त्यांच्या कवितेचा, तिच्यातील वृत्तिविकासाच्या दृष्टीने लावलेला अन्वय. तांब्यांची कविता अंतःकरणापासुन निघालेली; आबालवृद्धांना चटका लावणारी.

( या भाषणावरील तांबे यांचा अभिप्राय-“ राजकवि तांबे यांचा पत्रव्यवहार ”-मध्ये. पृ. १०६ )

१. “ तांबे—व्यक्ति आणि कला ” ( ६ नोव्हें. १९३५ ) मध्ये पुनर्मुद्रित. खं. १, पृ. ९२–११४.

३६. **केशवसुत** : अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक / गं. दे. खानोलकर / खंड १, १९३१ / पृ. ९८–१७५.

काव्यचर्चाविषयक पटवर्धनांचा प्रमुख लेख. अनेक वादग्रस्त प्रश्नांना जन्म देणारा. ( १ ) केशवसुतांचे चरित्र, वृत्ति; प्रसिद्धी. टीकाकार. ( २ ) केशवसुतांचे अग्रेसरत्व. भाषांतरित १७ कवितांचा विचार. ( ३ ) कवी आणि कविताविषयक २० कविता. शिवाय १६–१७ गौणपणे. अचाट, क्लिष्ट अत्युक्ति. आत्मकवित्वाची रोगट जाणीव. 'झपूर्झा', 'हरपलें श्रेय' यांची चिकित्सा. ( ४ ) निसर्ग कविता. ( ५ ) क्लिष्ट मूर्तिकरणाच्या कविता. ( ६ ) जनतेला स्फुरण, बोध देण्यासाठी लिहिलेल्या कविता. ( ७ ) कौटुंबिक क्लृप्तियुक्त कविता. ( ८ ) प्रणयविषयक कविता. संस्कृतनिष्ठ रतिलंपट शृंगारापेक्षा इंग्रजी वळणावर वियोगजन्य शोकनिर्मित वलृप्तिजन्य मनोराज्यात दंग होणे. सरस कवितांची अधिक संख्या प्रेमकवितांमध्येच. ( ९ ) गूढ गुंजनपर कविता. यावर विस्तृत विवेचन. ( प्रमुख मतभेद यावरच झाले ). ( १० ) भाषाशैली, यमक, विराम; सुनीत, वृत्त, जाति. ( ११ ) केशवसुतांचे क्रांतिकारकत्व, स्वतंत्रता, कामगिरी यांचे मापन. क्रांतीत सापडलेले प्रामाणिक, जोमदार पण एकांगी व उतावीळ कवि.

+ ३७. **दत्तात्रेय कोण्डो घाटे : कवि दत्त** : अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक/ गं. दे. खानोलकर / खं. १, १९३१ / पृ. २३७–२४१.

( १ ) कविचरित्राची रेखा. ( २ ) अल्पवयीन मृत्यु. कवीची श्रेष्ठता कवितेच्या गुणांवरून की संख्येवरून ? ( ३ ) दत्त केशवसुत-संप्रदायातील होते, पण त्यांचे चेले नव्हते. ( ४ ) दत्तांचे वैशिष्ट्य शिशुगीतांत, 'जे हृज्ज तेच हृद्य व हृदयंगम ठरते.' 'विश्वामित्रीच्या कांठी' कवितेतील उणीवा. ( ५ ) दत्तांच्या प्रेमकविता देशभक्तिपर कविता. 'निज नीज माझ्या बाळा'. ( ६ ) समारोपात्मक.

३८. **गोविन्दाग्रजांची कविता** : प्रतिभा, २६ जुलै १९३५ / पृ. ४-७.

( १ ) गोविंदाग्रजांची स्वतःची काव्यविषयक मते, भूमिका यांचा शोध. भावनेच्या उमाळ्याला भाळत. कल्पनाचमत्कृतीला प्राधान्य. ( २ ) आपण कविता का वाचतो? भावनेचे सुखद उद्दीपन व एकान्तातहि स्मरण. कवितेचे वाचन स्वानंदासाठी, तर तिचे महत्त्वमापनहि स्वप्रत्ययनिविष्टच हवे. कवितेतील निरनिराळ्या घटकांच्या महत्त्वाचे कोष्टक. ( ३ ) गोविंदाग्रजांच्या ( आठ कवितांचे ) या विचारानुषंगाने विवेचन.– 'प्रेम आणि मरण'–वृक्ष विजेचे प्रतीक पतङ्ग-ज्योतीइतके रमणीय नाही. असा वृक्ष कल्पनेच्या निरंकुश क्षेत्रातच.–'पहिले-चुंबन'-वर्णन रसाळ पण सामान्य. हृदयाकर्षण प्रबळ असल्यास पहिल्या चुंबनाची चटक दुसऱ्यातहि. परस्परप्रेमाचा अनुभव घेणाऱ्यांपेक्षा एकांगी स्वप्नात रंगणाऱ्यांनाच अधिक आवडते. ( ४ ) समारोप.

भावनेची उत्कटता फार थोड्या कवितांत. शब्दप्रवाहित्व अनन्यसाधारण. पण त्यात कवीही वाहून जातात.

+ ३९. गोविन्दाग्रज : ज्योत्स्ना, फेब्रुवारी १९३९ / पृ. ३७–३९ / १९ नोव्हेंबर १९३८ ला मुंबई नभोवाणीवर केलेले भाषण.

सर्वसाधारण विवेचन. 'गोविन्दाग्रज कौमारकालातील काही संदिग्ध नि चञ्चल भावलहरींच्या स्थूल चित्रणापलीकडे कधी गेले नाहीत.' 'मराठी कवितेत कामपूर्ण प्रेमाचे पाठ गोविन्दाग्रजांनीच प्रथम लिहिले आणि ते योग्य वेळी प्रकाशित झाले.'

४०. ठोमरे, त्र्यंबक बापुजी (बालकवि) : अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक / गं. दे. खानोलकर / खं. २, १९३८ / पृ. १७–३४.

( १ ) चरित्र. काही कवितांचा परिचय. 'अखेर अखेर एका मोहक स्त्रीवर त्यांची अत्यंत भक्ती' जडली. पण अपेक्षाभंगापूर्वीच अपघात. ( २ ) काव्यप्रकाशनाचा त्रोटक इतिहास. ( ३ ) नवनवतीच्या मनोवृत्तीचे चित्रण. या काळातील मनोवृत्तींचे वर्णन बालकवींच्या कवितात. ( ४ ) सृष्टिविषयक कविता. 'येथे सृष्टीचे यथातथ्य छायाचित्र नाही, तर बालकवींच्या संस्कारक्षम मनावर उमटलेले प्रतिबिंब आहे.' काही उणीवा. ( ५ ) प्रेमासंबंधी वृत्ति. ( ६ ) उदासीनतेची गाणी. ती अधिक जिव्हाळ्याची. ( ७ ) केशवसुतांचा–विशेषतः गूढगुंजनाचा भयंकर परिणाम. कवित्वाची सतत व रोगट जाणीव. ( ८ ) परिष्करण बालकवी करीत असत. 'बाल-कवींची प्रतिभा जिवंत असली तरी तिचे सामर्थ्य मर्यादित होते.'

+ ४१. कवि यशवन्त : ज्योत्स्ना, मार्च १९३९ / २८ नोव्हें. १९३८ ला मुंबई नभोवाणीवर केलेले भाषण.

यशवंतांच्या काव्याचे आरंभी सौंदर्य दाखवून पुढे निर्भीड मर्यादा दाखवतात.

( १ ) यशवंतांच्या प्रथम-गौरवाच्या प्रसंगाची आठवण ( २ ) त्यांच्या काव्यात प्रेमाचे नि निराशेचे सूर. 'आई' 'सुंदर रसाळ कविता, अशी कविता पुन्हा होणे नाही.' ( ३ ) यशवंतांच्या प्रेमगीतांतही सत्यसूचक खुणा. या प्रकरणी योग्य ती काळजी ते घेत नाहीत. ( ४ ) ते जात्याच भावगीतकार, अहंभावी आहेत. त्यांचा रोगट अहंभाव दिसतो.

+ ४२. विठ्ठलराव घाटे : राजारामीयन, ऑक्टो. १९२८/खंड १५, अं.२ / ५पृष्ठे.

( १ ) प्रास्ताविक. उदंड निपजणाऱ्या कवितांत परिश्रमाने हिरकण्या गवसतील. आजचा मनु लघुभावगीतांचा. तथापि 'कविता ही सङ्गीताची दासी नाही.' 'भाषान्तरानेही जो अंश हृदयङ्गम वाटतो तोच काव्यगुण होय.' भावकवितेचे विशेष. ( २ ) वि.द.घाटे यांच्या कवितेचे विवेचन. 'तिचा अभिजात मराठमोळा, तिची अर्थ-

पूर्णता हाच तिचा थोर गुण आहे.' उदात्तता हा तिचा विशेष. काही कवितांचा परिचय. ( ३ ) अन्य गुणांचा, कर्तृत्वाचा ओझरता निर्देश.

## ( क ) का व्य चि कि त्सा

□ **४३. कवि यशवन्त यांचे "न्याहारीचे गाणे"** : साप्ता. प्रगति, ३१ जुलै १९३०. 'काव्यचिकित्सा' लेखमालेतील पहिला लेख, 'प' या टोपण नावाने. ( १ ) या लेखमालेची प्रस्तावना. रसिकता नष्ट न होता टीकेत चिकित्सकपणा यावा. ( २ ) 'न्याहारीचें गाणें'चे सौंदर्यदर्शन. कुणबाऊ भाषेची योजना उचित, अभिनव. चाल गोड, प्रसंग रमणीय. ( ३ ) पूर्णतेची ओढ हवी. या ओढीमुळे उणिवांचे दिग्दर्शन : ( १ ) मथळा अन्वर्थक नाही. 'मैतरिणी बिगि बिगि चाल' हाच मथळा योग्य. ( २ ) कुणबाऊ बोलीतील अशुद्धे. ( ३ ) रचना दोष.—१४ ऑगस्ट १९३० च्या 'प्रगती'त 'प'चा स. ह. मोडक यांच्या शंकेवर खुलासा. प्रसंग वऱ्हाडातील मानता येणार नाही. बोली साताऱ्याकडील.

+□ **४४. टिळककृत "पांखरा, येशिल का परतून्?"** : काव्यचिकित्सा : २/साप्ता. 'प्रगति', १४ ऑगस्ट, व ४ सप्टेंबर १९३०.

( १ ) साधा भाव, सरळ, सोपी आणि अदीर्घ रचना आणि गेयता या तीन गुणांनी युक्त असे हे गीतक. काव्यगायनप्रथेमुळे ही कविता मागे पडली तिच्यामधील जो अनुभव आहे तो स्वतःला नसल्याने तरुण मन तन्मय होत नाही. स्वातंत्र्येच्छु तरुणास उद्देशून. ( २ ) काव्यपंक्तींचा अन्वय बदलून कवितेचे विवरण. ( ३ ) काही शंकांना उत्तर. ( ३ ) परिष्करण, दुसऱ्याच्या कृतीत फिरवाफिरव करणे यासंबंधी विचार. कलाकृतीत स्फूर्ति आणि विचार यांचा संगम.

□ **४५. गिरीशकृत "शूर्पणखा"** : काव्यचिकित्सा : ३. साप्ता. प्रगति, २८ ऑगस्ट, ११ सप्टेंबर, २५ सप्टें. १९३०.

१. ( १ ) यातील सौंदर्य उपजत आहे. शूर्पणखेची लोलुपता, अनागरपणा. ( २ ) काव्यश्रवणाची आठवण. ( ३ ) लोकप्रियतेची मीमांसा—मनोहर, बायकी चाल. मूळ प्रसंगात हास्योत्पादक विकृती. राक्षसीची फजिती. काव्यान्तर्गत न्याय. ( ४ ) शोकगंभीर कविता. शूर्पणखा हे स्वार्थी प्रेमाचे प्रतीक. शृंगार>हास्य>अखेर करुणरस जागृति.

२. **'गिरीश' कृत शूर्पणखा व रामायण** : रामायणातील मूळ कथाभागाशी तुलना केल्यास ही कविता अधिक स्वाभाविक, माधुर्ययुक्त वाटते.

३. गलगली, प्रधान, पंगू वगैरेंच्या पत्रांवर 'प'चे आक्षेपकांस उत्तर. ( १ ) तौलनिक काव्यचिकित्सेत पांडित्य ओघानेच येते. ( २ ) टीका स्वप्रत्ययानुगामी

असावी. ( ३ ) कविकृतींतून कवीला अनभिप्रेत अर्थ दाखवणे चूक नाही. काव्योत्पत्तीच्या काही प्रक्रिया मनाच्या अन्तर्भागात.

+□ ४६. तांबेकृत "रुद्रास आवाहन" : काव्यचिकित्सा : ४. साप्ता. प्रगति, १८ सप्टेंबर १९३०.

रसिकता व चिकित्सकता यांतून या कवितेचे अन्वेषण. कवितेचे सौंदर्य, सामर्थ्य यांचे दर्शन. काही सुधारणा पटवर्धन सुचवतात. भागवतातील स्कंध ७ अ. ८ तील वर्णनाबरोबर तुलना.

□ ४७. केशवकुमारकृत "परिटा, येशिल कधिं परतून् ?" : काव्यचिकित्सा : ५. साप्ता. प्रगति, २ ऑक्टोबर १९३०.

( १ ) हास्याची मीमांसा. ती मानसिक क्रिया, तशीच शारीरिक. विनोदी वाङ्मय इतर वाङ्मयाइतके शाश्वत नाही. ( २ ) विडंबनकाव्य म्हणजे सहृदयतेने दाखवलेली वाकोली. त्यात व्यक्तीवर रोख नसावा. ( ३ ) केशवकुमारांचे कर्तृत्व–त्यांनी विडंबन गीताची टूम रूढ केली. ( ४ ) विडंबित कवितेची अचुक उपस्थिती हा विडंबनगीताचा प्रमुख विशेष. कवितेवर टीका म्हणजे कवीवर टीका नव्हे. काव्यदोषांवर टीका. ( ५ ) 'परिटा०'ची चिकित्सा. काही ठिकाणी आवश्यक ती हास्यकारक अतिशयोक्ती.नाही. विडंबनगीतातही कलेचा विलास हवा. निष्कारण पाल्हाळ, वर्णनदोष त्यात खपणार नाही.

□ ४८. दत्तकृत "विश्वामित्रीच्या कांठी" : काव्यचिकित्सा : ६/ साप्ता. प्रगति, १६ ऑक्टोबर १९३०.

( १ ) गोविंदाग्रजांच्या मुंबईला 'सुखनिवास' भोजनालयात झालेल्या पहिल्या भेटीतील प्रसंगाची आठवण. गोविंदाग्रजांची चंद्रशेखर, दत्त यांविषयी मते. ( २ ) प्रस्तुत कवितेचे प्रत्येक कडवे सुटे घेऊन त्यावर भाष्य. बरेच दोष. काही सुधारणा. कवीची शृंगारवृत्ती भलत्याच ठिकाणी डोकावून विरस करते. एक निरीक्षणदोष. ( ३ ) गोविंदाग्रजांनी केलेल्या स्तुतीस ही कविता पात्र नाही.

□ ४९ अज्ञातवासीकृत "सरदार धन्य पवाडा !" : काव्यचिकित्सा : ७/साप्ता. प्रगति, ६ नोव्हेंबर १९३०.

( १ ) रम्याद्भुताची स्वाभाविक आवड. पण प्रौढाची दृष्टी चिकित्सक हवी. कल्पनासृष्टी प्रत्यक्षाशी जास्तीत जास्त जुळती हवी.

( २ ) प्रेम आणि शौर्य यांना पोषक असा प्रसंग या काव्यात. पण सूक्ष्म निरीक्षणानंतर असंभाव्यता उघडी पडते. या काव्यात अविश्वसनीय, अतिरिक्त अतिशयोक्ति, कल्पनासृष्टीतील वर्णन सत्यसृष्टीच्या सूक्ष्म व खोल परिचयावरच अधिष्ठित

असावयाला पाहिजे.

□ ५०. **केशवसुतकृत "हरपलें श्रेय"** : काव्यचिकित्सा : ८ / साप्ता. प्रगति, १५ जानेवारी १९३१.

[ ' केशवसुत ' निबंधात यातील बरेच विवेचन आले आहे. ]

( १ ) मनुष्याचा करुणरसाकडे जास्त ओढा असतो. ' हरपलें श्रेय ' मध्ये निराशेची, विरहाची अभिव्यक्ती आहे. ( २ ) वर्तक, दामले यांच्या अर्थाची चिकित्सा. ( ३ ) प्राप्त वास्तवापेक्षा अप्राप्त कल्पित मोहक वाटते. ही निराशेची अनुभूती या कवितेत घरगुती प्रतीकद्वारा व्यक्त केली आहे. ( ४ ) वर्डस्वर्थच्या कवितेचा ही कविता कमजोर प्रतिध्वनी वाटते. चांगली आहे; पण उत्कृष्टतेबद्दल संशय.

+ □ ५१. **प्रो. मायदेवकृत "गाई घरा आल्या"** : काव्यचिकित्सा : ९ / साप्ता. प्रगति, ५ फेब्रुवारी १९३१.

प्रेमपूर्ण सौंदर्यवृत्तीने केलेले चांगले रसग्रहण.

आधुनिक मराठी कवितेचा बहुजनसमाजात प्रसार का नाही याची चिकित्सा. जानपदगीताविषयी थोडे विवेचन. ' सहजसंभवता आणि सहेतुक करामत या दोन्ही गोष्टींचा येथे प्रीतिसंगम आहे. ' काही क्षुल्लक दोषांचे दिग्दर्शन.

□ ५२. **केशवसुतकृत "झपूर्झा"** : काव्याचिकित्सा : १० / साप्ता. प्रगति, २६ फेब्रुवारी १९३१.

[ ' केशवसुत ' निबंधात बराचसा भाग समाविष्ट ]

( १ ) या कवितेत दुर्बोधता. गूढ सिद्धांत मांडण्याचा हेतू. ( २ ) कवितेवरील टीका आत्मप्रत्ययनिविष्ट असावी. अनेकांच्या आत्मप्रत्ययांच्या तुलनेतून मूलतः सुंदर ठरविता येते. आत्मप्रत्ययाला तौलनिक चिकित्सेची जोड हवी. ( ३ ) ' झपूर्झा ' या नवीन बनवलेल्या शब्दात शुद्धता नाही. ( ४ ) तत्त्वज्ञानदृष्ट्या ही कविता सदोष आहे. काव्यदृष्ट्या निष्कारण रूक्ष व दुर्बोध आहे.

५३. **वनवासी फूल** : ' वनवासी फूल ', रे. टिळक/पुनर्मुद्रण, १५ ऑगस्ट १९३३/ ४ पृष्ठे.

रे. टिळकांच्या ' वनवासी फूल ' कवितेचे रसग्रहण. सौंदर्यदर्शन. कवितेचा एक वेगळा अर्थ. अनेक सुंदर अवतरणे. कौमारकालीन वृत्तीचे वर्णन. टिळकांची प्रसादमय भाषा. ' जनसेवा म्हणजेच हरिसेवा ' सांगणारे काव्य. वनवासी फूल 'हे एका अजाण, संसारविमुख, भीरू, सुन्दर ब्रह्मचारिणीचे प्रतीक आहे. '

## (ड) परीक्षणे — अभिप्राय

**५४. तांबे यांची कविता :** [ काव्यसंग्रह, भा. रा. तांबे ] फर्गसन कॉलेज-मॅगेझिन, फेब्रुवारी १९२१ ( पु. ११ अं. ४ ).

'M' या नावाने छोटा, पानभर अभिप्राय.

'तांबे यांची कविता साधी, सरळ, सुरस आणि सुबोध आहे....तिच्यात नकली शून्यवाद नाही.' शिशुवर्गासाठी लिहिलेल्या कवितांचे कौतुक. विविध रसांच्या कवितांसंबंधी गुणग्राहक उद्‌गार. 'त्यांनी वर्णिलेले मनोविकार सर्वसामान्य जनानुभूत असे आहेत.' त्यामुळे त्यांची कविता लोकप्रिय राहील. 'काही कविता रूपांतरित असाव्यात.'

**५५. आधुनिक कविपंचक :** [ टीकाग्रंथ, ग. त्र्यं. माडखोलकर, १९२१ ] फर्गसन कॉलेज-मॅगेझिन, फेब्रुवारी १९२२ ( पु. १२ अं. ४ ).

३॥ पृष्ठांचा थोडा विस्तृत लेख. 'MJ' या नावाने. एकंदरीने या पुस्तकाचे स्वागत. पण अभिप्रायात मतभेदांचाच विस्तार आहे.

( १ ) आधुनिक कवितेसंबंधी सर्वसामान्य अभिप्राय. कवी व रसिक यांत तिला मान्यता. तथापि काव्यचिकित्सेची वाढ नाही. ( २ ) या पुस्तकाचे स्वरूप. काव्य-मीमांसेपेक्षा रसज्ञतापूर्वक विवरण अधिक. या कविपंचकाच्या काव्यविषयक कल्पनांची चर्चा करावयास हवी होती. ( ३ ) ( यापुढील बहुतेक भाग रे. टिळकांसंबंधीच्या माडखोलकरांच्या विधानांवर टीका करण्यात खर्ची पडला आहे. ) 'वनवासी फूल' एखाद्या मठवासी रमणीचे चित्र असावे. या कवितेवर काही टीका. — टिळकांच्या खिस्ती धर्म स्वीकाराच्या अनुषंगाने माडखोलकरांनी केलेली टीका विपर्यस्त असल्याचा अभिप्राय. माडखोलकरांची विसंगती. धर्मविषयक थोडे विचार. 'भक्ती व संतपरंपरा ही धर्मभेदातीत आहे.' ( ४ ) माडखोलकरांच्या भाषेवर स्वागतपर अभिप्राय.

**५६. वीणाझङ्कार :** [ काव्यसंग्रह, यशवंत-गिरीश / १९२२ ] फर्गसन कॉलेज-मॅगझिन, डिसेंबर १९२२ ( पु. १३ अं. ३ ).

'मा. प.' नावाने १० ओळींचा अनुकूल , उत्तेजक अभिप्राय.

'यातील वैणिके करुणशृङ्गारादी रसांचा उत्कर्ष दाखविणारी असून कवींची विशिष्ट मनोरचना त्यांत दृगोचर होत आहे हा या नव्या मनूतील वैणिकांचा विशेष आहे.' यशवंत व गिरीश यांच्या कवित्वगुणांसंबंधी उद्‌गार. दोघांतील भेद.

**५७. मराठेशाहीतील राजनीति :** [१९२३, 'विविधज्ञानविस्तार' वरून पुनर्मुद्रण] ज्ञानप्रकाश / काव्यशास्त्रविनोद / रविवार, दि. २२ जुलै १९२३ / दोन स्तंभ.

( १ ) रामचंद्र नीळकंठ अमात्य यांचे—' आज्ञापत्र '.–पुस्तक-परिचय. लेखक-परिचय. पुस्तकाचे महत्त्व. ( २ ) पुस्तकातील विवेचन. ( अनेक अवतरणे. ) त्यात मिळणारी माहिती.

**५८. काहीतरी** : [ काव्यसंग्रह, ह. स. गोखले, १९२५ ] विविधज्ञानविस्तार, नोव्हेंबर १९२५.

ह. स. गोखले यांच्या काव्यसंग्रहाचे १०॥ पृष्ठांचे सविस्तर परीक्षण. पटवर्धनांच्या परीक्षणलेखांपैकी प्रमुख. पटवर्धनांची काव्यविषयक दृष्टी, मते यात दिग्दर्शित होतात.

( १ ) प्रास्ताविक–आधुनिक मराठी कवितेचा भाग्योदय. ती सर्व समाजात प्रसृत व्हावी. ( २ ) गोखले यांची पद्यरचना व भाषा यांचा विचार. गज्जलासंबंधी थोडे विवेचन. काही ठिकाणी वृत्तशुद्धरचनेत संतापजनक दुर्लक्ष. ' माधुर्याचा आणि छन्दःशुद्धतेचा त्याग करणाऱ्या या बण्डखोरीचा तीव्र निषेध. ' ( ३ ) अंतरंग-परीक्षण. केशवसुत, कोल्हटकर-गडकरी यांचा प्रभाव. केशवसुतांसंबंधी थोडी चर्चा. गोखले पुच्छगामी निकृष्ट वर्गसंबंधी वाङ्मयाविषयी. ' बुद्धीला गुदगुल्या होतात, पण भावनेला तितकी जोराची चालना मिळत नाही. ' ( ४ ) संग्रहाच्या विषयवैचित्र्यासंबंधी. भावनेच्या प्रबळतेची उणीव गोखले कुतूहलजनक बुद्धिविलासाने भरून काढतात. काव्यासंबंधी सामान्य विवेचन. ( ५ ) उपसंहारात्मक सामान्य विचार.

**★ ५९. " काहीतरी " – रा. ह. स. गोखले यांस प्रत्युत्तर** : विविधज्ञानविस्तार' जानेवारी १९२७ / २॥ पृष्ठे.

गोखल्यांनी पटवर्धनांच्या " काहीतरी " वरील परीक्षणाला ' विस्तारा'च्या १९२६ ऑक्टोबरच्या अंकात उत्तर दिले.[1] त्यावर हे प्रत्युत्तर.

( १ ) प्रस्तावना. मासिककार पक्षपात करतात या समजुतीचे गोखल्यांच्या लेखाच्या प्रकाशनाने खंडन झाले. ( २ ) पूर्वीची आपली टीका निःस्पृहपणे, निर्भीडपणे केलेली होती. आपल्या प्रतिपादनाचा गोखल्यांनी काही ठिकाणी विपर्यास केला.

---

१. **" काहीतरी "–प्रो. पटवर्धन यांच्या टीकेस उत्तर** : ह. स. गोखले / विविधज्ञानविस्तार, ऑक्टोबर १९२६ / पाच पृष्ठे.

पटवर्धनांच्या लेखानंतर ११ महिन्यांनी प्रत्युत्तर. ' सदर टीका हा विशिष्ट प्रकारचा हल्ला आहे ' असे वाटून ' स्वसंरक्षणाच्या हक्काच्या दृष्टीने पण टीकेला धरून उत्तर. ' ( वस्तुतः पटवर्धनांची टीका तत्त्वविचारांवर उभी. निरपेक्ष वृत्तीने समतोल परामर्श घेणाऱ्या टीकाकारावर हेतूचा आरोप होणे स्वतंत्र टीकावृत्तीच्या विकासास बाधक ) इतर कवींच्या व पटवर्धनांच्या काव्यरचनेतील वृत्तदोष.–इतर आक्षेपांना उत्तरे देण्याचा प्रयत्न.

( ३ ) तात्त्विक मतभेद, आरोप यांना उत्तर. ( ४ ) टीका आणि टीकाकार यांच्या-संबंधी समारोपात्मक काही विचार.

+ ६०. **झेंडूची फुले :** [ विडंबन–विनोदकाव्यसंग्रह / प्र. के. अत्रे–केशवकुमार / प्रकाशन १९२५ ] ज्ञानप्रकाश, शुक्रवार, २८ नोव्हेंबर १९३०.

( १ ) 'झेंडूची फुले' प्रसिद्ध होण्याच्या सुमारचा काळ, वाङ्मयीन वातावरण. 'झेंडूची फुले'ची लोकप्रियता. 'कुणालाही दुसऱ्याची टवाळी झालेली पाहण्यात आनन्दच वाटतो.' 'केशवकुमारांनी महाराष्ट्र शारदामंदिरात एक नवीनच दालन खुले करून दिले आहे!' ( २ ) मराठीतील विडंबनाचा इतिहास. विडंबनाचे तात्त्विक विवेचन. 'विडंबन म्हणजे हास्योत्पादक अनुकरण होय.' विडंबनविषयाची तत्काल उपस्थिती झाली पाहिजे.

कवितांचे तीन वर्ग : ( अ ) केवळ विनोदात्मक. ( ब ) स्वभावदोष—दिग्दर्शनपर. ( क ) वैयक्तिक दोषदर्शनपर. –प्रो गणेशशास्त्री लेले यांच्या प्रस्तावनेवर विशेष रोख.

६१. **सुकलेले फूल :** [ कादंबरी, पु. य. देशपांडे ] साप्ता. प्रगति, २३ एप्रिल १९३१.

पटवर्धनांच्या वृत्तीचा परिचय होण्यास साहाय्यक. ही कादंबरी त्यांना मुद्दाम गौरविण्याइतकी आवडावी हे सूचक. प्रेम, विवाह यांसंबंधीही त्यांचे विचार वाचावयाला मिळतात.

( १ ) 'जिवंत कादंबरी'चा गौरव. ( २ ) कथापरिचय. ( ३ ) शेवटावर आक्षेप. –नागपुरात अशा कृती निर्माण झाल्या तर नागपुर-पुणे वाद राहाणार नाही. कादंबरीची प्रस्तावना अनावश्यक.

* ६२. **सुकलेले फूल :** यशवंत, सप्टेंबर १९३१.

[ 'लोकशिक्षण' मधील या कादंबरीवरील ऑगस्ट १९३१ च्या अंकातील श्री. शालीनदत्त शिदोरे यांच्या टीकेस उत्तर ]

पटवर्धनांचा एक महत्त्वाचा टीकालेख.

मराठी वाङ्मयात वैरल्याने उपजणाऱ्या कलाकृतीवरील टीकेचा परामर्श घेण्यास स्वयंस्फूर्तीने पटवर्धन पुढे आले.

( १ ) "सुकलेले फूल" हे गद्यग्रथित भावगीतच. वैवाहिक जीवनातील आदर्श पण प्रत्यक्षातील विकटता यांचा विचार करावयाला लावण्याचे सामर्थ्य. ( २ ) कृष्णेच्या विवाहवचनभंगाच्या प्रश्नाचा खोल व स्पष्ट विचार. कृष्णेने केशवाचा विश्वासघात केला नाही. ती कामतृप्तीच्या मागे नव्हती. तिने क्षणिक मनोदौर्बल्यावस्थेत, अनुकंपा

व कृतज्ञता यांयोगे केशवाला वचन दिले. दिवाकराचे ठिकाणी खऱ्या स्त्रीस्वभावसहज प्रीतीचा उद्‌भव झाल्यावर केशवाशी लग्न करणे हाच व्यभिचार. ( ३ ) दिवाकर पतित असला तरी मूलतः सत्प्रवृत्त. दिवाकर-शकुंतला प्रीतिविवाह ही बौद्धिक चूक. ( ४ ) स्वभावातील विसंवाद हे चौघांच्या दुःखाचे कारण.

[ यावर शिदोऱ्यांचे उत्तर : "सुकलेले फूल", ' उत्तरास प्रत्युत्तर ', 'लोकशिक्षण', डिसेंबर १९३१. पण पुढे पटवर्धनांनी प्रतिवाद केला नाही. ]

६३. दूर्वांकूर : [ काव्यसंग्रह, गोपीनाथ तळवलकर, १९२९ ] सासा. प्रगति, २८ नोव्हेंबर १९३१.

छोटा अभिप्राय.

( १ ) काव्यात जिव्हाळा हवा. ( २ ) ऐन तारुण्यात रडगाणी गाण्याची कवींची वृत्ती रोगट. ( ३ ) जिव्हाळ्याप्रमाणेच सामान्याचे विशेषीकरण झाले पाहिजे. ( ४ ) काही रचनादोष, तथापी संग्रह वाचनीय आहे. कवीने व्यक्तिमत्ता वाढवावी. सांप्रदायी होऊ नये.

६४. ( १ ) **महाजनांची कविता, भा. १** : [ कवी देवीदास लक्ष्मण महाजन ]
( २ ) **कविसंमेलन, भा. २** : [ संपादक दे. ल. महाजन, १९३१ ] महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९३२ ( व. ४ अं. ४ ).

छोटा, पानभर अभिप्राय. पटवर्धनांचे नेहमीचे विचार.

मराठवाड्यासारख्या निजामी मुलुखात मराठी जिवंत ठेवण्याच्या प्रयत्नाबद्दल अभिनंदन. सामान्य गौरव. – भाषाशुद्धीकडे लक्ष देण्याची सूचना. गज्जलांतील दोष. – ' वशिल्याशिवाय प्रसिद्धी नाही ' या तक्रारीला उत्तर. – ' जे हृदयापासून निघेल तेच हृदयात रिघेल. '

६५. **रणदिवे यांची कविता, भा. १** : [ दत्तात्रय भिमाजी रणदिवे यांचा कविता संग्रह, १९३१. ] महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९३२ ( व. ४ अं. ४ )/ पृ. ३०३.

त्रोटक अभिप्राय.

' मराठी भाषा ही महाराष्ट्रातील अमूक एका धर्माची अथवा जातीची मिरास नसून ती अवघ्या मराठ्यांची आहे. रणदिवे यांची जैनविषयक कविता...सर्व मराठी जैनेतरांसही वाचनीय अशी झाली आहे. '

६६. **चन्द्रिका** : [ काव्यसंग्रह, चंद्रशेखर १९३२ ] महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल १९३२ ( व. ५ अं. १ )/ पृ. ८०-८१.

चंद्रशेखरांच्या काव्याचा गौरव. त्यांच्या गुणांचे निदर्शन. या कवितेचे वळण जुने. पण स्वाभाविक सौंदर्यामुळे मोहकतेत उणेपणा येत नाही. संस्मरणीय काव्य-कामगिरी, पण अपेक्षेच्या मानाने मोठी नाही. ही चंद्रिका एखाद्या महाकाव्याची प्रस्तावना ठरेल अशी आशा.

□ ६७. **चान्दरात :** [काव्यसंग्रह. अनंत काणेकर] प्रतिभा, ११ सप्टेंबर १९३३/ ५॥ पृष्ठांचे दीर्घ, गौरवयुक्त परीक्षण. पटवर्धनांची काव्य–टीका-विषयक मते, प्रेमविषयक विचार यातही आढळतात

( १ ) **प्रास्ताविक :** टीकाकाराची भूमिका. स्वतंत्र टीकालेखन करणाऱ्या टीका-कारापुढील अडथळे. स्वतःचे धोरण. (२) ‘ चान्दरात ’संबंधी प्रास्ताविक. हृदयङ्गम भावगीतसंग्रह. कवितांची जुळणी कालक्रमानुसारी का नाही? परिष्करण. ( ३ ) कवितांचा परिचय. कवितांच्या लेखनकालावरून कविवृत्तीचा अन्वय शोधण्याचा प्रयत्न. काही कवितांचे विवेचन. १. आरंभीच्या कविता. २. विडंबनगीते ( यांत ‘ बेगमेचे शिवाजीच्या पत्रास उत्तर ’ संबंधी प्रत्युत्तर ). ३. प्रत्यक्ष सृष्टीचा परिचय. ४. इतरांविषयी सहानुभूती. ( ४ ) काव्य आणि कविचरित्र, अनुभूती यांविषयी तत्त्वविचार. ( ५ ) गुणविशेष–सहृदयता, स्वातंत्र्य, निर्व्याजता, सत्यसाक्षित्व. भाषा-सेवा. ( ६ ) समारोप.

६८. **साक्षरतेच्या प्रसाराची योजना :** प्रतिभा, शुक्रवार, ३० मार्च १९३४, (व. २ अं. ७).

“ Mass: Education in India–with special reference to the Bombay Presidency ” या रा. वि. परुळेकर यांच्या पुस्तकावर एक पानी छोटा अभिप्रायलेख. शिक्षणशास्त्रासंबंधी काही विचार.

‘ बहुजनसमाज साक्षर आणि मताधिकारी झाल्याविना लोकवट यशस्वी होण्याची आशा नाही. ’ ‘ अल्पसंख्यांकांच्या आदर्शभूत प्राथमिक शिक्षणासाठी बहुजनसमाज सदोदित निरक्षर ठेवणे म्हणजे घोडचूक आहे. शिक्षणाची पद्धत थोडी मागासलेली असली तरी चालेल. पण ती सवंग पाहिजे. ’ चर्चेत फार काळ न घालवता धडाडीने व मोकळ्या मनाने प्रयोग करून पाहाण्याची वेळ आली आहे.

□ ६९. **स्फूर्तिलहरी :** [ काव्यसंग्रह, काव्यविहारी, १९३६ ] लोकशिक्षण, ऑगस्ट १९३६ ( व. ७ अं. २ ).

१५ पृष्ठांचा महत्त्वाचा परीक्षणलेख.

( १ ) प्रास्ताविक : ‘ कविता गवताऐसी उदंड वाढली ’ या हाकाटीवर टीका. थोडी औपरोधिक. काव्यविहारींच्या कवितेचा प्रास्ताविक परिचय. त्यांची काव्यदृष्टी.

तिच्यावर थोडी टीका. त्यांच्या दृष्टीत एकांगीपणा आहे. काव्याचे कार्य 'तुतारी'चे नाही. 'स्वतःच्या काही गोष्टींचा, पूर्वकालींच्या मधुर:स्वप्नांचा विचारच करावयाचा नाही असा निश्चय झाला की, सामाजिक सुखदुःखांचा विचार सुचतो.' (२) काव्य म्हणजे काय? 'काव्य म्हणजे भावपूर्ण मूर्त विचार होय' सर्वसामान्य कवींना संस्करण–परिष्करणाची आवश्यकता. उत्कृष्ट कृतीची जितकी चिकित्सा करावी तितकी सौंदर्यनिष्पत्ती अधिकच होते. कृत्रिमतेच्या संश्रयाने रसहानी होणाऱ्या काव्यविहारींच्या काही कवितांची चिकित्सा. त्यांच्या काही रूपक–कवितांची गुणदोषचिकित्सा. (३) काव्यविहारींच्या काही सुंदर कवितांचे सौंदर्यदर्शन. त्यांतील काही सूक्ष्म उणिवा. (४) आणखी काही कविता. जानपद कविता. सामाजिक सुधारणेची एक कविता. (५) समारोप. संग्रहावर साकल्यात्मक भाष्य. काव्याची भाषा. काळच निर्णायक टीकाकार.

७०. छायाप्रकाश : [ कादंबरी, गोपीनाथ तळवलकर ] महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९३७ (व. ९ अं. ४).

१०–१२ ओळींचा त्रोटक, औपचारिक अभिप्राय. कादंबरीचा गौरव.

भाषा साधी, प्रसन्न; वर्णनशैली चटकदार. शृंगारिक वर्णनात मर्यादा पाळूनही लालित्यात उणेपणा नाही. स्वभावचित्रण पात्रबाहुल्यामुळे अस्पष्ट. नायक समाजवादी असूनही कादंबरी प्रचारकी झालेली नाही. वस्तुस्थितीचे विस्मरण पाडणारी नाही, तशी वास्तववादाच्या मिषाने गटारातील घाण उपसणारी नाही.

७१. खरा उद्धार : [ कादंबरी, रामतनय ] महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जुलै १९३७ (व. १० अं. २) / २॥ पृष्ठे.

(१) मनोरंजनाबरोबरच उद्बोधनाचा लेखकाचा हेतू सफल. (२) गुणदर्शन. ऐकान्तिक मतप्रचार नाही, समतोलपणा. वाङ्मयाच्या दृष्टीने तात्कालिक विषय आणि नित्य विषय असे अंतर. (३) स्वभावरेखा. त्यांतील सामर्थ्य, उणिवा. प्रसंग. प्रणयचित्रण. भाषा अधिक ललित असती तर बरे झाले असते. खेड्यातील सम्यग्ज्ञान सखोल सहानुभूतीने त्यांनी आत्मसात करून घेतलेले दिसते. शाश्वत वाङ्मयाचा उगम अशाच सम्यग्ज्ञानातून. (४) दोषदर्शन, आणि त्याबाबत सूचना. (५) विद्यापीठाची पदवी नसल्याबाबतच्या लेखकाच्या उल्लेखावर भाष्य–पदवीला महत्त्व नाही, पण ती तुच्छही नाही. त्याविना अडून बसू नये. 'जिवंत वाङ्मयाला जनतेच्या हृदयात अढळपद मिळतेच मिळते.' 'ज्याच्या तोडीचा कादंबरीकार महाराष्ट्रात अद्यापि झाला नाही' असा ह. ना. आपट्यांचा उल्लेख.

७२. क्षितिजावर : [ काव्यसंग्रह, दत्तप्रसन्न कारखानीस, १९३५ ] महाराष्ट्र

साहित्य पत्रिका, ऑक्टोबर १९३७ ( व. १० अं. ३ ) / अर्धे पान/' मा. प. ' नावाने.

काही सामान्य उद्गार. संस्मरणीय कवितांचे नामोल्लेख. काही दोष, अपुरेपणा– ' कुतूहलजनक विचारमालेत असंभाव्यता भासली तर कृत्रिमतेचा वास येऊ लागून रसहानी होते. ' – भाषेच्या शुद्धतेसंबंधी टीका. कोश पाहाण्याची सवय कवीने ठेवावी. अशुद्धता उद्वेगजनक होते. ' आधी कविता निर्दोष पाहिजे, मग तीत रमणीय अर्थ पाहिजे, म्हणजे ती सरस आपोआप वठते. '

**७३. सुनीतिका :** [ सुनीत संग्रह, कुमुदबांधव, १९३७ ] यशवंत, डिसेंबर १९३७ / १–१॥ पृष्ठांचे रसग्रहण.

( १ ) संग्रह-परिचय. सुनीतांची मराठीतील परंपरा–थोडक्यात. ( २ ) सुनीताच्या बाह्यांगाची चर्चा. सुनीताचे चरण चौदाच का याला परंपरा आणि प्रचलित रचना यांखेरीज सयुक्तिक कारण नाही. चरणसंख्यांची विभागणी, यमक यांचा विचार. अनुभवाने शार्दूलविक्रीडित वृत्त योग्य. ( ३ ) बाह्यांगापेक्षा अंतरंग प्रधान. कुमुदबांधवांवर स्वतःच्या ( पटवर्धनांच्या ) काव्याची स्पष्ट छाया असल्याचा अभिप्राय. ' अशा हिरकण्या हस्तगत करायला मातीधोण्ड्याचे डोङ्गर उपसावे लागले तरी ते कष्ट मी आनन्दाने पत्करीन. ' ' फार्सी शब्दांच्या दाट पेरणीवाचून गज्जलाचा ताटवा टवटवून वर येत नाही असे थोडेच आहे ! ' ( ४ ) काही चांगल्या सुनीतांचा परिचय. वरवर क्षुद्र परंतु वस्तुतः संस्मरणीय प्रसंगांचा कवी सखोल सहानुभूतीने अनुभव घेऊन वाचकांनाही देतो. परिणामकारक ओळी शेवटी आल्या म्हणजे त्याचे पडसाद कवितेच्या समाप्तीनंतरही मनात दुमदुमत राहतात.

**७४. शिशिरागम :** [ काव्यसंग्रह, बा. सी. मढेकर, १९३९ ] सह्याद्रि, जून १९३९ / २॥ पृष्ठे.

सौंदर्यदर्शनात्मक, कवितांतून त्यामागील अंतर्वृत्ती उकलून दाखवीत दाखवीत लिहिलेला रसास्वादी लेख.

' काव्यात वसंतापेक्षा शिशिरच अधिक प्रभावी ठरतो. ' – ' मर्ढेकरांनी या वीस चिमुकल्या कवितांत निष्फल प्रेमाची सनातन पण सदा नवीन वाटणारी, हृदयंगम करुण कहाणी सांगितली आहे. ' त्या कहाणीचे गद्यातून संस्कारचित्रणात्मक निवेदन. काव्यात दोष असूनही चटकदार जिवंतपणा आहे.

**७५. गेल्या पाव शतकातील गोमन्तक :** [ परिचयपर पुस्तक, के. अ. नायक ] महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जून १९२९ ( व. १२ अं. ६ ) / पाऊण पृष्ठ.

लहान लेख, पण महाराष्ट्राबाहेरच्या मराठी भाषिकांविषयीही पटवर्धनांचा आपलेपणा, जिव्हाळा आणि सर्व मराठी भाषिकांचे, प्रदेशांचे ऐक्य झाले पाहिजे ही उत्कट इच्छा त्यातही दिसते. ' संस्कृतिदृष्ट्या गोवे हा महाराष्ट्राचाच सलग भाग आहे...'

## ( इ ) प्र स्ता व ना

७६. मधु-सम्भार : [ साहित्यस्नेहमण्डळाचे १ ले पुस्तक. काव्यसंग्रह. विरागी / १९२८ ] १ पृष्ठ.

या संग्रहाला साहित्यस्नेहमंडळाचे चिटणीस या नात्याने प्रस्तावना.

साहित्यस्नेहमंडळाचे स्वरूप, उद्दिष्ट. साहित्यप्रेमी जनांचा विचारविनिमय–त्या योगाने लेखकाची संस्कृती विकास पावते, आणि कित्येकदा सुप्त लेखनशक्ती जागृतही होते.–' व्यक्तीचे स्वातन्त्र्य सङ्घटनेच्या जोरावर नष्ट करणे वाङ्मयाभिवृद्धीच्या दृष्टीने इष्ट नाही. '

७७. ' जा सारे विसरून ?' : ' वनमाला ' [ काव्यसंग्रह, कै. सीताराम बाळकृष्ण जोशी ] प्रस्तावना / १९ फेब्रुवारी १९३७.

( १ ) दुसऱ्याकडून प्रस्तावना लिहवून घेण्याची प्रथा अनिष्ट. स्वतः कल्पनेच हवी तर लिहावी –दिवंगत कविबंधूविषयी पवित्र कर्तव्य म्हणून आत्मसमाधानासाठी ही प्रस्तावना. ( २ ) शैशव-तारुण्य संधिकाळातील मधुर स्मृती. ( ३ ) काव्य कसे प्रभावी ठरते ? परिष्करण. कविकृतींचा परिचय. सुनीताच्या प्रयत्नांसंबंधी विवेचन.

## ५. सु नी त - ग ज्ज ल वि ष य क ले ख

७८. सुनीत : ज्ञानप्रकाश, रविवार दि. २२ एप्रिल १९२३ ( काव्यशास्त्र-विनोद ) / १–१॥ स्तंभ.

( १ ) सुनीतासंबंधीची टीका अज्ञानाने. हा काव्यप्रकार मराठीत स्थायी होणार. ( २ ) सुनीताचा मराठीतील आरंभ. केशवसुत. ( ३ ) नामकरणासंबंधी चर्चा. ( ४ ) सुनीताचे स्वरूप. तात्त्विक विवेचन. चरणसंख्या–त्यांची विभागणी; यमक. शेक्सपीरियन व मिल्टॉनिक सुनीत. वृत्तयोजना. श्री. बा. रानडे यांच्या सूचना. उत्साही प्रयोगशीलतेला मान्यता, उत्तेजन.

* ७९. सुनीत आणि प्रो. सबनीस : विविधज्ञानविस्तार, ऑगस्ट १९२४ / ५॥ पृष्ठे.

( १ ) टीकाकाराचे स्वागत. कुत्सित, अश्लाघ्य टीकेसंबंधी. ( २ ) श्री. रा. प. सबनीसांच्या " काव्यविचारा "वरील परीक्षणातील ( विविधज्ञानविस्तार, मे १९२४ ) विधानांना उत्तर. ' सुनीत ' नावावरील आक्षेपांना उत्तर. ' शक्यतोवर शब्दांची उणीव स्वभाषेतच नवीन शब्द बनवून दूर करावी. ' शब्द अपभ्रष्ट आहे म्हणून केवळ अस्पृश्य न समजता परिणत करून घ्यावा. ( केशवसुतांनी इंग्रजी वाङ्मय पचवून काव्यनिर्मिती केली ). ( ३ ) प्रतिभावंतांच्या कृतीही बेबंद नसतात. त्या

सर्वांशी अनुकरणीय मानणे योग्य नाही. ( ४ ) शेवटी कमीअधिकाबद्दल सवनीसांची क्षमायाचना.

* ८०. **मराठी अभङ्ग व फार्शी गझल** : महाराष्ट्र साहित्य, एप्रिल–मे १९२०.

'महाराष्ट्र साहित्या'च्या सप्टेंबर १९१९ च्या अंकात भालचंद्र यांचा 'मराठी अभंग व फार्शी गझल' लेख. त्या चर्चेत पटवर्धनांनी लिहिलेला लेख. (भालचंद्रांच्या लेखातील १ ल्या टीपांकात मराठी अभंगाची प्रेरणा फार्शी गज्जलातून मिळाली असावी असे प्रतिपादन. टीपांक २ मध्ये नामदेव आद्य अभंगकार मानून ३ ऱ्या टीपांकात 'ज्ञानेश्वरी'चा कर्ता सच्चिदानंद असून [अखेरची ओवी वेगळ्या स्वरूपात असावी] तो निःसंग, एकटा असावा; निवृत्ती-सोपान-मुक्ता ही अभंगकर्त्या ज्ञानदेवाची भावंडे इत्यादी निष्कर्ष मांडले आहेत. 'महाराष्ट्र-साहित्या'च्या मार्च १९२० च्या अंकात वि. स. वाकसकरांनी या निष्कर्षांचा समर्पक समाचार घेऊन त्यांतील अगदी ढोबळ अपसिद्धांत उघड केले आहेत.)

या लेखात पटवर्धनांनी फक्त अभंग–गज्जल यांच्या संबंधाच्या चर्चेशीच टाम मर्यादा घालून घेतली आहे. ज्ञानेश्वर एक की दोन, ज्ञानेश्वरीचा कर्ता कोण वगैरे वादात ते शिरत नाहीत. ( १ ) घझलात १७च पंक्तींचे बंधन. ( २ ) घझलातील पंक्तींतील स्वयंपूर्णतेला अनेक अपवाद, ( ३ ) अभंग व घझल यांतील आशयातील अंतर. ( ४ ) वृत्त, यमक वगैरेंचा विचार करून 'मराठी अभंग व फार्शी घझल यांत साम्य जवळजवळ नाहीच' असा निष्कर्ष.

याला 'महाराष्ट्र साहित्या'च्या जून १९२० च्या अंकात उत्तर देण्याचा भालचंद्रांचा प्रयत्न.

८१. **गज्जल** : ( खुलासा ) महाराष्ट्र साहित्य, एप्रिल १९२२ / (व. ३ अं. १० ) पृ. २७०. [ म. नि. ]

८२. **काही नवीन चलनी वृत्तें** : विविधज्ञानविस्तार, मे १९२२ / ६ पृष्ठे.

पुणे येथे महाराष्ट्र-शारदा-मंदिरापुढे ८ जानेवारी १९२२ला वाचलेला निबंध. आधुनिक पदांच्या चालींचे वृत्तदृष्ट्या ज्ञान देण्यासाठी लेख. या निबंधातील बहुतेक सर्व विवेचन परिष्कृत, संस्कारित, अंतिम स्वरूपात "छंदोरचना"मध्ये आले आहे. मात्र ते सलग लेखस्वरूपात नसून ग्रंथाच्या योजनेच्या दृष्टीने भिन्नभिन्न ठिकाणी विखुरलेले आहे. ( १ ) प्रास्ताविक. संत, शाहीर वगैरेंच्या पदांची रचना. जुन्या पदांच्या

१. महाराष्ट्रीय ज्ञानकोश ( संपा. डॉ. केतकर ), प्रस्तावना खंड, विभाग ५, 'विज्ञानेतिहास', प्र. ५, 'वेदविद्या व तदुत्तर शास्त्रे छंद व संगीत' यामध्ये संक्षेपाने समाविष्ट / १९२२ / पृ. १५४–१५६.

चालींचा भावगीतजमान्यात पुनरुद्धार. लोकप्रिय व कविप्रिय वृत्तांचा विचार. (२) 'मनोरमा' नावाचा आठ मात्रांचा गण कल्पिला. त्याचे पाच प्रकार. पुढे क्रमाने २७ वृत्तांचे विवेचन–त्यांचे वर्णन, उदाहरणे / काही भाष्य; वृत्ताचे विशेष.

८३. **गज्जलाञ्जलि :** महाराष्ट्र साहित्य, लेखांक १, जुलै १९२२ / पृष्ठ ४१–५६ / लेखांक २, डिसेंबर १९२२, पृष्ठ २२१–२२८ / लेखांक ३, फेब्रुवारी–मार्च १९२३ / पृष्ठ ३०९–३१६.

'मागणीच्या अभावी ही लेखमाला बन्द पडली.' ("गज्जलाञ्जलि", संग्रह, प्रस्तावना). याच विषयावर "काव्यविचार"मध्ये 'वृत्त–मनोरमा' हा लेख.

फार्सी छन्दःशास्त्राचा सामान्य परिचय. पुढे क्रमाने फार्सी वृत्त, फार्सी उदाहरण, त्याचा अर्थ, टीपा, झिहाफ [=छन्दांच्या गणांतील मात्रांची कमतरता], मराठी उदाहरण. एकूण २७ गज्जलांची उदाहरणे –'फार्सी वृत्तात लिहिलेल्या कोणत्याही भावगीतास गज्जल म्हणावे.'

८४. **काही नवीन चलनी वृत्ते :** "मराठी भाषेची घटना" (रा. भि. जोशी, आ. २, ऑक्टोबर १९२३) या ग्रंथात समाविष्ट / भा. ४, 'वाङ्मयघटना–पूर्वार्ध' या प्रकरणाला परिशिष्ट / पृ. ३२०–३३४.

विविधज्ञानविस्तार, मे १९२२, 'काही नवीन चलनी वृत्ते' यापेक्षा थोडा वेगळा. "छन्दोरचना", प्रास्ताविक, पृ. ६.

तेवीस वृत्तांचे विवेचन. प्रथम वृत्तनाम, पुढे लक्षण, थोडक्यात विवेचन. उदाहरण-पंक्ति. उदाहरणे विस्तृत.

८५. **वृत्त मनोरमा :** "काव्यविचार" (१९ डिसेंबर १९२३) प्रका. २३ जानेवारी १९२४ / १७ पृष्ठे.

(१) अरबी छंदःशास्त्राचा मराठी भाषिकांना परिचय करून देणारा लेख. एकंदर ७१ वृत्तप्रकारांचे सोदाहरण विवेचन. या वृत्तप्रकारांचे ५ वर्ग. (२) वृत्त-विवेचनाची उदाहरणे. प्रथम फार्सी नाव, त्याचे मराठी नाव, मराठीतील ज्ञात वृत्तप्रकाराचे नाव, पुढे पृथक्करण, आणि नंतर स्वरचित उदाहरण, असा क्रम.

□ * ८६. **गज्जलावरील आक्षेप :** ज्ञानप्रकाश, २, ९, १६ जानेवारी १९२६ / तीन लेखांक.

(१) श्री. नि. चापेकर यांनी गज्जलावर घेतलेल्या आक्षेपांना या तीन लेखांत उत्तरे. 'गुपचुप झालेले आचरण खपते; पण उघड कृती व तिचे समर्थन समाजाला चालत नाही!' (२) प्रो. चापेकरांचा एकेक आक्षेप घेऊन त्याचे खंडन. (अ) 'पूर्वी मराठीला फार्सी वृत्ते परिचित होती; पण मराठीच्या स्वाभाविक प्रवृत्तीशी ती

विसंगत असल्याने नष्ट झाली.' चापेकर ] ही प्रवृत्ती नवीनच आहे. ( ब ) [ 'फार्सी वृत्ते कृत्रिम, क्लिष्ट, वैगुण्ययुक्त, रचनाप्रधान आहेत.' चापेकर ] मूलतः पद्यरचना कृत्रिम. संस्कृतातही क्लिष्ट वृत्ते आहेत किर्लोस्करादिकांनी मराठीत यशस्वी, लोकप्रिय गज्जलरचना केली आहे. ( क ) [ 'मात्रामापन इत्यादींची भिन्नता'–चापेकर] हा आक्षेप कपोलकल्पित, गौण. ( ड ) [ 'नादानुकूलतेच्या बाबतीत क्षीणशक्ती'–चापेकर ] हा दोष कवींचा, मराठीच्या प्रवृत्तीचा आहे. ( इ ) [ 'या प्रांतात गज्जलाचे खरे स्वरूप समजणार नाही. मराठवाड्याकडे अधिक शुद्ध'–चापेकर ] ते खरे नाही. मोगलाईतील दे. ल. महाजनांच्या गज्जलरचनेतील अशुद्धता. ( ३ ) मराठीतील फार्सी शब्दांचा उपयोग. भाषापद्धती, लेखनपद्धती यांचा विचार. अखेर दे. ल. महाजनांच्या लेखातील दोषदर्शन.

८७. **फार्शी गज्जलांचे अन्तःस्वरूप** : विविधज्ञानविस्तार, फेब्रुवारी १९२७ / ७–७॥ पृष्ठे / गज्जलासंबंधी सामान्य माहिती कळण्यास उपयुक्त.

( १ ) वाङ्मयाची स्वतंत्रता हे उद्दिष्ट. पण अन्य भाषा–वाङ्मयाच्या परिचयाने व्यापकता येते. प्रस्तुत लेखामागील भूमिका. ( २ ) फार्सी गज्जलांचे स्वरूपवर्णन. त्यांतील उणिवा. विविधतेचा पूर्ण अभाव; स्वदेशी वैशिष्ट्य नाही. त्याची कारणमीमांसा. या अनुषंगाने काव्यरचना कोणत्या स्थितीत होते याचा तात्त्विक विचार. (३) यापुढे, प्राधान्याने हाफिझच्या तीन उताऱ्यांवरून उपरिचर्चित गज्जलविशेषांची उदाहरणे. त्यांतील शृंगार, सूफीवाद, सुखलोलुपी उमरखय्यामी वृत्तीचे उद्गार. गज्जलांचा उगम. मदिरा, प्रेम, आशुक-माशुकांचे वर्णन. ( ४ ) समालोचन. गज्जलांतील प्रेमविषय कृत्रिम व विटाळ्याचा दिसतो. मनोवृत्तीची विविधता त्यांत नाही

८८. **प्रस्तावना** : गज्जलाञ्जलि [ गज्जल–संग्रह ], २९ मे १९३३ / ८ पृष्ठे. 'गज्जल' या वाङ्मयप्रकाराविषयी हा स्वतंत्र निबंधच आहे.

( १ ) गज्जल या पद्यप्रकाराची माहिती. त्याचे मूळ अरबी. मराठीत तो उर्दूद्वारा आला. गज्जल व गायन. त्याची छंदोरचना. – मराठीतील पूर्वीचे गज्जल. त्यांचे नमुने. त्यांच्याशी सदृश प्रस्तुत संग्रहातील गज्जल. पूर्वीच्या गज्जलांतील वृत्तशैथिल्य नको. ( २ ) काव्यक्षेत्रात गायनाचे वर्चस्व असताच कामा नये. अर्थस्वारस्य व गायनानुकूलता यांचे प्रमाण ( एक आलेख. )( ३ ) या रचनाशैथिल्याकडे स्वतःचे लक्ष कधी वेधले त्याचा इतिहास. या संग्रहाचे स्वरूप. या संग्रहातील प्रत्येक चुटका गज्जलच आहे असे नाही. कसीदा, गज्जल, मुस्तझाद्. ( ४ ) फार्सीतील या वाङ्मयप्रकाराचे स्वरूप. त्याचा परिचय, चर्चा. त्यातील दोषदर्शन. – 'अरबी-फार्सी वृत्ते शुद्ध स्वरूपात मराठीत आणावीत या हेतूनेच ही भावगीते बहुतेक लिहिण्यात आली आहेत.' – एकयमकीपणाचे बंधन. काही थोडे प्रश्न. ( ५ ) 'हा एक हौसेचा

प्रयोग.' आभार.

* ८९. **गज्जलाञ्जलि आणि वाङ्मयऋण** : ज्ञानप्रकाश, १६ जुलै १९३३ / १॥ स्तंभ.

रविवार दि. २ जुलै १९३३ च्या 'ज्ञानप्रकाश' साप्ता. अंकात 'काव्यशास्त्र-विनोद' सदरात "गज्जलाञ्जली" चे परीक्षण. एकंदरीत गौरवपूर्णच, पण त्यात काही गज्जलांचे मूळ अन्यत्र असावे अशी शंका घेतली असल्याची पटवर्धनांनी कल्पना करून घेऊन त्यासंबंधी उत्तर देणारा लेख.

'महात्मा' संबंधी स्पष्टीकरण. – 'कुणीही उठावे व वाङ्मयचौर्याचा आरोप करावा.' – काही कल्पना व वाक्प्रयोग सर्वांच्या मालकीचे होतात. – काही कल्पना, वाक्प्रयोग इंग्रजीच्या वाचनाने सहजगत्या मराठी लेखनात येऊन जातात. – कधी प्राचीन वाक्प्रयोग सहेतुकपणे योजले जातात. साम्यस्थळे, वाङ्मयचौर्य, कवितेची स्वतंत्रता यांचा थोडक्यात विचार.

## ६. पद्यरचनाशास्त्र विषयक लेख

९०. **आरम्भींचे दोन शब्द** : प्रस्तावना, छन्दोरचना, आ. १ ( २६ जून १९२७ ) / २॥ पृष्ठे.

ग्रंथासंबंधी व्यक्तिगत प्रास्ताविक निवेदन. पुस्तकाच्या अंतःस्वरूपाचा परिचय. स्वतःच्या या क्षेत्रातील स्वतंत्र, नवीन कर्तृत्वाचे निवेदन. – ग्रंथरचनेचा इतिहास.

९१. **छन्दोरचना–खुलासा** : ज्ञानप्रकाश, २२ नोव्हेंबर १९२७.

१९ नोव्हेंबर १९२७ च्या 'ज्ञानप्रकाश' मध्ये ह. स. गोखले यांचे "छन्दोरचने"तील स्वतःच्या उल्लेखासंबंधी पटवर्धनांवर हेतूचा आरोप करणारे पत्र. "काहीतरी"–परीक्षण वादाचा संदर्भ.–त्याला गोखल्यांच्याच सुरात दिलेले उत्तर–खोचक, तीव्र.

'मित्रांच्याही रचनेतील दोषस्थळांचा उल्लेख केला आहे.' 'कवीला साधी सहानुभावी प्रतिकूल टीकाही सहन होत नाही.'

९२. **निर्यमक पद्य का स्वैर पद्य ?** : वागीश्वरी, सप्टेंबर १९३३ / १॥ पृष्ठे. छोटा स्फुट लेख. यातील बहुतेक प्रतिपादन "छन्दोरचना" (आ० २) मध्ये आले आहे.

( १ ) जाती जशा मात्रासङ्ख्याक, तसे छंद अक्षरसङ्ख्याक. छंद पद्मावर्तनी व भृंगावर्तनी. ( २ ) तालाचे वर्णन. कवीच्या मनातील तालाप्रमाणे वाचन केल्यासच गोड लागते. छंद गेय. ( ३ ) दीर्घकाव्याला कोणता प्रकार सोयीचा ? ते कविप्रकृती-

वर अवलंबून. (४) स्वैरपद्याची प्रेरणा. आ. रा. देशपांडे यांच्या सप्तमात्रिक जातिरचनेपेक्षा पद्मावर्तनी जाती वा छंद सुकर व लवचिक आहे.

९३. **स्वैर पद्य** : विश्ववाणी, ऑक्टोबर १९३५ (व. ४ अं. १) / पृ. ६३–६९. [म. नि.]

९४. **वृत्तरचना आणि संगीत** : "तांबे–व्यक्ति आणि कला", ६ नोव्हेंबर १९३५ / खं० ३, पृ. १२–१७.

९५. **छन्दःशास्त्राचा त्रोटक इतिहास** : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल–जुलै १९३६ (व. ९ अं. १, २)

हाच संपूर्ण लेख "छन्दोरचना" (आ० २) मध्ये समाविष्ट. अध्याय ८. किरकोळ बदल. त्यातील २६ वा 'छन्दोरचने' संबंधीचा भाग या लेखात नाही.

९६. **छन्द** : व्यावहारिक ज्ञानकोश, भा. २ / मुख्य संपादक ग. रं. भिडे / जानेवारी १९३७ / पृ. ६५६–६५९.

छोटे परिचयपर टिपण. [ तेथे लेखकाचे नाव नाही, पण मजकूर 'छन्दोरचने'तील (आ० २) बहुतेक आहे, आणि कोशाच्या आरंभी या भागातील प्रमुख लेखक म्हणून माधवराव पटवर्धनांचे नाव आहे. ]

९७. **सिंहावलोकन** : छन्दोरचना (आ० २) / लेखन २३ जानेवारी १९३७ / प्रकाशन १९३७, प्रस्तावना / ३॥ पृष्ठे.

[ Introduction–दोन पृष्ठांची इंग्रजी प्रस्तावना. मराठी विद्यार्थ्यांसाठी हा ग्रंथ प्रामुख्याने, पण संस्कृत छन्दःशास्त्राच्या अभ्यासकांना उपयोगी होईल म्हणून आपल्या संशोधनाच्या स्वरूपाचे विशदीकरण करणारे इंग्रजी प्रास्ताविक. ]

(१) आपण या अभ्यासाकडे केव्हापासून वळलो याचा इतिहास फार्सी छन्दःशास्त्राचा अभ्यास स्वतःला काय नवीन आढळले ते नमूद केले. पहिल्या आवृत्तीचा पूर्वेतिहास. तिचे स्वरूप. (२) दुसऱ्या आवृत्तीच्या रचनेचा इतिहास. पूर्वीच्या उणिवा, अपुरेपणा दूर केला. अथपासून इतिपर्यंत ग्रंथ नवीनच लिहून काढला. (३) यातील संशोधित प्रमेय- 'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना होय.' या ग्रंथाचे स्वरूप.–शेवटच्या परिच्छेदात व्यक्तिगत पातळीवर, हृद्य समारोप. 'छन्दाला मोल नाही, गत्यन्तरही नाही '

९८. **कवितेचे छन्दान्तर आणि त्याचे समर्थन** : ज्योत्स्ना, एप्रिल १९३७ / ३॥ स्तंभ / 'ज्योत्स्ने'च्या चर्चात्मक सदरात.

(१) ललित गद्यलेखन व पद्यलेखन यांत मौलिक भेद वाटत नाही. ललित वाङ्मयाची निर्मिती ही अंशतः गूढ अशी एक क्रिया आहे. कवितेच्या प्रथम–

लेखनात दोष राहातात. पुढे परिष्करण करण्याची आवश्यकता. ( २ ) शब्दांची तालानुसार जुळणी म्हणजे छंदोरचना होय. कविता छंदोरूप घेऊन बाहेर पडते. पण आशयाच्या अभिव्यक्तीला अत्यन्तानुरूप असा तो (प्रथम-लेखनाच्या वेळचा) एकच एक छंद असेल असे नाही. तो छंद योग्य न वाटल्यास, कालांतराने, पूर्वीच्या मनःस्थितीत जाता येणे शक्य असेल तर अवश्य छंदान्तर करावे. ( ३ ) 'चिमुकली शान्ता', व 'बघे प्रथम मी बालवयीं' या स्वतःच्या कवितांची उदाहरणे.

* ९९. **दिण्डीचे लक्षण ( उत्तर ) :** 'केसरी', मंगळवार २९ जून १९३७. 'प्रो. माधव ज्युलियनांची दिंडी' या ८ जून १९३७ च्या 'केसरी'तील वि. ज. सहस्रबुद्धे यांच्या लेखाला उत्तर / २॥–३ स्तंभ.

* १०० **अनुष्टुप ( श्री. कुंदरराव दिवाण यांस उत्तर. ) :** लोकशिक्षण, ऑक्टोबर १९३७ ( व. ८ अं. ४ ).

'लोकशिक्षण'च्या ऑगस्ट १९३७ च्या अंकात कुंदर दिवाण यांचा 'अनुष्टुप्'वर लेख. त्यावर उत्तर.

( १ ) अनुष्टुपाचा विचार "छन्दोरचने"च्या प्रथमावृत्तीत नाही, तरी द्वितीयावृत्तीत आहे. भगवद्गीतेतील अ. १, ५, ७, १०, १२, १४, १६ या सात अध्यायांतील २१९ श्लोकांच्या पृथक्करणाने अनुष्टुपाची लक्षणे निर्धारित करण्याचा प्रयत्न.

[ यावर 'लोकशिक्षणा'च्या डिसेंबर १९३७ च्या अंकात दिवाणांचे पुन्हा उत्तर. 'समचरणांत तृतीय अक्षर गुरूच पाहिजे.' हे पटवर्धनांचे म्हणणे त्यांच्या मते प्रामादिक. ]

१०१. **प्रस्तावना :** पद्यप्रकाश ( ५ नोव्हेंबर १९३८ ) / प्रका. १९३८ / २ पृष्ठे. सर्वसामान्य प्रस्तावना.

'मराठदेशात चालू असलेल्या पाठ्यपुस्तकांतील पद्यप्रकारांची शुद्ध स्वरूपे समजण्यास शिक्षकांना नि विद्यार्थ्यांना साह्य व्हावे म्हणून पद्यप्रकाश हे पुस्तक लिहिण्यात आले आहे.' या पुस्तकाची आवश्यकता व उपयुक्तता.

१०२. **दिण्डी जातीचे शास्त्रशुद्ध लक्षण :** सह्याद्रि, जानेवारी १९३९/पृ. ४७–५०. गोविंदराव खासगीवाल्यांचे दिण्डीच्या लक्षणासंबंधी मत सांगून त्याची परीक्षा. त्या लक्षणाची सदोषता. स्वतःच्या पद्धतीने मांडणी.

* १०३. **'छन्दोरचने'चे समर्थन :** लोकशिक्षण, जुलै १९३९ / १० पृष्ठे.

'लोकशिक्षण', जून १९३९ च्या अंकात बाळाचार्य खुपेरकर यांचे "छन्दोरचने"चे विस्तृत समालोचन. त्यातील आक्षेपांना कर्तव्यबुद्धीने उत्तर देणारा दीर्घ

लेख. " छन्दोरचने "विषयी पटवर्धनांची भूमिका समजण्यास महत्त्वाचा.

( १ ) पद्यातील लयबद्धतेचे तत्त्व पटवर्धनांनी नवीन शोधून काढले नाही अशा मुळावर कुऱ्हाड घालणाऱ्या महत्त्वाच्या आक्षेपाला उत्तर. पद्यशास्त्राची घटना स्पष्ट करणारे रेखाचित्र. ( २ ) पटवर्धनांनी स्वीकारलेल्या गणकल्पनेवरील आक्षेपाला उत्तर. ( ३ ) यतिविचारासंबंधीच्या आक्षेपाला उत्तर. ( ४ ) यानंतर, दुसऱ्या तितक्याशा महत्त्वाच्या नसणाऱ्या आक्षेपांचा विचार : १–' " छन्दोरचना " अकारण फुगली ' याला उत्तर. हा ग्रंथ मूलतः पद्यशास्त्राच्या अभ्यासकांसाठी आहे.–२. यमकासंबंधीचा इतिहास. भारवीचे उदाहरण का?–३. ' छन्द ' शब्दाचा अर्थ. त्याचा वापर.–४ अक्षराची व्याख्या.–५. मोरोपंताला गाण्याचा कान नसावा.

## ७. रसविचार आणि वाङ्मयानन्द – मीमांसा

□ १०४. **रसव्यवस्थेचे वैयर्थ्य** : सह्याद्रि, नोव्हेंबर १९३७ / ६॥ पृष्ठे.

रसव्यवस्था अस्तित्वात कशासाठी आली असेल याचा विचार करून मग ती शास्त्रशुद्ध आहे की नाही याची चर्चा. ( १ ) रसव्यवस्थेचा उगम. ( २ ) रसविचार. ( ३ ) भावनेवरून वर्गीकरण. ( ४ ) भावभेदाचे स्वरूप. ( ५ ) मूलभूत मतभेद. ( ६ ) सुचवावयाच्या सुधारणा.–' काव्यचिकित्सेच्या दृष्टीने हा सगळा खटाटोप अनावश्यक आहे असे म्हणणे प्राप्त आहे. '

□ १०५. **रसव्यवस्था नि आस्वाद्यमानता** : 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', ऑक्टोबर १९३७ ( व. १०, अं. ३ ) / पृष्ठे ४.

प्रस्तुत लेख ऑक्टोबरात व ' रसव्यवस्थेचे वैयर्थ्य ' (' सह्याद्री 'मध्ये ) नोव्हेंबरात प्रकाशित झाला असला, तरी संदर्भदृष्ट्या तो लेख पहिला असून हा नंतरचा आहे. द. के. केळकरांच्या रसमीमांसेच्या अनुषंगाने लेखन.

( १ ) रसव्यवस्था काव्यगत व्यक्तीच्या भावनेवर व्हावी की, रसिकाच्या मनावरील परिणामावर व्हावी? रसाची स्थापना वाचकाच्या भावनेवर करणे तितकेसे विश्वसनीय नाही. १. अभिरुचिभेद. २. काव्यगत व्यक्तीची भावना व रसिकाची भावना यांत अंतर असते. ३. वाचकाला वाटणारी भावना हीही संमिश्र असणे शक्य आहे. भावनाभेदाने सर्व काव्यांचे शास्त्रीय वर्गीकरण अशक्य आहे. (२) ' कोणतीही भावना रसपदवीस पात्र ठरण्यास आस्वाद्यमानता ही कारण ' या केळकरांच्या मतावर टीका. १. ही उपपत्ती केळकरांनी स्पष्ट केली नाही. २. ' उत्कटतेने आस्वाद्यमान ' याचा अर्थही निश्चित नाही. प्रा. रा. श्री. जोग. ३. कलेच्या दृष्टीने अनास्वाद्यमान असे काही नाही. ( ३ ) समाजहितपोषकतेचा रसाशी काही एक संबंध नाही. रसव्यवस्था लावावयाला आस्वाद्यमानता उपयोगी पडत नाही. रसविवेचन हे कितीही

पांडित्यपूर्ण वाटत असले तरी ते शून्यसंशोधनच ठरते.

१०६. **वाङ्मयानन्द–मीमांसा** : पूर्वार्ध. लोकशिक्षण, मार्च १९३८ (व.८ अं.९)/ ९ पृष्ठे.

विशुद्ध काव्यशास्त्रीय चर्चा करणारा महत्त्वाचा लेख. द. के. केळकर यांच्या "काव्यालोचना"तील 'स्वायत्त तादात्म्या'च्या उपपत्तीची चर्चा, आणि तिला विरोध करून स्वतःच्या भूमिकेचे प्रतिपादन.

( १ ) वाङ्मय नि इतर ललितकला यांच्यापासून होणाऱ्या आनंदात बाह्यतः भेद दिसला तरी दोन्हीतही तो आनंद बुद्धिगम्यच आहे. ( २ ) वाङ्मयानंद अनेकघटकघटित असतो. त्यांपैकी एक महत्त्वाचा घटक चमत्कृती. ( ३ ) वाङ्मयानंद–मीमांसेत केवळ करमणुकीच्या लिखाणाचा विचार अप्रस्तुत आहे. श्रेष्ठ वाङ्मयाचा परिणाम. न. चिं. केळकरांची 'सविकल्प समाधी', द. के. केळकरांची 'स्वायत्त तादात्म्य', या उपपत्तींची चर्चा. त्यांच्यावर शंका. ही तल्लीनता शास्त्रीय वाङ्मयाने, खेळण्यानेही येते. तादात्म्य न झाले तरी आनंद मिळू शकतो. ( ४ ) आनंद–प्रतिकूल रसापासून आनंदोत्पत्ती कशी होते याचा विचार. 'सहानुभूती'चा अर्थनिश्चय.

**वाङ्मयानन्द-मीमांसा** : उत्तरार्ध. 'लोकशिक्षण', एप्रिल १९३८ (व. ८ अं. १०)/ १२ पृष्ठे.

हा भाग पूर्वार्धापेक्षा अधिक महत्त्वाचा. यात स्वतः पटवर्धनांनी आपली उपपत्ती सांगितली आहे. मानसशास्त्रीय चर्चा अधिक.

( ४ ) 'सहानुभूती'च्या अर्थाची अधिक चिकित्सा. द. के. केळकरांच्या अभिप्रेत अर्थावर आक्षेप. सहानुभूती व तादात्म्य यांत अंतर आहे. 'सहानुभूती' शब्द वापरण्यात केळकरांची फसगत. करुण भावनेची चिकित्सा. तीव्र सहानुभूती काव्यास्वादाच्या आड येते. ( ५ ) 'स्वायत्त तादात्म्या'ची आणखी परीक्षा. पटवर्धनांची उपपत्ती 'दूरान्वित अनुभव घेणे म्हणजे रसास्वाद घेणे.' त्यावरील संभाव्य आक्षेपांचे निराकरण. ( शोक नि हास्य यांचा थोडा स्वतंत्र विचार ). 'जिज्ञासू ताटस्थ्यावाचून कलेचे खरे रहस्य कळत नाही.' पात्रांच्या अनुभूतीपेक्षा वाचकाच्या अनुभूती फिक्या. ( ६ ) कुतूहलपूर्तीची उपपत्ती. तिचा विस्ताराने विचार. 'नवीन जिव्हाळ्याचे ज्ञान हा वाङ्मयानन्दाचा गाभा होय.' वाङ्मयनिर्मिती, व्यक्ती आणि समाज संबंध वगैरेंचा विचार. अखेरच्या परिच्छेदात पटवर्धनांच्या उपपत्तीचे प्रतिपादन.

## ८. भाषाशुद्धि

१०७. **मराठी शब्दसम्पत्ति व पद्याची भाषा** : महाराष्ट्र साहित्य पत्रिका (विविधज्ञानविस्तारान्तर्गत), मे १९२५ / पृ. २१-३२.

हा निबंध ' पद्याची भाषा ' या नावाने " छन्दोरचना " प्रथमावृत्तीत परिष्कृत स्वरूपात, संक्षेपविस्तार करून समाविष्ट झाला आहे. बहुतेक प्रतिपादन सारखे, परंतु रचनेत बदल. ' म. सा. पत्रिके'त २८ परिच्छेद, ' छन्दोरचने 'त ३५ परिच्छेद.

( १ ) शब्द, बोली, भाषा, लिपी यांचे स्वरूप, संबंध. ( २ ) काव्योपयोगी व गद्योपयोगी—शब्दांचे भेद. शब्दसंग्रहाचे संवर्धन. संस्कृत शब्दभांडार आणताना मराठी दौलतीची उपेक्षा होऊ नये. ( ३ ) काव्य म्हणजे काय ? काव्याचे प्रयोजन. पद्य आणि गद्य हे अंतर राहाणारच. ( ४ ) ' काव्याची भाषा म्हणजे सहजस्फूर्तीने उसळलेली भावनानुसारी भाषा होय. ' काव्यातील कृत्रिमता. ( ५ ) फार्सी, अरूढ शब्दयोजनेबाबत. बहुजनसमाजाशी मिसळलेले अथवा त्यातून लेखक पुढे यावयाला पाहिजेत. शब्दाभोवती सूचक वलय असते. [ या विवेचनातील काही भाग ' मराठी-वरील भयङ्कर संकट ', " भाषा शुद्धि-विवेक " मध्ये आला आहे. ] ( ६ ) अपभ्रष्ट वा परिणत शब्दांविषयी. शब्दसंपत्ती वाढविण्याचा विचार. त्याचे प्रयोजन. उपाय. शब्दचित्रांची कल्पना. ( ७ ) समारोप. शैली. कवितेच्या व्यसनासंबंधी.

● **१०८. मराठीवरील भयङ्कर सङ्कट :** ' विविधज्ञानविस्तार ', ऑक्टोबर १९२५/ याचा काही भाग संस्करण करून " छन्दोरचना " ( आ. २ ) मध्ये.

( १ ) १९२५ मधील ' केसरी 'तील सावरकरांच्या लेखमालेतील प्रतिपादन, त्यातून त्यांची दिसणारी भूमिका, त्यातील धार्मिक अंश. तो पटवर्धनांना अमान्य. ( हिंदु-मुस्लीमसंबंध, हिंदूंचे ऐक्य, बहिष्काराचा अर्थ यांची चर्चा ). संताप व नैराश्य यांतून हा बहिष्कार. – सावरकरांच्या दृष्टिकोणाची भाषिकदृष्ट्या मर्यादा. ( २ ) सावरकरांच्या प्रेरणेचा शोध. हिंदीतील स्थिती. ( ३ ) फार्सी शब्द मराठीत आले कुठून याचा इतिहास. सावरकरांच्या याबाबतच्या प्रतिपादनात अज्ञान. – ' राज्यव्यवहारकोशा'ची तपासणी. (४) आज मराठीत प्रचलित असणारे फार्सी शब्द. त्यांचे आजचे स्वरूप. त्यासंबंधी विचार. पंक्तिपावन झालेल्या मूळ फार्सी शब्दांसंबंधी मोकळिकीचे धोरण असावे. ( ५ ) फार्सी शब्दांविना मराठी नेभळट होईल या म्हणण्याचे जोरदार निराकरण [ 'भाऊसाहेबांच्या बखरी'तील उताऱ्याचे विश्लेषण ]. ( ६ ) आपल्याला जाणवलेल्या गुप्त संकटाची सूचना. इंग्रजी शब्दांच्या आक्रमणाचे भयंकर संकट. त्याची कारणे. फार्सी शब्द व इंग्रजी शब्द यांबाबतच्या स्वतःच्या धोरणाचे पटवर्धनांचे स्पष्टीकरण.

**१०९. बोलीतील शब्दांची छाननी :** विविधज्ञानविस्तार, जुलै–ऑगस्ट १९३० / ५॥ पृष्ठे.

विदर्भ साहित्यसंघ परिषदेच्या ६ व्या अधिवेशनातील ठरावाला अनुलक्षून लेख.

( १ ) स्वतःची भूमिका. बोलीतील शब्द वापरण्याच्या प्रयत्नांचे अभिनंदन.

ठरावाशी सहमत. ( २ ) वि. भि. कोलते यांनी सुचविलेल्या अदमासे १५० शब्दांची चिकित्सा. त्यावरून आठवणारे अन्य शब्द, पर्याय. शब्दसंग्रहासंबंधी चर्चा.

**११०. रघुनाथपण्डिताची भाषाशुद्धि व पाठसंशोधन :** लोकशिक्षण, फेब्रुवारी १९३२ (व. ५ अं. २)/ पृ. ७५–८२.

राजाराम कॉलेज, कोल्हापूर, येथील वाङ्मय-विहार-मंडळापुढे ता. १८ डिसेंबर १९३१ रोजी केलेल्या चर्चेचा निष्कर्ष.

( १ ) दमयंती–स्वयंवराख्यानाचा 'मराठी काव्यकोशातील एक अमूल्य रत्न' म्हणून निभ्रांत गौरव प्रक्षिप्ताप्रक्षिप्तनिर्णयाचा मार्ग. कसोशीच्या लेखकांनाही अचूक यांत्रिक एकरूपता असते असे नाही. एकच रसापकर्षक ओळ.–ग्रामीण शब्द. शुद्ध भाषा हा रघुनाथपंडिताचा पहिला दिसणारा विशेष. काही शब्द अशुद्ध वाटतात; कमी परिचयाचे. पण ते पूर्ण शुद्ध. ( २ ) काव्यात अशुद्धे किती व कोठे आढळतात याचे संशोधन, चिकित्सा. अशा सहा स्थळांचा विचार. ( ३ ) रघुनाथपंडिताची भाषा, शब्दयोजना. ( ४ ) प्रक्षिप्ताप्रक्षिप्तविचार. ( ५ ) पाठसंशोधन म्हणजे काय ? आठ पाठांची चिकित्सा.

**रघुनाथपण्डिताची भाषाशुद्धि आणि पाठसंशोधन :** ( पुरवणी–परिच्छेद ) लोकशिक्षण, मे १९३२ / पृ. २६५.

'पंचू' ऐवजी 'पंची' शब्द हवा.

**—रघुनाथपण्डिताची भाषाशुद्धि आणि पाठसंशोधन :** (स्पष्टीकरणाचा परिच्छेद) लोकशिक्षण, जुलै १९३२ / पृ. ३७१.

'पंचू' की 'पंची' ?

● **१११. मराठी भाषेतील शुद्धीकरण :** पुरुषार्थ, मार्च १९३५/पृ. ४५०–४५४. औंध येथे दिलेले व्याख्यान.

न. चिं. केळकरांनी परभाषेतील शब्द स्वीकारण्याबाबत केलेल्या भाषणाला उत्तर. परभाषेतील शब्दांच्या स्वीकरणाला विरोध. –भाषेचे कार्य, महती. ( पटवर्धनांची भाषाशुद्धीमागील व्यापक राष्ट्रीय वृत्ती. ) परदेशातील लोकांची दक्षता. – हिंदवी स्वराज्यातील स्थिती. –इंग्रजी राजवटीतील स्थिती. विद्वानांची अनास्था. इंग्रजी व मुसलमानी राजवटीसंबंधाने कोणते धोरण ठेवावे याचा विचार. इतर प्रांतांचे दाखले. राजभाषा व राष्ट्रभाषा यांतील अंतर. –मराठी लोकांचे याबाबतीत वर्तन. आमची अनास्था, दासवृत्ती. आमच्या शब्दांचे प्रेम, अभिमान हवा. आमची वृत्ती उदासीन, आळशी. ती मुख्यतः पालटली पाहिजे.

● * ११२. **मराठी शब्दांचा पुरस्कार** (माझी भूमिका) : महाराष्ट्र शारदा, नोव्हेंबर १९३५ (व. १ अं. ११) / पृ. ३६–३७.

उत्तररूप लेख.

'महाराष्ट्र शारदा'च्या संपादकांच्या प्रतिपादनाचा परामर्श. स्वतःवर होणाऱ्या विसंगतीच्या आरोपाला उत्तर. स्वतःची मूळ प्रेरणा. स्वतःच्या भूमिकेचा उच्चार. मराठीत परकी शब्द का शिरले याची मीमांसा.–'महाराष्ट्र शारदा'च्या संपादकीय स्फुटातील शब्दांची छाननी. स्वकीय शब्दांच्या पुरस्कर्त्यांची दृष्टी. इंग्रजीतील शब्दांची स्थिती. स्वतःच्या प्रतिपादनाचा पुन्हा आग्रहाने उच्चार. स्वतःचे कार्य इतरांची भुरळ दूर करणे हे.

११३. **स्वकीय शब्दांचा पुरस्कार श्रेयस्कर नाही का ?** : भारतमाता (उरूण इस्लामपूर), ६ नोव्हेंबर १९३५ / सुमारे ४ स्तंभ.

नवीन विचार नाही.

● ११४. **सावरकरी भाषाशुद्धीची चिकित्सा** : प्रतिभा, १५ जानेवारी १९३६ (सावरकर अंक).

(१) सावरकरांच्या भाषाशुद्धीवरील लेखांचे योग्य स्वागत झाले नाही. कोल्हापूरला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील (१९३२) प्रसंगाने आपले इकडे विशेष लक्ष वेधले. (२) सावरकर आणि आपण यांच्या भाषाशुद्धीच्या भूमिकेतील अंतर. आपल्या दृष्टिकोणाचे विशदीकरण. मराठीची दुहेरी हानी होण्याचे कारण.–आमच्या स्वत्वपराङ्मुख नि परधार्जिण्या वृत्तीवर आवेशाने टीका. परकी शब्दांच्या परकी-पणाबाबत युक्तिवाद. (या निमित्ताने आपल्या लोकांची प्रचलित वृत्ती, राजकीय स्थिती यांवरही टीका). इंग्रजी भाषेचा विचार. मराठीची सर्गशक्ती वाढविणे आणि जुन्या शब्दांचे संरक्षण मुख्य. (३) 'शब्दांचे जिवन्तपण त्यांच्या पौनःपुन्यावर अवलम्बून असते.' केवळ विदेशी शब्दाला मराठी प्रतिशब्द सापडतो एवढे पुरे नाही. सावरकरांच्याच लेखनातील विदेशी शब्द. (४) नवीन वस्तू, प्राणी, पदार्थ यांना तद्देशीय शब्द चालतील या सावरकरांच्या मताला विरोध. (मराठीचा ज्वलंत अभिमान). (५) पद्याच्या भाषेबाबत विवेचन. स्वतःचे पूर्वीचे धोरण. (६) भाषिक ऐक्याच्या दृष्टीने विचार. बोलीतील शब्दही घ्यावेत. त्याला मर्यादा. शेवटी आपली वैयक्तिक आकांक्षा.

* ●. ११५. **भाषाशुद्धीचे रहस्य** : सह्याद्रि, एप्रिल १९३६.

श्री. के. क्षीरसागर यांच्या 'सह्याद्री' च्या फेब्रुवारी १९३६ व मार्च १९३६ च्या अंकांतील [पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क. ३·१३६] लेखाला उत्तर.

( १ ) क्षीरसागरांच्या लेखाचे स्वागत. 'वैयक्तिक समर्थनासाठी सार्वजनिक जागा अडवीत नाही.' ( २ ) विद्रूप शब्दनिर्मितीच्या रोगाच्या भीषणतेसंबंधी सहमत. क्षीरसागरांच्या प्रतिपादनाचा विमर्श. तीन प्रश्नांची चिकित्सा. त्यांच्या लेखनातील शब्दयोजनेची छाननी. प्र. के. अत्रे यांचे उदाहरण. ( ३ ) भाषाशुद्धिवाद्याची तात्त्विक भूमिका, आणि त्याने सुचविलेले शब्द यांची भेसळ नको. ( ४ ) भाषाशुद्धिवाद्याचे कर्तव्य, त्याचे उत्तरदायित्व. चिकाटी. टीकाकारांना उत्तर. ( ५ ) क्षीरसागरांच्या आणखी एका आक्षेपाला उत्तर. बहिष्काराचा अर्थ परभाषांचा तिरस्कार नव्हे. इंग्रजी, फ्रेंच, अँग्लो सॅक्सन भाषांचा विचार. भाषाशुद्धीची आवश्यकता विशिष्ट परिस्थितिजन्य. तशी परिस्थिती महाराष्ट्रात. ( ६ ) जुन्या शब्दांच्या पुनरुज्जीवनाविषयी ऐकमत्य. लेखकवर्गाच्या विरोधाचे कारण. कोणत्या शब्दांची सहज उपस्थिती होते याचा क्षीरसागरांच्या शब्दयोजनेच्या आधाराने विचार. ( ७ ) क्षीरसागरांचा आरोप अमान्य. न. चिं. केळकरांच्या उताऱ्याची छाननी. समारोपात आपल्या भूमिकेचा आग्रहाने उच्चार, आदेश.

● **११६. स्वभाषेतील शब्दांकडे पाहण्याची विशिष्ट दृष्टि :** सहविचार, एप्रिल १९३६ / लोकशिक्षण, एप्रिल १९३६. मराठी साक्षर संमेलन, बडोदे, मध्ये ९ मार्च १९३६ ला दिलेले व्याख्यान.

( १ ) भाषेच्या प्रश्नाचा सर्व भाषिकांनी विचार करावा. मराठी भाषेचा विचार तिची विशिष्ट परिस्थिती ध्यानात धरून केला पाहिजे. मराठीचा पद्धतशीर अभ्यास नाही, आस्था नाही. आमची विपर्यस्त, विलक्षण परधार्जिणी मनोवृत्ती. ( २ ) परकीय शब्द अडवणूक करतात; आवर्जून कडेस सारल्याविना स्वकीय शब्दांची उपस्थिती होत नाही. स्वकीय शब्दांची व्याप्ती आम्ही संकुचित करतो.–आमच्या व मुसलमानांच्या वृत्तींतील अंतर. आमची बौद्धिक विकृती. अनेक परकी शब्दांचा अनावश्यक डोईजडपणा.–नवीन शब्द बनविण्याच्या रीतीतील दोष. आमच्या अस्वाभाविक वृत्तीमुळे आमचे जातिवंत जुने शब्द मागे पडतात; तशीच भाषेची सर्गशक्ती क्षीण होते.–परकी शब्दांवरील बहिष्काराचा उद्देश. त्यामागील भूमिका. जर्मनांचें उदाहरण.–अशी चळवळ करण्याची आवश्यकता. स्वावलंबी, स्वाभिमानी, स्वकीयप्रेमी तत्त्वनिष्ठेचा आग्रह.

● **११७. भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका :** वसंत व्याख्यानमाला, पुणे, मध्ये २७ एप्रिल १९३६ ला दिलेले व्याख्यान.

( १ ) स्वतःवरील विसंगतीच्या आरोपाचे थोडे वैयक्तिक स्पष्टीकरण. काव्य नि पद्याची भाषा. स्वतःचे शब्दयोजनेचे धोरण. स्वतःच्या मतनिश्चितीचा इतिहास. सावरकरांशी मतभेद. शब्दांचे पुनरुज्जीवन, आणि त्यांची सृजनक्षमता ही दोन

तत्त्वे. ( २ ) मराठी लोकांची मनोवृत्ती. राष्ट्रीय औदासिन्य, संकुचितपणा, दांभिकपणा. परधार्जिणेपणा. ( ३ ) इतर प्रांतांतील स्थिती. बंगाल, गुजरात. उर्दू, सिंधी. मुस्लिमांचा दुराग्रह. मराठी ही धर्मभाषा नाही. समारोपात्मक सूचना.

● ११८. **भाषाशुद्धीचे माहात्म्य :** महाराष्ट्र साहित्य संमेलन, जळगाव, मधील अध्यक्षीय भाषण १२ नोव्हेंबर १९३६. अनेक अंगांचा सूक्ष्म विचार करणारा विस्तृत, महत्त्वाचा लेख. स्वतःच्या भाषाशुद्धीच्या चळवळीचे वेगळेपण, आणि ती आपण प्रथमच सुरू केल्याचा सूर. हिंदु समाज, धर्म, राष्ट्रैक्य यांचाही विचार. महाराष्ट्रीय विद्यापीठाच्या कल्पनेचा उच्चार.

( १ ) प्रास्ताविक. आभार. ( २ ) धर्मप्रेम, भाषाप्रेम, राष्ट्रप्रेम. मराठीची महती. राष्ट्रैक्यातील भाषेचे कार्य. धर्माचे स्थान—त्याची व्याख्या. व्यक्तिधर्म व समाजधर्म. आमची फुटीर वृत्ती. मराठीची उपेक्षा. धर्म-भाषा-देश यांच्या निष्ठांचा अन्वय. राष्ट्रीय धर्म नि स्वत्वाभिमान. भाषेचे सांस्कृतिक ऐक्यात कार्य. डोळस भाषाभिमानाचे विवेचन. मराठी धर्मभाषा नव्हे. ( ३ ) आधुनिक मराठी वाङ्मयावर ओझरता अभिप्राय. ( ४ ) मराठी भाषेचा पूर्वेतिहास; तिचे आजचे स्वरूप. ( ५ ) आपल्या मनोवृत्तीतील दोष– १. मोठेपणाची धुंदी. निष्क्रियता २. संकुचित दृष्टी. ( मराठी भाषिकांच्या ऐक्याचा पुरस्कार ). फटकून वागण्याची वृत्ती. सोशिकता; शौर्य यांची विपरीतता. आम्ही काळ-वादी आहो. ( ६ ) विष्णुशास्त्री चिपळूणकरांची भाषाविषयक दृष्टी, तिच्यावर टीका. भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका. ( ७ ) या चळवळीचे विरोधक. श्री. के. क्षीरसागर. न. चिं. केळकरांच्या लेखनाची परीक्षा. कृ. पां. कुलकर्णी यांच्या प्रतिपादनाला उत्तर. ( ८ ) या चळवळीची आवश्यकता. पूर्वीचे प्रयत्न ! — भाषासौष्ठव नि भाषाशुद्धी. ( ९ ) स्वत्वसंरक्षणवाद्यांच्या भूमिकेचा पुनरुच्चार. विनंती.

* ११९. **श्री. मामा वरेरकर यांचे आक्षेपार्ह विधान :** ( चर्चा-खुलासा ) साप्ता० 'ज्ञानप्रकाश', रविवार, १३ डिसेंबर १९३६.

ठाणे येथील साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणाच्या अखेरीला वरेरकरांनी भाषाशुद्धीचा परामर्श घेतला. त्यात 'मराठी भाषा ही नुसत्या हिंदूंची मिरासदारी आहे अशी कल्पना आत्मघातकीपणाची' असे विधान. त्याला उत्तर. या समजुतीच्या विरोधी स्वतःच्या जळगाव, महाराष्ट्र साहित्य संमेलनातील अध्यक्षीयातील उतारे.

● १२०. **भाषाशुद्धीची घोषणा :** मराठी वाङ्मय मंडळ, सेंट झेविअर कॉलेज, मुंबई, अध्यक्षीय भाषण. / १९ सप्टेंबर १९३७. [ 'मराठीची पिच्छेहाट', 'महाराष्ट्र-शारदा', ऑक्टोबर १९३७ ( व. ३ अं. ३४ ) / पृ. ३५–३७.

सर्वसाधारण, ऐनवेळचे भाषण. 'रसव्यवस्थेचे 'वैयर्थ्य' हा संकल्पित विषय

ऐनवेळी बदलून भाषाशुद्धीवर बोलणे. ग्रंथांचाच नव्हे, तर अशिक्षितांच्या बोलीचाही अभ्यास व्हावयाला हवा हा महत्त्वाचा विचार.

( १ ) सार्वजनिक व्यवहारातील मराठीच्या उपेक्षेचे दृश्य. मराठीविषयी आपण असावध. बेल्जियमचे उदाहरण. तेथील भाषिकांची जागरूकता. ( २ ) परकी गोष्टींना हुरळून जाऊ नका. मराठी भाषेचे सामर्थ्य ओळखा. इंग्रजी न जाणणाऱ्या बहुसंख्य मराठी लोकांसाठी लिहिले पाहिजे. ( ३ ) ग्रंथांप्रमाणेच अशिक्षित, स्त्रिया यांच्या बोलीचा अभ्यास केला पाहिजे. —शब्दसिद्धीच्या प्रकरणीही अनास्था. मराठी शब्दसिद्धीप्रमाणे शब्द बनवा. —'स्वावलम्बनाने आपला पराक्रम वाढावा म्हणून एक प्रकारची कृत्रिम अडचण उत्पन्न करण्यासाठी' बहिष्काराची घोषणा. सौंदर्यलालसेपेक्षा स्वावलंबन महत्त्वाचे.

* ● १२१ **आमचा साहित्यसंसार** : लोकशिक्षण, ऑक्टोबर १९३७/ पृ. २६३–२७५.

'विहंगम' मासिकातील ( व. ४ अं. २, डिसेंबर १९३६ ) श्री. ना. बनहट्टी यांच्या प्रस्तुत मथळ्याच्या लेखाला उत्तर. महत्त्वाचा लेख; पण आता नवीन मुद्दे, प्रतिपादन नाही. प्रचारकाच्या उत्साहाने तेच तेच प्रतिपादन; चळवळीवरील आक्षेपांचे खंडन.

( १ ) बनहट्टींच्या लेखाचे गौरवाने स्वागत. भाषाशुद्धीसंबंधी पटवर्धनांची भूमिका—स्वाभिमानी स्वभाषासमुन्नतीची दृष्टी. ( २ ) मराठी भाषेची तीन अंगांनी हानी : ग्रांथिक शब्द मेले, बोलीतील घेतले नाहीत, अशिक्षितांच्या बोलीतील शब्द स्वीकारणे अशिष्ट वाटते. नवीन शब्द योग्य त्या प्रमाणात तयार केले जात नाहीत. ( ३ ) भाषाशुद्धीच्या चळवळीचा हेतू, स्वरूप—सामाजिक जागृती, सार्वत्रिक स्वावलंबन. ( ४ ) इंग्रजी शब्द व फार्सी शब्द यांसंबंधीच्या बनहट्टींच्या धोरणात विसंगती. ( ५ ) काही शब्दांची चिकित्सा. परकी शब्द स्वकीय शब्दांना कसे मारतात याबाबत बनहट्टींच्या विधानाचे उदाहरणांनी खंडन. कोणत्या शब्दांची प्रथम ( अधिक ) उपस्थिती होते ? का ? पक्षपात होतो. ( ६ ) केळकर–चिपळूणकर-टिळक यांच्यासंबंधी. ( ७ ) महाराष्ट्रात राहून मराठीसंबधी आपुलकी न वाटणाऱ्या लोकांचा विचार, त्यांची आम्ही का चिंता करावी ? ( ८ ) स्वतःच्या या प्रचारकार्याविषयी थोडे व्यक्तिगत. हा उत्साहव्यय अनाठायी नाही; कर्तव्यच आहे.

* १२२. **गो. कृ. मोडक व मराठीचे शुद्धीकरण** : ज्ञानप्रकाश, ७ जानेवारी १९३८/ ५॥ स्तंभ.

१४ नोव्हेंबर १९३७ च्या 'ज्ञानप्रकाशा'त 'रा. तात्याराव सावरकर व मराठीचे शुद्धीकरण' हा मोडकांचा लेख. त्याची चिकित्सा.

( १ ) ' परकी शब्द परकियांविषयी तिरस्कार जागृत ठेवीत असल्याने ते ठेवावेत.' या मोडकांच्या विचाराला व्यापक राष्ट्रीय दृष्टीतून उत्तर. मोडकांनी उदाहरणादाखल घेतलेल्या शब्दांची छाननी. ( २ ) परकी शब्द कोठपर्यंत स्वभाषेत ठेवावेत याचा विचार. विविध अर्थच्छटा. अशा शब्दांची छाननी ( ३ ) ' रक्षणीय परकी शब्दावर संस्कार करावेत ' या विधानातील फोलपणा. ( ४ ) सावरकरांच्या भाषाशुद्धीच्या चळवळीतील व्यवहार्यता–अव्यवहार्यता यांचा विचार. ( ५ ) शब्दांचे इष्टार्थद्योतकत्व; वस्तूबरोबर वस्तुनामस्वीकार वगैरे प्रश्नांची चर्चा.

● **१२३. भाषाशुद्धीकरणाचे तारतम्य** : सह्याद्रि, एप्रिल १९३८ /पृ. २८२–२८८. याच मथळ्याच्या न. चिं. केळकरांच्या ' सह्याद्री 'तील ( जानेवारी १९३८ ). लेखाच्या [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क्र. क. ३·१३९ ] अनुषंगाने.

( १ ) केळकरांच्या परिवर्तनाबद्दल आनंदप्रकटन. तपशिलाचा विचार. केळकरांचे प्रतिपादन. त्यांच्या प्रश्नांना उत्तरे. भाषासमृद्धीची व्यापक दृष्टी हवी. भाषाशुद्धीच्या आग्रहाची आवश्यकता. स्वतःच्या भूमिकेतील वेगळेपणा. ( २ ) केळकरांच्या लेखाची परीक्षा. त्यात २५ फार्सी शब्द. हे चिंतनीय. असे का ? याची मीमांसा. केळकरांनी सांगितलेले भाषादूषकांचे आठ प्रकार. केळकरांच्या म्हणण्याच्या अनुरोधाने परीक्षण. नवीन नवीन शब्द शोधीत राहण्याने भाषेची शक्ती जिवंत राहते. ( ३ ) या विवेचनाचे पाच निष्कर्ष : १. मराठी भाषेचा नि वाङ्मयाचा खोल अभ्यास केला पाहिजे. २. शास्त्रीय परिभाषेतील उपयुक्त शब्दांचा परिचय करून दिला पाहिजे. ३. बहिष्काराचा हेतू स्वकीय शब्दांचा शोध नि पुरस्कार. ४. नडी स्वावलंबनाने भागवाव्यात. ५. आमच्या मनोवृत्तीतच क्रांती व्हावयाला हवी आहे. ( ४ ) थोडे स्वतःसंबंधी. भाषाशुद्धीचा आग्रह आणि विलायती वेष यांत विसंगती· मानण्याचे कारण नाही.

● **१२४. प्रस्तावना** : " भाषाशुद्धि-विवेक ", १ एप्रिल १९३८ / ८ पृष्ठे.

या संग्रहामागील भूमिका, रचनेचा इतिहास. त्यानिमित्ताने भाषाशुद्धीच्या चळवळीचे धावते निरीक्षण. स्वतःच्या विचारांना चालना देणारा कोल्हापूरच्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील प्रसंग. स्वतःचा दृष्टिकोण. स्वतःच्या प्रचारकार्याचा थोडक्यात वृत्तांत. या कार्यातील विरोधक. जळगावच्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील भाषाशुद्धीच्या ठरावाची माहिती. न. चिं. केळकरांचे मतपरिवर्तन.–या कार्यातून आपण निवृत्त होत असून स्वतःपुरते या कार्यातील भावी धोरण काय राहील याची घोषणा. विरोधकांचे आभार.—' बहिष्कार्य शब्दांच्या कोशा ' संबंधी स्पष्टीकरण. त्याचे औचित्य.

★ **१२५. शब्दशुद्धि की भाषाशुद्धि ?** : सह्याद्रि, सप्टेंबर १९३८ / पृ. ७३१·७३५. ना. वि. चौकर यांच्या ' सह्याद्रि 'तील ( डिसेंबर १९३८ ) लेखाला उत्तर.

" भाषाशुद्धि-विवेक "च्या प्रकाशनानंतरचा लेख. प्रत्युत्तरात्मक लेख. त्यामुळे नव्या विचारापेक्षा युक्तिवाद, प्रतिपक्ष्याच्या आरोपांचे खंडन, स्वतःच्या भूमिकेचा ठसठशीत उच्चार असे स्वरूप.

भाषेचे माहात्म्य.—इंग्रजीच्या आक्रमणाने मराठी भाषा भ्रष्ट झाली. मराठी बोलणाऱ्यांची विलक्षण परधार्जिणी मनोवृत्तीच पार पालटून टाकली पाहिजे. मराठी शब्द नि मराठी वाक्प्रचार यांच्याविषयी विशेष आपुलीक वाटायला लावणे, आणि नवशब्दप्रसवशक्ती वाढवणे हे उद्दिष्ट.—भाषाशुद्धीची चळवळ ही नुसती शब्दांच्या भाषांतराची चळवळ आहे, आणि भाषाशुद्धिवादी हे भाषांतऱ्ये आहेत ही चौकरांची मुख्य टीका. त्याचे जोरदार खंडन.

**१२६. राष्ट्रभाषेचा प्रश्न :** संजीवनी, मार्च-एप्रिल १९३९ (व. ६ अं. ३–४) पृ. २१--२५. [ म. नि. ]

## ९. लेखन शुद्धी

**१२७ मराठी लिपी :** फर्गसन कॉलेज-मॅगेझिन, डिसेंबर १९२१ (व १२, अं. ३) ४ पृष्ठे.

बडोदे येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात [ १९२१ ] वाचलेला निबंध. सोबत पटवर्धनांनी सुचविलेला ' मराठी लिपीचा तक्ता. '

( १ ) प्रास्ताविक. लिपिसुधारणेच्या पूर्वप्रयत्नांचा उल्लेख. लिपिसुधारणेची आवश्यकता, व मार्ग. मराठी भाषेसाठी स्वतंत्र लिपीची कल्पना. मुद्रणकलेचा प्रसार हे लिपिसुधारणेचे कारण. ( २ ) देवनागरी लिपीतील गुण. दोष. नवीन लिपी कशी असावी याविषयी अभिप्राय. ( ३ ) स्वरविचार.–व्यंजनविचार.–वरची आडवी ओळ नसावी. (४) समारोप. मुद्रणयंत्राचा फायदा घेता यावा, हस्तमुद्रणयंत्रही करता यावे.

**१२८. अरबी, फार्सी व तुर्की शब्दांची परिणती :** विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९२२ / ७ पृष्ठे.

पुणे येथे भरलेल्या पहिल्या प्राच्यविद्यापरिषदेपुढे वाचलेल्या निबंधाचे सुधारून केलेले भाषांतर. यातील बराचसा भाग " फार्शी मराठी कोशा " त पृ. ८ ते ११ ( उपोद्घात–' परिणतीचा विचार ' ) वर आला आहे.

( १ ) प्रत्येक मराठी शब्दाचे संस्कृतशी नाते जोडण्याचा मूर्खपणा–त्यातील फोलपणा. अरबी, फार्सी, तुर्की शब्द मराठीत प्रवेशताना मराठी मोल्यानुसार होणाऱ्या बदलांचे स्वरूप शोधण्याचा प्रयत्न. ( २ ) यापुढे ३३ नियम, उपनियम, पोटनियम. त्यासाठी भरपूर उदाहरणे. स्वरपरिणती, व्यञ्जने, इतर भाषाशास्त्रीय नियम–या दृष्टीने विचार.

**१२९. स्वर–व्यञ्जन व्यवस्था** : महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ( विविधज्ञानविस्तारान्तर्गत ), डिसेंबर १९२४ / ६ पृष्ठे.

( १ ) वे. शा. सं. पांडुरंग जनार्दन पाध्ये यांचे "स्वर-व्यञ्जन व्यवस्था" नावाचे पुस्तक. त्यात 'लेखोच्चाराच्या सङ्गतीसम्बन्धी स्वतन्त्र विचार' आहे. तो पटवर्धनांच्या प्रतिपादनाला पोषक. ( २ ) पाध्ये यांनी संस्कृतपुरती अ, आ, अि...ची बाराखडी प्रसारिली. शब्द दृग्गोचर करण्याचे काम लिपीचे. त्यात सावळागोंधळ नको. इंग्रजांनी त्यांच्या भाषेत केल्या नसल्या म्हणून आमच्या भाषेत आम्ही पटतील त्या सुधारणा करू नयेत असे थोडेच आहे ?–' शुद्धलेखन म्हणजे वैयक्तिक उच्चारानुगामी लेखन नव्हे, तर शिष्टसम्मत, रूढोच्चारानुगामी लेखन होय.' (या अनुषंगाने सामाजिक रूढींसंबंधीही विचारप्रकटन ). ( ३ ) पाध्ये यांच्या प्रतिपादनाचे दिग्दर्शन. स्वरचिकित्सा. अनुस्वार. विसर्ग. व्यंजने. ( ४ ) समारोप. लिपी जशी बाळबोध तशी शिक्षा ( शिक्षण ) ही बाळबोध हवी.

**१३०. उपोद्घात** : "फार्शी–मराठी–कोश" ( १२ जून १९२५ ) / प्रका० १३ डिसेंबर १९२५ / ३० पृष्ठे.

( १ ) प्रास्ताविक निवेदन, स्पष्टीकरण. शुद्धलेखनविषयक विचार. शब्दलेखन. इतर काही प्रश्न. फार्शी शब्दांचे प्रमाण. व्युत्पत्तिविचार. परिणतीचा विचार. ( २ ) फार्शीतून मराठीत आलेले व्याकरणविशेष. एकूण ३२ कलमे. शब्दसिद्धि. ११नियम. समारोपाचा वैयक्तिक भावनाविष्करणपर परिच्छेद.

**१३१. शुद्धलेखनविचार–शीर्षबिन्दु** : विविधज्ञानविस्तार, मार्च-एप्रिल १९२८ / ४ पृष्ठे.

न. चिं. केळकरांनी "टिळक चरित्रा"त अनुच्चारित अनुस्वार गाळले त्यानिमित्ताने लेख.

( १ ) मृत जडतेपेक्षा चळवळ–त्यातही युक्तिवादमय चळवळ–श्रेयस्करच. शुद्धलेखन चळवळीचे उद्दिष्ट विद्यार्थ्यांच्या मानसिक शक्तींचा अपव्यय वाचवणे. ( २ ) उच्चारानुसारी लेखन म्हणजे काय याचे स्पष्टीकरण. ( ३ ) शीर्षबिंदूची तात्त्विक चर्चा.

* **१३२. रा. बा. अ. भिडे व लेखनसुधारणा** : विविधज्ञानविस्तार, नोव्हेंबर १९२८ / ८ पृष्ठे.

बा. अ. भिडे यांनी "सुधारक" परीक्षणातील दुसऱ्या लेखांकात ( विविधज्ञानविस्तार, जुलै १९२८ ) पटवर्धनांच्या 'शुद्धलेखनविचार–शीर्षबिन्दु' या लेखाच्या आधाराने त्यांच्या मतांची चर्चा केली. त्या चर्चेला हे उत्तर.

( १ ) स्वतःची भूमिका. ( २ ) पद्याच्या भाषेतील सवलती. ( ३ ) 'ऋ'कार चर्चा. लघु-गुरु. ( ४ ) उच्चारानुगामी लेखनाच्या मर्यादा, स्वरूप. 'सामान्य शिष्ट-सम्मत उच्चारानुसार लेखन असावे.' 'उच्चार आणि लेखन यांच्यांतील विसङ्गती होईल तितकी कमी करणे हे विद्वज्जनांचे कर्तव्य आहे.' ( ५ ) शीर्षबिन्दूबाबत. 'उच्चारान्तर सूक्ष्म असल्यास पूर्वपरंपरेला सोडून लेखन करणे इष्ट नाही.' ( ६ ) दर्बार, सर्कार इ०. ( ७ ) शब्दान्तर्गत अकार. ( ८ ) समारोप. भिडे यांच्याविषयी आदर, कृतज्ञता.

१३३. **शीर्षबिन्दु का परसवर्ण ? :** रा. बनहट्टी यांस उत्तर. लोकशिक्षण, ऑगस्ट १९२९ ( व. २ अं. ८ ) / ११ पृष्ठे.

'मराठी भाषेची लेखनपद्धति' या ना. दा. बनहट्टी यांच्या 'लोकशिक्षणा'तील लेखमालेतील तिसऱ्या लेखाला उत्तर. लेखनशुद्धिविषयक पटवर्धनांची भूमिका समजण्यास उपयुक्त.

( १ ) भाषेचे नियमन करणारी संघटना अस्तित्वात नसल्याने तिच्यापुढे आधी भाषेतील सुधारणा ठेवून मान्यता घेणे शक्य नाही. तरीही अप्रत्यक्षपणे आपोआप भाषेचे नियमन होत असतेच. ( १ ) अपरिहार्य, अत्यावश्यक असे प्रत्ययातील अनुस्वार ठेवावेत. उच्चारित अनुस्वारासाठी परसवर्ण हवा. ( ३ ) पृथक् उच्चारास पृथक् चिन्ह हवे. लेखनसौकर्य हवे, पण त्याने उच्चाराचा घोटाळा होऊ नये. चिन्हांचा व उच्चारांचा संकेतसंबंध नियमांनी बद्ध असावा. ( ४ ) सानुनासिक व सानुस्वार उच्चार यांतील अंतराचे विवेचन. युक्तिवादास पटेल ते आचरणे सुधारकाचे कर्तव्य.

१३४. **'य'कारयुक्त व 'ह' कारयुक्त संयुक्त व्यञ्जने :** विविधज्ञानविस्तार, फेब्रुवारी १९३१ / ५ पृष्ठे.

बेळगावला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात ( १९२९ ) नेमल्या गेलेल्या शुद्धलेखनसमितीच्या सूचनांना मडगावला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाने ( १९३० ) संमती दिली, या अनुषंगाने लेख.

( १ ) शुद्धलेखन समितीच्या निर्णयांची चिकित्सा. 'भिन्न भिन्न उच्चार व्यक्त करावयाला लिपीत भिन्न भिन्न चिन्हे असताना एकाच चिन्हाकरवी एकाहून अधिक कार्ये करवून घेणे चुकीचे आहे, पुढील पिढ्यांसाठी घोटाळा माजवून ठेवणारे आहे.' शीर्षबिंदु, व्यंजने वगैरेंची चिकित्सा. ( २ ) 'य'कारयुक्त व 'ह'कारयुक्त संयुक्त व्यंजनांचा प्रश्न. मराठीला आता स्वतःची लिपी हवी. देवनागरी लिपी अपुरी ठरल्यास नवीन चिन्हे निर्माण केली पाहिजेत. ( ३ ) 'र्'युक्त संयुक्त व्यंजने.

१३५. **मराठी भाषेची लेखनपद्धति :** प्रतिभा, सोमवार, १७ फेब्रुवारी १९३३ / १॥ पृष्ठ.

ना. दा. बनहट्टी यांच्या या पुस्तकाचे ( १९३२ ) छोटे पण स्पष्ट परीक्षण. ( १ ) पुस्तकाचा परिचय, त्याची उपयुक्तता. ( २ ) बनहट्टींची वृत्ती शुद्धलेखनातील सुधारणापक्षविरोधी, परंपराप्रिय. तिचाही खऱ्या सुधारकाने विचार केला पाहिजे. (३) बनहट्टींच्या प्रतिपादनाचा परामर्श. त्यांनी माजविलेले व्युत्पत्तीचे स्तोम अनाठायी. आधी भाषा, मग व्याकरण. उच्चारान्तर, शीर्षबिंदू यासंबंधी मते. बनहट्टींच्या चुकीच्या विधानांवर सूत्ररूप टीका. ( ४ ) व्यक्तिविषयक कुत्सित उद्गारांचा निषेध.

**१३६. 'अ' च्या बाराखडीची मीमांसा :** विविधज्ञानविस्तार, एप्रिल–मे १९३६ / पृ. १५७-१६१.

विविधज्ञानविस्तार, जानेवारी १९३६ च्या अंकात वैद्य चैतन्य देसाईंचा '"अ"ची बाराखडी शास्त्रशुद्ध आहे काय ?' लेख. त्या अनुषंगाने.

( १ ) प्रस्तावना. सुधारणा संयमाने, मनमिळवणुकीने झाली पाहिजे. ( २ ) बाराखडी म्हणजे काय ? तिची तपासणी. ( ३ ) ऋ, ऌ. ( ४ ) स्वरमालेत आता अॅ, ऑ चा समावेश हवा. ( ५ ) दोन आक्षेपांना उत्तरे. ( ६ ) ऱ्हस्व ए, ओ.

**१३७. मराठीतील काही ध्वनि व त्यांची चिन्हे :** महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल १९३७ ( व. १० अं. १ ) / ४ पृष्ठे.

२६ डिसेंबर १९३६ ला पुण्यात भरलेल्या पहिल्या व्याकरण परिषदेपुढे वाचलेला निबंध. यातील बराच विषय "छंदोरचना" ( आ. २, जानेवारी १९३७ ) मध्ये आलेला आहे.

चालू लिपिचिन्हे, त्यांचे उच्चार; नवीन आलेले वा नवे स्वरूप घेतलेले उच्चार आणि त्यांच्यासाठी लिपिचिन्हे यांचा पुनर्विचार.

( १ ) ऋ, ऌ हे स्वर नव्हेत. 'अ़' चिन्ह हवे. ( २ ) संयुक्त व्यंजनांचे स्वरूप. दिखाऊ संयुक्त व्यंजने— ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, व्ह. - ह्न, ह्म, ह्य यांचा विचार.– 'य' शी संयुक्त होणाऱ्या व्यंजनांचा विचार.

**१३८. शब्दांचा नाददृष्ट्या विचार :** महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जून १९३९ ( व. १२ अं. ६ ) / ५॥ पृष्ठे.

'शब्दांना अर्थ हा संकेताने येतो; पण जे नाद मिळून शब्द होतो त्यांना स्वतःची अशी काही अर्थसूचकता, अर्थानुकूलता, निदान नाद-सूचकता तरी आहे का ?' या प्रश्नाचा विचार. 'शब्दांच्या नादात स्वयंसिद्ध अशी काही अर्थसूचकता असते, ही समजूत निराधार दिसते.'— 'विशिष्ट वर्णांच्या ठिकाणी काही स्वयंसिद्ध भावनानुकूलता असते, ही समजूतसुद्धा साधार वाटत नाही.' —शब्दांतील वर्ण आणि नाद यांच्यांत काही मूलभूत त्रिकालाबाधित संबंध आहे, असे वाटत नाही. —उच्चारसौलभ्य ( माधुर्य ) आणि उच्चारकाठिण्य यांची सोदाहरण मीमांसा.

## १०. संकीर्ण

**१३९. सुफीवाद ऊर्फ युयुत्सुवाद :** तत्त्वज्ञानमंदिर (त्रैमासिक), जानेवारी १९२५/ (व. ६ अं. ३)/ पृ. १३३६–१३४८.

तत्त्वज्ञानपरिचयात्मक लेख.

**१४०. संशुद्धि व सङ्घटना :** 'रणगर्जना', लेखांक १–३जानेवारी १९२७/ लेखांक २–१०जानेवारी १९२७. 'नवमराठा' या टोपण नावाने.

**१४१. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची पुनर्घटना :** लोकशिक्षण, एप्रिल १९३१ (व. ४, अं. ४)/ ३ पृष्ठे.

महाराष्ट्र साहित्य परिषद या विशिष्ट संस्थेच्या संबंधात मर्यादित लेख. त्या संस्थेच्या विकासाच्या दृष्टीने काही सूचना. एक तात्कालिक लेख.

(१) महाराष्ट्र साहित्य परिषद अखिल महाराष्ट्र, मराठी भाषिकांची केंद्रसंस्था व्हावी.—'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', तिचे कार्य. तिच्यावरील खर्च अपरिहार्य. (२) परिषद सुसंपन्न कशी होईल ? अखिल महाराष्ट्राचे प्रतिनिधित्व कसे मिळेल ? तिच्याकडून भरीव कार्य कसे होईल ? या प्रश्नांचा विचार.

**१४२. साहित्य सम्मेलनाच्या घटनेची आवश्यकता :** लोकशिक्षण, डिसेंबर १९३२ (व. ५, अं. १२)/ ९ पृष्ठे.

कोल्हापूरचे महाराष्ट्र साहित्य संमेलन झाल्यानंतर (१९३२) त्या अनुषंगाने लिहिलेला लेख. बहुतांशी प्रासंगिक स्वरूप.

कोल्हापूरचे संमेलन. त्याचे स्वरूप. यशाचा निर्वाळा.—अशा संमेलनाची आवश्यकता, स्वरूप व कार्य यांचा विचार व सूचना.— परिषदेची आवश्यकता. मध्यवर्ती संस्था हवी.

**१४३. वाङ्मयक्षेत्रांत नियंत्रक संस्था स्थापणे शक्य आहे का ? :** प्रतिभा, शुक्रवार, १६ मार्च १९३४ (व. २ अं. ६)/१ पृष्ठ [ अंतर्भूत : "डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर : वाङ्मयविषयक लेख" / संपा. गं. दे. खानोलकर / १९७४ / परिशिष्ट, पृष्ठ २३४–२३५ ].

१६ फेब्रुवारी १९३४ च्या 'प्रतिभे'त डॉ. केतकरांचा 'वाङ्मयक्षेत्रांत नियंत्रक संस्थेची आवश्यकता' प्रतिपादणारा लेख आला होता. त्यात अश्लीलापेक्षा अनृताचा प्रसार अधिक तिरस्करणीय असे त्यांनी सांगितले होते. त्यावर 'प्रतिभे'त पां. वा. काणे, शं. दा. पेंडसे, न. चिं. केळकर, वा. म. जोशी, ना. गो. चापेकर, माधव जूलियन, ना. सी. फडके, नी. ब. भवाळकर, श्री. ना. बनहट्टी, र. धों. कर्वे, वि. स. खांडेकर यांचे चर्चा करणारे लेख.

' अश्लील वाङ्मयापेक्षा अनृताचा द्वेषबुद्धीने प्रसार करू पहाणारे वाङ्मय समाजात अत्यंत तिरस्करणीय होय.' विपर्यासयुक्त टीकेचे तीन प्रकार : ( १ ) व्यक्तीची अप्रामाणिक पण उघड टीका, ( २ ) व्यक्तीची अप्रामाणिक आणि प्रच्छन्न टीका, ( ३ ) वाङ्मयकृतीची विपर्यासयुक्त टीका.—वाङ्मयकृतीची संभावना करण्याची पद्धत सदोष आहे.—दुष्ट कारवाईपासून लेखकाचे संरक्षण अवश्य झाले पाहिजे. निर्णायक शिष्टमंडळ स्थापन झाले तर कार्य होईल. पण ते अवघड. तसा प्रयत्न अवश्यमेव करावा.—वाचकवर्गावर जबाबदारी.—एखाद्या नियतकालिकाने धडा घालून द्यावा.

**१४४. साहित्य संमेलनांचे ' शुद्धिपत्रक '** : सह्याद्रि, मार्च १९३५ / ४॥–५ पृष्ठे.

बडोद्याला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ( १९३४ ) अध्यक्ष ना. गो. चापेकर, मा. त्रिं. पटवर्धन, वि. स. खांडेकर, वि. रा. शिंदे, वि. ना. पटवर्धन यांचे या विषयावर लेख. माधवराव पटवर्धनांनी विस्तृत लेखात अनेक प्रश्नांचा विचार केला आहे.

संमेलन भरविण्यामागील हेतूचा विचार. अनेक बारीकसारीक, व्यावहारिक सूचना. मराठी शाळांतील शिक्षकांना सवलत द्यावी. काव्यगायनाचा कार्यक्रम. बसण्याची व्यवस्था. ठराव.–यांसंबंधी सूचना, विचार. शेवटी महाराष्ट्र साहित्य परिषदेसंबंधी विचार.

**१४५. कै. श्रीधर व्यंकटेश केतकर** : प्रतिभा, १ जुलै १९३७ / ३॥ पृष्ठे.

' प्रतिभे'च्या केतकर–अंकातील डॉ. केतकरांच्या मृत्यूनंतर लिहिलेला गुणगौरव-पर लेख.

केतकरांचा व्रात्यस्तोम विवाह, त्यांच्या देहाचे दफन इत्यादिसंबंधीच्या आठवणी. केतकरांचा मोठेपणा. जॉन्सनपेक्षा श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व. केतकरांची विद्वत्ता, कर्मयोग, ज्ञानावर व्यक्तिनिरपेक्ष प्रेम. त्यांच्या कादंबऱ्यांसंबंधी प्रतिपादन. ( यात " ब्राह्मण-कन्ये"तील " सुधारका "वरील लेखावतरणाची माहिती. ) लोकांना धक्के देऊन जागे करणे हे केतकरांचे जीवितकार्य. केतकरांचे गुणविशेष, विक्षिप्तपणा यांचा अन्वय दाखविण्याचा आदरपूर्वक प्रयत्न.

**१४६. एक आजीव विद्यार्थी** : ज्ञानप्रकाश, रविवार, ९ जानेवारी १९३८ / २॥ स्तंभ.

नागांवचे भिकाजी वामन जोशी यांचा परिचय.

प्रास्ताविक. श्री. जोशींची जीवनरेखा. चरित्र. त्यांचा व्यासंग, छंद. त्यांचा छंदः-शास्त्रीय अभ्यासाचा कल. यासंबंधी त्यांची काही मते. त्या मतांचा विचार.

**१४७ तीलांजलि** : "श्री-मनोरमा", रविकिरण मंडळ प्रकाशन/ लेखन २५ मार्च १९३९ / १० एप्रिल १९३९ / ३ पृष्ठे.

कै. सौ. मनोरमाबाई रानडे यांना तीलांजली. रविकिरण मंडळाच्या इतर सदस्यांबरोबर.

(१) रविकिरण मंडळाच्या स्थापनेच्या काळाचे हृद्य स्मरण. नानांशी (श्री. बा. रानडे) प्रथम परिचय कुठे झाला, पुढे मंडळ कसे बनले त्याची हकीकत. (२) जिजींचे (मनोरमाबाई) स्वभावदर्शन. एक प्रसंग—"अभागी कमल"च्या प्रकाशनाच्या रात्री एकत्र भोजन. — मनोरमाबाईंसाठी विरोधाने तत्कालीन काही आचारविचारांवर थोडी टीका. प्रेमासंबंधी उत्कट श्रद्धा. 'त्या गेल्या नि मंडळ पोरके झाले.'

## ११. काही महत्त्वाची पत्रे : व्यक्तिगत व प्रकट

**१४८. माधव ज्यूलियनची पत्रे :** साहित्य सहकार, एप्रिल, मे, जून, जुलै १९६२ या चार अंकांत पटवर्धनांनी त्यांचे बालमित्र रा. वि. मराठे यांना पाठविलेली २९ ऑगस्ट १९११ ते ३० ऑगस्ट १९१३ या काळातील २३ पत्रे प्रसिद्ध झाली आहेत.

**१४९. कै. माधवरावांची पत्रे :** रा वि. म./लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० (पटवर्धन-अंक) / पृ. ५५१–५५४.

पटवर्धनांनी रा. वि. मराठे यांना पाठविलेल्या पत्रांतील ९ पत्रे.

**१५०. रविकिरण मंडळाच्या स्थापनेपूर्वी :** ज्योत्स्ना, फेब्रुवारी १९३७ / 'साहित्यिकांचे हितगुज' या सदरात.

२८ फेब्रुवारी १९२२, पुणे : आधुनिक कवींच्या कवितांचा नवीन गुच्छ काढण्याबाबत. प्रकाशक–मंडळाचे काही ठोकळ नियम.

('मी व माझे टीकाकार' या ज्योत्स्ना, एप्रिल १९३७ मधील पटवर्धनांच्या लेखात हे पत्र प्रसिद्ध केल्याबद्दल पटवर्धनांनी नाराजी व्यक्त केली आहे. या पत्राच्या खुलाशासाठी ११ फेब्रुवारी १९२२ च्या पत्रातील भाग तेथे उद्धृत.)

**१५१. रा. सीतारामपंत दामले यांची स्मरणशक्ति !! :** ज्ञानप्रकाश, रविवार २६ नोव्हेंबर १९२२.

२३ नोव्हेंबर १९२२ : पटवर्धन व शं. के. कानेटकर यांचे जोडपत्र. शं. का. गर्गे यांनी केशवसुत व त्यांची पत्नी यांच्या निश्चित केलेल्या मृत्युदिनांना पाठिंबा. न्यू इंग्लिश स्कूलच्या व फर्ग्युसन महाविद्यालयाच्या कागदपत्रांतून सीतारामपंत दामले यांची विधाने चूक ठरविणारा पुरावा दिला आहे. सात विधाने. आणि दोन थोडी औपरोधिक.

**१५२. अ. का. प्रियोळकर यांना पत्र :** विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९२४ च्या

अंकात प्रियोळकरांची 'श्रेष्ठ धर्म कुठला?' [हिंदुधर्मच श्रेष्ठ – उत्तर] कविता आली, तेव्हा संपादकांकडे प्रशंसापत्र. उल्लेख "प्रिय आणि अप्रिय" (लेखसंग्रह), अ. का. प्रियोळकर, १९६५ / पृ. ११६.

**१५३. रा. श्री. जोग यांना पत्र :** प्रा. जोगांचा "ज्योत्स्नागीत" काव्यसंग्रह प्रकाशित झाल्यावर, परिचय नसताना, आपणहून त्यांना पाठवलेले प्रशंसापत्र. आठवण, 'माझे पहिले पुस्तक', रा. श्री. जोग, ललित, ऑक्टोबर १९६६.

**१५४. ग. त्र्यं. माडखोलकर यांना पत्र :** "विलापिका" (ग. त्र्यं. माडखोलकर) बाबत. १९२८ नंतरचा सुमार. 'निवेदन', ग. त्र्यं. माडखोलकर / "विलापिका", द्वितीय मुद्रण, १९६६ / पृ. १८.

**१५५. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष :** ज्ञानप्रकाश, शुक्रवार, १९ डिसेंबर १९३०. दक्षिण हैद्राबादला भरणाऱ्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदासंबंधी सूचना करणारे द. सी. पंगू व पटवर्धन यांचे जोडपत्र.

डॉ. केतकरांची निवडणूक होईलच अशी आशा. ते झाले तर उत्तमच. पण त्यांना अध्यक्ष होता न आले तर ना. गो. चापेकर, ल. रा. पांगारकर, गो. चि. भाटे, ना. के. बेहेरे, लक्ष्मणशास्त्री लेले, गो. स. सरदेसाई या नावांचा विचार व्हावा. अध्यक्षीय व्यक्तीच्या अधिकारासंबंधाने अपेक्षा. अध्यक्षपद कोणास द्यावे ?

**१५६. "काव्य–ते कसे समजून घ्यावे" :** द. के. कुलकर्णी (बेळगाव) यां पुस्तकात (२० मार्च १९३१) किरात, एम्. टी. पटवर्धन, ना. सी. फडके, श्री. नी. चापेकर, रा. कृ. लागू यांचे थोडक्यात अभिप्राय.

२६ फेब्रुवारी १९३१, कोल्हापूर : या पुस्तकावर पुरस्कारपर सर्वसाधारण अभिप्राय.

**१५७. महाराष्ट्र–शब्दकोशास जाहीर सूचना :** ज्ञानप्रकाश, २८ जानेवारी १९३२.

"महाराष्ट्र-शब्दकोशा"चा पहिला फर्मा सूचनेसाठी स्वतःकडे आल्यावर सार्वजनिक महत्त्वासाठी त्याची जाहीर चर्चा. काही सूचना.

(१) रूपभेदामुळे वाढणारी शब्दसंख्या कमी केली पाहिजे. रूपनिश्चिती व्हावी. (२) उच्चारविचार. आद्य 'आ'; अकारान्त शब्दांतील अन्त्य 'अ'; सामासिक शब्दांचे लेखन; अनुच्चारित 'अ' कार. –परकीय शब्दांचे लेखन कसे करावे ? इंग्रजी शब्द कोणते द्यावे ?—आणखी काही किरकोळ सूचना.

**१५८. महाराष्ट्र शब्दकोशासंबंधी सूचना :** ज्ञानप्रकाश, रविवार, १४ फेब्रुवारी १९३२ / पाऊण स्तंभ.

गो. कृ. मोडक यांचा 'ज्ञानप्रकाश'च्या ७ फेब्रुवारी १९३२ च्या अंकात पटवर्धनांच्या सूचनांचा विचार करणारा लेख. त्या लेखातील विधानांचा परामर्श.

( १ ) मराठीतील आद्य 'आ'च्या लिखाणासंबंधीच्या आक्षेपाला विस्तृत उत्तर. ( २ ) समासात अवयवचिन्हाच्या उपयोगाचे समर्थन. ( ३ ) फार्शीतून आलेल्या शब्दांच्या लेखनासंबंधी विचार.

**१५९. ना. गो. चापेकर यांना पत्र** : २९ सप्टेंबर १९३२ / 'जीवनकथा' ( आत्मचरित्र, ना. गो. चापेकर, श० १८६५ ) / पृ. ९९.

दा. ग. पाध्यांना चापेकरांनी 'ज्ञानप्रकाशा'तून दिलेल्या उत्तराबद्दल अभिनंदन.

**१६०. १६१. गं. दे. खानोलकर यांना दोन महत्त्वाची पत्रे** : रविकिरण मंडळ व पटवर्धन यांचे संबंध, रविकिरण मंडळाचे अस्तित्व यासंबंधाने. [१ फेब्रुवारी १९३२ :] माडखोलकरांवर टीका. 'मी शांतपणाने रविकिरण मंडळाचा राजीनामा देईन.' 'कदाचित मंडळ मोडेल. एका प्रच्छन्न शत्रूस खूप आनंद होईल.' [५ फेब्रुवारी १९३२ :] 'मंडळाकरिता मी आजपर्यंत काय केले नाही?' माझ्या वाट्याचा संन्यास केला. नव्या जोमाचे तरुण कार्यकर्ते यावेत म्हणून खटपट केली....

**१६२. जिज्ञासूंचे स्वागत** : प्रतिभा, ५ जून १९३३.

'प्रतिभे'त नव्याने सुरू झालेल्या या सदरात, पहिल्यांदाच पटवर्धनांनी शंका विचारली.

'आनंद' मासिकात काव्यशेखर या नावाने, आणि "विदर्भवीणा" संग्रहात पृ. ११३ वर बा. रा. पडळकर यांची 'आईचे गाणे' कविता. दोहोंत बिलक्षण साम्य. ( त्या उद्धृत केल्या आहेत. ) 'या एकमेकांपासून घेतल्या असे न मानता एकाच परंपराप्राप्त स्त्रीगीताची ही दोन रूपांतरे असावीत अशी माझी अटकळ आहे.'

( ३ जुलै १९३३ च्या अंकात पडळकरांचा खुलासा : काव्यशेखर त्यांचे दूरचे नातलग. स्वतःला प्रसिद्धीची गोडी नसल्याने कविता त्यांच्याकडे दिली. )

**१६३. ना. गो. चापेकर यांना पत्र** : ३० ऑगस्ट १९३३, "जीवनकथा" ( ना. गो. चापेकर, आत्मचरित्र, श. १८६५ ) / पृ. ३८७-३८८.

'काव्याच्या नादी लागून विद्येची हानि करता' या चापेकरांच्या विधानाला उत्तर. तसेच, डे. ए. सोसायटीबाबत.

**१६४. ( खाजगीतील पत्रे : )** 'प्रतिभा', सप्टेंबर १९३५ / पृ. १७–१८. [ म. नि. ]

**१६५. "वाङ्मय, लेखन व जीवित"** : मारुती अनंत पै / ऑगस्ट १९३७.

होतकरू लेखकाची जी अनेकदा गोंधळल्यासारखी निराश स्थिती होते त्यासंबंधी एक प्रश्नमालिका पाठवून तिची आलेली उत्तरे ( १९३३ साली ) या पुस्तकात 'काही महाराष्ट्रीय साहित्यसेवकांचे लेखनव्यवसायाविषयी मननीय विचार' या

नावाने संकलित करून छापली आहेत. त्यात एक उत्तर पटवर्धनांचे.

( १ ) द्रव्यलोभ नसावा; कीर्तिलोभ असेना. त्याची हाव नको. Todd's "Student's Manual" वाचा. ( २ ) ज्ञानलालसा धरून विविध विषयांचे वाचन चालू ठेवावे. मग आवड लागेल; नवे काय करायचे ते दिसू लागेल. ( ३ ) काही नवीन स्वतः जवळ सांगण्यासारखे असले म्हणजे कसे सांगावे हे शिकवावे लागत नाही. अनुभव व अभ्यास हवा. ( ४ ) आज तरी मराठी लेखन स्वतंत्र व्यवसाय नाही. हीसेपेक्षा पोटाचा व्यवसाय वेगळा असावा.

**१६६. रामशास्त्री, न्यायच करा ! :** प्रतिभा, १ फेब्रुवारी १९३५ / 'प्रतिभेतील न्यायमंदिरात' या 'प्रतिभे'तील सदरातून 'रामशास्त्री' यांनी केलेल्या आरोपांबाबत प्रो. मा. त्रिं. पटवर्धन यांचा खुलासा.

( १ ) 'झेंडूची फुले' रविकिरण मंडळाच्या मत्सराने फुलली असा प्रो. पटवर्धनांच्या विधानाचा विपर्यास केल्याबाबत खुलासा. मात्सर्य हे दुबळेपणाचे लक्षण आहे. केशवकुमार समर्थ आहेत. केशवकुमार व आपण यांचे वैयक्तिक संबंध खेळीमेळीचे असल्याचे पटवर्धन सांगतात. ( २ ) चिं. ग. दीक्षितांच्या "कॉलेजचे विश्व"-मधील 'वसुंधरे'तील प्रथम-प्रकाशनसमयीचे एक कडवे त्याच्या पुस्तकावृत्तीपेक्षा कसे वेगळे होते त्याचे दर्शन. प्रथम प्रकाशनसमयीच्या स्वरूपातील माधव जूलियनांवरील अशिष्ट पर्यायोक्ती पुढे बदलली. ( ३ ) फार्सी शब्द वापरण्याची खोड सुटण्याचे श्रेय केशवकुमारांना नाही. स्वतःच्या विचारानेच परिवर्तन. द्यायचेच तर सावरकरांना श्रेय द्यावे लागेल.

**१६७. ग. त्र्यं. माडखोलकर यांना पत्र :** "मी आणि माझे साहित्य" ( ग. त्र्यं. माडखोलकर, १९६८ ) / परिशिष्ट, पृ. २३७.

( '"भंगलेले देऊळ" या कादंबरीविषयीदेखील ते [ पटवर्धन ] खासगी रीतीने वाईट बोलत असत.' माडखोलकर, 'निवेदन', "मी आणि माझे साहित्य" /पृ. २४)

१६ फेब्रुवारी १९३५ : "भंगलेले देऊळ"विषयी मत थोडक्यात. 'अमुक एका व्यक्तीचे असे प्रतिबिंब मला तीत आढळले नाही.'—कादंबरीच्या भाषेबद्दल.—ही कादंबरी ललित वाङ्मयात चांगले यश मिळवून देईल.

**१६८. भा. रा. तांबे यांना पत्र :** 'तांबे यांच्या कवितेचे परिष्करण', भीमराव कुलकर्णी, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, डिसेंबर १९७३ [ तांबे विशेषांक ] मध्ये उद्धृत.

२१ जुलै १९३५, कोल्हापूर : तांबे यांच्या कवितांच्या पाठांबद्दल, परिष्करणाबद्दल पृच्छा.

**१६९, १७०. अ. का. प्रियोळकर यांना दोन पत्रे :** [ प्रियोळकरांच्या खासगी

संग्रहातून ]. ( १ ) २७ ऑगस्ट १९३५, कोल्हापूर : " दमयंती स्वयंवरा "ची पोच. 'त्याचा सूक्ष्मपणाने अभ्यास करून परीक्षण लिहीन.' ( २ ) बिनतारखेचे पत्र. 'मराठी राष्ट्र' [ 'मराठवाणा', स्वप्नरंजन, क्र. ४६ ] कविता पाठविल्याबद्दल. 'आपल्या ध्येयनिष्ठ चळवळीकडे सादर कौतुकाने पाहात आहे.'

१७१. **भवानीशंकर पंडित यांना पत्र** : " विश्रब्ध शारदा ", संपादक ह. वि. मोटे / १९७२ / पृ. ३९४–३९५.

१९ डिसेंबर १९३५, कोल्हापूर : ( १ ) 'एवढ्या तेवढ्यावरून विपरीत ग्रह मी कधीच करून घेत नाही'. ( २ ) म्हणण्याची ओवी आणि अभंग यांत लयबद्धता मूळचीच आहे. वाचावयाची ओवी गद्यरूप आहे. ( ३ ) " तांबे समग्र कविता " संपादनातील प्रा. पंडितांनी दाखविलेल्या न्यूनांविषयी. 'आपले माझे सहकार्य झाले असते तर ही न्यूने न राहती.'

१७२. **कवि माधव यांना पत्र** : ज्योत्स्ना, मे १९४० / मा. के. काटदरे यांच्या 'माधवराव पटवर्धन : व्यक्ति व वाङ्मय' या लेखात उद्धृत.

८ जानेवारी १९३६, कोल्हापूर : माधवांच्या कवितांचा संग्रह प्रसिद्ध झाल्याबद्दल आनंद व्यक्त करणारे.

१७३, १७४. **मराठवाडा आणि कै. माधवराव** : प्रतिभा ( औरंगाबाद ), डिसेंबर १९४७.

कोल्हापूराहून रघुनाथराव मु. जोशी यांना पाठविलेली दोन पत्रे. ( १ ) ७ ऑक्टोबर १९३७ : मराठवाड्यातील लेखकांच्या होणाऱ्या कुचंबणेविषयी. संमेलनात परिचित व्हावेत. 'मला तर महाराष्ट्रीय कुठलाही असला तरी त्याच्याविषयी आपुलकी वाटते.' ( २ ) २ डिसेंबर १९३६ : जळगाव, महाराष्ट्र साहित्य संमेलनानंतरचे. प्रो. चिं. नी. जोशी यांच्यासंबंधी संमेलनातील एक प्रसंग. निजाम सरकारने चौकशी करावी अशा तऱ्हेच्या ठरावासंबंधाने ते रागावले याबद्दल.

१७५. **शं. के. कानेटकर यांना पत्र** : प्रतिभा ( औरंगाबाद ), डिसेंबर १९४७ / 'माधवराव पटवर्धन ( काही स्मृति )' या शं. के. कानेटकर यांच्या लेखातून.

१ डिसेंबर १९३६ : जळगाव, महाराष्ट्र साहित्य संमेलनानंतरचे लगेचचे पत्र. प्रा. पंगू कसे दुहेरी अंगांनी बोलतात यासंबंधाने.

१७६. **ना. ग. जोशी यांना पत्रे** : १७ नोव्हेंबर १९३६ ते ८ जुलै १९३९ या अडीच पावणेतीन वर्षांतील अकरा पत्रे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात संरक्षित.

ना. ग. जोशांच्या लेखन-प्रकाशनाच्या निमित्ताने काही पत्रे. नवीनांना उत्तेजन देण्याची वृत्ती. –५ ऑक्टोबर १९३७ : 'धवलचंद्रिका' जातीविषयी थोडे

विवेचन.–२४ नोव्हेंबर १९३८ : ना. ग. जोशांच्या ‘रत्नमाळ’ या अप्रकाशित सुनीतसंग्रहावर अभिप्राय. – २ मार्च १९३९ : “तुटलेले दुवे” ची काहीच प्रसिद्धी नाही. पण याचा मला विषाद नाही. निरनिराळे अनुभव ग्राह्यच असतात.

**१७७. गोविंदराव झोकरकर यांना पत्र :** सह्याद्रि, मार्च १९४१ / ‘साहित्यिकांची पत्रे’ या सदरात.

२९ जून १९३७, कोल्हापूर : (१) आपल्या कणिकांच्या संग्रहाला पटवर्धनांनी प्रस्तावना लिहावी या झोकरकरांच्या विनंतीवर उत्तर. ‘कुणाच्याही पुस्तकाला प्रस्तावना लिहावयाची नाही अशी जवळजवळ शपथ.’ प्रस्तावनेत कवीनेच स्वतःची भूमिका सांगावी. (२) सध्या काव्याला फार मंदी असल्याने कणिकांच्या संकलन–प्रकाशनाची घाई नको.

**१७८. गं. दे. खानोलकर यांना पत्र :** (ठसा) ‘पूर्णिमा’ पटवर्धन-अंक, ९ डिसेंबर १९३९.

१५ जुलै १९३८, कोल्हापूर, चे पत्र.

**१७९, १८०. सेतुमाधवराव पगडी यांना पत्रे :** उद्धृत, “जीवनसेतु” (आत्मचरित्र, सेतुमाधवराव पगडी / डिसेंबर १९६९).

(१) २८ फेब्रुवारी १९३९, कोल्हापूर : सेतुमाधवराव पगडींचा “उषा” कथासंग्रह प्रकाशित झाल्यानंतर, त्यासंबंधाने (पृ. ९६).

(२) २५ जुलै १९३९, कोल्हापूर : मराठवाड्यातील वाङ्मयावर पुस्तक लिहिण्यासंबंधी पगडींना काही सूचना (पृ. ९७).

[मूळ पत्राचा पुस्तकात छापलेला ठसा, व टंकाक्षरांनी मुद्रित केलेला त्यांचा मजकूर यात फरक आहे. तसा असू नये.]

**१८१. एका स्नेह्यास डी.लिट्. संबंधाने पत्र :** साप्ताहिक ‘मौज’, ६ डिसेंबर १९३९. [समाविष्ट, “माधव जूलियन”, गं. दे. खानोलकर, पृ. २३६].

**१८२. दु. का. संत यांना पत्र :** “संशोधन : पद्धती, प्रक्रिया, अंतरंग”, (दु. का. संत, सप्टेंबर १९६६)/ परिशिष्ट ३ / पृ. १९८.

९ ऑगस्ट १९३९, कोल्हापूर : दु. का. संतांच्या ‘सह्याद्रि’, जुलै १९३९ मध्ये ‘मराठीत दुय्यम अंकपद्धति’ या प्रसिद्ध झालेल्या लेखाबद्दल.

**१८३. दिनकर रामचंद्र जोगळेकर यांना पत्र :** ‘सह्याद्रि’, जानेवारी १९४०.

२८ ऑगस्ट १९३९ : जोगळेकरांनी केलेल्या दिव्याला सरकारी आर्थिक साहाय्य झाले त्याप्रसंगी अभिनंदन. ‘राष्ट्राला संपूर्ण स्वावलंबी करणे हेच शिक्षणाचे एक मुख्य ध्येय असले पाहिजे.’

१८४. भ. श्री. पंडित व बा. ना. देशपांडे यांना पत्रे : 'युगवाणी', एप्रिल १९४६/ पृ. २५–२७, 'युगवाणी', मार्च १९४७ / पृ. ९२–९४. [ म. नि. ]

## १२. इंग्रजी लेख

१८५. **Persian and Arabic Words in Marathi** : Proceedings and Translations of the First Oriental Conference / Poona, held on 5th, 6th, 7th November 1919 / Published in 1922 / pp. 461–470.

विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९२२ मधील 'अरबी, फार्सी व तुरकी शब्दांची परिणति' हा निबंध उपरोक्त निबंधाचे वाढविलेले भाषांतर आहे.

१८६. **Bharatiya Shikshanano Itihas** : The Ferguson College Magazine, July 1921 ( Vol. XII, No. 1 ) / M. P. या आद्याक्षरांनी. :

दोन वाक्यांत त्रोटक अभिप्राय. पुस्तकाचा परिचय, व सी. एम्. जानी आणि बी. सी. जोशी या लेखकद्वयाच्या परिश्रमांचे कौतुक.

१८७. **Tarana or Rubai Measure** : The Ferguson College Magazine, July 1921 ( Vol. XII, No. 1 ) ३½ पृष्ठे.

पर्शियन छंदःशास्त्रातील एका वृत्तप्रकारासंबंधी परिचयपर लेख. 'तराणा' हा अरबी छंद. त्याच्या उत्पत्तीची आख्यायिका. छंदःशास्त्र्यांची मत–मतांतरे. म्हणणीचे बारा प्रकार दिले आहेत. पर्शियन छंदःशास्त्राची पुनर्रचना व्हावयास पाहिजे असा अभिप्राय. रुबाईची मोडणी. ज्ञात पहिली रुबाई इ. स. ९४७ तील. अखेरच्या परिच्छेदात काही रुबायांच्या मोडणीच्या परीक्षणाचे निष्कर्ष.

१८८. **Qa fiya or Rhyme** : The Ferguson College Magazine, February 1923 ( Vol. XIII, No. 1 ) / ४ पृष्ठे. परिचयपर लेख.

फार्शीतील काव्यासंबंधीची कल्पना. कुराणातील काव्याचा निषेध. काव्याची फार्शीतील व्याख्या. काही पर्शियन छंदःशास्त्रीय पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या, त्यांची उदाहरणे. यमकपद्धती; काही नियम. काही सूचना. काही यमकप्रकारांची उदाहरणे. त्यांपैकी काही पर्शियन छंदःशास्त्रज्ञांच्या लक्षात न आलेली.

१८९. **Persion Prosody** : Annals of Bhandarkar Oriental Research Institute / Vol. VIII, Part III, 1927 / pp. 250–292.

यातील बहुतेक प्रतिपादन पटवर्धनांच्या मराठी लेखात कुठे ना कुठे आलेले आहे. फार्शी काव्य, काव्यशास्त्र, त्यातील संज्ञा यांचा सर्वसामान्य परिचय. फार्शी गणांची माहिती; वृत्त कसे बनते याची माहिती. १९ वृत्तप्रकारांची नावे. पुढे वृत्तप्रकारांचा सोदाहरण परिचय, आवश्यक तेथे भाष्य.

१९०. **Sara and Varahmihir** : Annals of Bhandarkar Oriental Research Institute, Vol. XV / p. 249

सार अलंकारासंबंधी एक परिच्छेद.

१९१. **Modern Marathi Poetry : A Remarkable Decade** : Triveni, July–August 1931 ( Vol. IV, No 4 ) / ७। पृष्ठे.

परभाषिकांना आधुनिक मराठी काव्याचा परिचय करून देण्याची भूमिका. १९२० ते १९३० या दशकातील मराठी कविता, तिच्यातील प्रमुख प्रवृत्ती, कवी यांची ओळख करून देणारा लेख. इंग्रजी शैलीसाठी अभ्यसनीय.

( १ ) आधुनिक मराठी कवितेचा जन्म. तिचे भावगीत–स्वरूप. इंग्लिश वैणिक काव्याचा प्रभाव. १. वि. मो. महाजनि, २. केशवसुत, टिळक, चंद्रशेखर इ. ३. गोविंदाग्रज, रेंदाळकर, बालकवि इ.—या तीन पिढ्यांतील मराठी कविता. ( २ ) १९१०–१९३० या दशकातील काव्यगायनाची प्रथा. सुमंत, टेकाडे. गीतप्रकार ( पदे ) मराठीत ज्ञानेश्वरांपासून. ( ३ ) तांब्यांच्या कवितेचा गौरव. ( ४ ) महाराष्ट्र शारदा-मंदिर. त्यातील कवी. १९२१ चे बडोद्याचे महाराष्ट्र साहित्य संमेलन. नवीनांचे कर्तृत्व. ( ५ ) रविकिरण मंडळाचा जन्म. त्याचे सदस्य. त्यांची प्रकाशने. माधव जूलियन. ( या लेखाला बरेचसे रविकिरण मंडळ आणि माधव जूलियन यांचे कार्य असे स्वरूप आले आहे. ) केशवकुमार, निशिगंध यांचा मुद्दाम आवर्जून स्वतंत्र परिच्छेदात उल्लेख. ( ६ ) या दशकातील उदयोन्मुख आशास्थाने.

१९२. **New Ways in Marathi Literature** : Triveni ( ? )

१९३. **The Native Idiom in Marathi** : Triveni, Oct. 19े7, ५॥ पृष्ठे.
मराठीत अनेक ठिकाणी प्रतिपादिलेले भाषाशुद्धीविषयक विचार इंग्रजीतून परप्रांतियांसाठी ग्रथित केले आहेत.

( १ ) भाषाशुद्धीच्या चळवळीचा पूर्वेतिहास. पटवर्धनांची भूमिका. सावरकरांच्या व त्यांच्या दृष्टीतील अंतर. सावरकरांची धर्म-राष्ट्रवृत्ती; पटवर्धनांची शुद्ध भाषाविषयक. इतरांचा द्वेष करून बहिष्कार टाकण्यापेक्षा आपल्या भाषेविषयीचे प्रेम वाढवून जुन्या शब्दसंपत्तीचा उद्धार करावा. 'Self-help' आणि 'Self-reliance' हे मुख्य धोरण. अल्पसंख्य सुशिक्षितांपेक्षा लाखो बहुजनसमाजाचा विचार केला पाहिजे. ( २ ) कोल्हापूरला झालेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील मुस्लिम सदस्याच्या धमकीने स्वतः ला आलेली जाग. जळगावचे स्वतःचे भाषण. त्यावरील टीकांचा परामर्श. परभाषेतील शब्द सहज वापरणे हे लाचार, गुलाम मनोवृत्तीचे लक्षण आहे. ( ३ ) चळवळीचे यशापयश. केळकर–अत्रे या पक्षाला मिळाले. ( ४ ) परप्रांतीयांना

आवाहन. 'भाषाशुद्धी 'पेक्षा (Purism) 'स्वदेशी' शब्द (Swadeshism) शब्द अन्वर्थक.

१९४. **Linguistic Frontiers :** Triveni, December 1937 (Vol.-X, No. 6).

भाषावार प्रांतरचनेसंबंधीच्या, राजकीय बनलेल्या पण मूलतः सांस्कृतिक, भाषिक असलेल्या प्रश्नावर लेख.

भाषावार प्रांतरचनेचा पुरस्कार. ती रचना राष्ट्रवादाला पोषक आहे. हिंदी सर्व प्रांतांवर लादण्याला सक्त विरोध.—भाषिक सीमांचा विचार. सीमानिश्चितीच्या कसोट्या. बेळगाव, सोलापूर यांचे उदाहरण.—न्याय आणि सहकार्य यांच्या आधारा वर हे काम व्हावयाला पाहिजे.

१९५. **The All India Language :** Triveni, November, 1938.

राजकारण, भाषाकारण यांसंबंधीचा विस्तृत लेख.

हिंदुस्थानीला इंग्रजीची जागा देणे प्रादेशिक भाषांच्या विकासाला मारक ठरेल. हिंदुस्थानी अशी राष्ट्रभाषा करण्याला विरोध. भाषावार प्रांतरचनेसाठी खेडे हा घटक मानावा. – प्रादेशिक भाषेला महत्त्वाचे स्थान मिळाले पाहिजे. सर्वसाधारण विद्यार्थ्यांवर इंग्रजी व हिंदी यांचे ओझे लादणे असह्य आणि अन्यायाचे. मातृभाषेचे शिक्षण आधी पूर्ण पाहिजे. राष्ट्रीय एकात्मतेसाठी एकच भाषा असावयाला हवी असे नाही. भाषिक किंवा धार्मिक निष्ठांपेक्षा राष्ट्रीय निष्ठा बलवत्तर ठरल्या पाहिजेत. राष्ट्रीय व्यवहारात धर्मभावनेच्या पलीकडे निधर्मीपणाचा स्वीकार केला पाहिजे. – देवनागरी लिपीचा सार्वत्रिक स्वीकार व्हावयाला हवा. उर्दूच्या आग्रहाला विरोध. हिंदी भाषेचे संस्कृतीकरण होणे राष्ट्रीयतेला पोषक आहे. – भाषाभिवृद्धीचा विचार.

## १३. काही महत्त्वाची भाषणे[1]

१. छन्द (निबंध वाचन) : २ रे शारदोपासक संमेलन, पुणे / १६ मे १९२६. काही आधुनिक पद्यांच्या मात्रामापनाविषयी निबंध.

२. **हिंदुधर्माची सद्यःकालीन स्थिति :** ज्ञानप्रकाश, २२ सप्टेंबर १९२७. ५ सप्टेंबर १९२७ रोजी नगर येथे गणेशोत्सव व्याख्यानमालेत झालेले ५ वे व्याख्यान.

आजच्या हिंदु धर्माच्या स्थितीवर टीका. आमच्यांत राष्ट्रीय जीवनाची भावना नाही. हिंदुस्थानचा इतिहास म्हणजे हिंदूंच्या अप्रतिष्ठेचे, नालायकीचे प्रदर्शन आहे. खरा धर्म म्हणजे काय ?–आम्हाला धर्म नाही. तत्त्वनिष्ठा पाहिजे. तत्त्वासाठी हौतात्म्य

१. जी भाषणे लेखरूपाने प्रकाशित झाली आहेत त्यांचा अंतर्भाव लेखांमध्ये केला आहे.

पत्करण्याची सिद्धता हवी.– व्यक्तीच्या योग्य विकासास समाजाने पूर्ण स्वातंत्र्य दिले पाहिजे.–गुरुभक्तीवर टीका. [ ' हिंदुधर्माचे भावी स्वरूप ' यावर १९२४–२५ च्या सुमारास पटवर्धनांचे अंमळनेरास व्याख्यान झाल्याचा संदर्भ मिळतो. " माधव जूलियन " ( आ. २ ), पृ. १४२. ]

**३. मराठीचे शुद्धलेखन :** ३ रे शारदोपासक संमेलन, पुणे / ५ जून १९२८ / ज्ञानप्रकाश, ७ जून १९२८.

तात्यासाहेब केळकरांनी प्रयोगादाखल लेखनपद्धतीतील रूढींविरुद्ध बंड पुकारले म्हणून अभिनंदन. "फार्शी–मराठी कोशा"च्या रचनेच्या वेळचे अनुभव. प्रचलित, तसेच जुन्या शब्दांचेही उच्चारण निश्चित व्हावयास हवे.– लेखनपद्धतीचे ध्येय. वर्ण-ओळख झाल्यावर मुलालाही कोणतेही पुस्तक बिनचूक वाचता आले पाहिजे. काही आणखी सूचना.

**४ संस्कृत विरुद्ध मराठी :** ३ रे शारदोपासक संमेलन, पुणे, ५ जून १९२८ / ज्ञानप्रकाश, ७ जून १९२८.

मॅट्रिकपर्यंत शिकविताना भाषेची हेळसांड न होता योग्य रीतीने शिकविण्याची शिक्षकांनी खबरदारी घेतली पाहिजे.

**५. कै. रेंदाळकर दिन :** १५ नोव्हेंबर १९३०, कोल्हापूर / ज्ञानप्रकाश, १३ डिसेंबर १९३०.

अध्यक्षीय भाषण. स्वतःच्या विद्यार्थिदशेतील आठवणी. ' प्रबोधन ' म्हणण्याच्या वीस आवृत्त्या झाल्या. ' अजुनि चालतोचि वाट 'ची परिणामकारकता. स्मृतिदिना-संबंधी सूचना.

**६. काव्यातील चमत्कृती :** ( कोल्हापूर ), वाङ्मय-मंडळ, फेब्रुवारी १९३३, पहिला आठवडा.

**७. " चंद्रिका " काव्याचा प्रकाशन समारंभ :** २७ मार्च १९३२, मुंबई / अध्यक्ष न. चिं. केळकर / ज्ञानप्रकाश, ३ एप्रिल १९३२.

वीस वर्षांपूर्वी पद्यरचनेचा ओनामा चंद्रशेखरांजवळ शिकल्यावेळच्या आठवणी. चंद्रशेखरांच्या कवितासंग्रहाच्या प्रकाशनाची आवश्यकता, औचित्य. ( बालकवींच्या काव्यसंग्रह-प्रकाशनाचे त्यांच्या चाहत्यांनी हाल केले. )

**८. अध्यक्षीय समारोप :** महाराष्ट्र कविसंमेलन, नाशिक / १७ सप्टेंबर १९३३ / ज्ञानप्रकाश, २४ सप्टेंबर १९३३.

रविवार, १७ सप्टेंबर १९३३. संमेलनात ( १ ) काव्याचे साभिनय पठण, ( २ ) परकीय शब्द, वृत्ते व तंत्र यांचा मराठीत उपयोग, ( ३ ) विडंबन काव्य या तीन विषयांची चर्चा झाली. यासंबंधी पटवर्धनांचे विचार.

**९. अनिष्ट लिखाण :** पारिजात, जानेवारी १९३५. बडोदे येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात ( डिसेंबर १९३४ ), अश्लील वाङ्मयासंबंधीच्या ठरावावर कडाक्याची चर्चा.

वाङ्मयाच्या निर्मितीवर कोणत्याही संस्थेचे नियंत्रण नको. सुसंस्कृत समाजाच्या अभिरुचीचे अप्रत्यक्ष नियंत्रण. – क्षुद्र विकारांना चेतविणाऱ्या अनिष्ट वाङ्मयाचा निषेध. – अप्रमाणिकपणाविरुद्ध ठराव. कलाविलासाच्या नावाखाली लपणाऱ्या नंगेपणाचा निषेध. प्रेम म्हणजे स्वैराचार नव्हे. कामवासना नैसर्गिक. पण आत्मसंयमन महत्त्वाचे आहे.

**१०. अहमदाबादची बृहन्महाराष्ट्र परिषद :** ३० डिसेंबर १९३४ / अध्यक्ष सरदार किबे / कविवर्य तांबे यांच्या वयाला ६० वर्षे पुरी झाल्याबद्दल त्यांचा गौरव करणारा, परमेश्वराचे ऋण व्यक्त करून प्रार्थना करणारा पटवर्धनांचा ठराव. त्यावर त्यांचे तांब्यांच्या कवितेचा गौरव करणारे भाषण.

**११. केशवसुत यांचा स्मृतिदिन :** ७ नोव्हेंबर १९३५ / महाराष्ट्र शारदा मंदिराच्या विद्यमाने / अध्यक्ष श्री. म. माटे, मुख्य वक्ते के. नारायण काळे / ज्ञानप्रकाश, १७ नोव्हेंबर १९३५.

स्वतःच्या केशवसुतांवरील लेखामागील भूमिका. काव्यरसिकता चोखंदळ हवी. पृथक्करण हे झालेच पाहिजे. 'सरदार धन्य एवढा'चा उल्लेख. केशवसुतांच्या काव्याचे स्वरूप, महती. त्यांची प्रवृत्ती.

**१२. अध्यक्षीय :** सांगली हायस्कूल, ३५ वे वार्षिक संमेलन / ज्ञानप्रकाश, २५ डिसेंबर १९३५.

( १ ) मंचरजी वाडिया व प्रो. पेंडसे या दोघांच्या सत्संगामुळे स्वतःत क्रांती झाली. ( २ ) गेल्या साठ-सत्तर वर्षांतील शैक्षणिक प्रगतीचा आढावा. चालू शिक्षणपद्धतीवर टीका.– आमचा ज्ञानावरचा विश्वासच उडाला. संशोधनवृत्ती नाही.– सुशिक्षितांना धर्मच नाही. ज्याकरिता जीवत्याग करू असे आपल्याबाबतीत कोणतेही तत्त्व नाही.– शिक्षणाचे उद्दिष्ट बुद्धी, मन, शरीर कार्यक्षम व्हावे.– तत्त्वनिष्ठेचा गौरव.

**१३. कविता कशी निर्दोष असावी ? :** २३ जानेवारी १९३६ / गोविंदाग्रज स्मृतिदिनानिमित्त व्याख्यान / ज्ञानप्रकाश, जानेवारी १९३६.

**१४. भाषाशुद्धी किंवा भाषेकडे पहावयाची नवी दृष्टी :** ५ वे शारदोपासक संमेलन, पुणे / ३१ मे १९३६ / अध्यक्ष–कृ. पां. कुलकर्णी / ज्ञानप्रकाश, ७ जून १९३६.

**१५. विधवाविवाह कायदा दिन ( पुणे ) :** २५ जुलै १९३६ / विधवाविवाह साहाय्यक मंडळातर्फे / अध्यक्ष न. चिं. केळकर / ज्ञानप्रकाश, ९ ऑगस्ट १९३६.

( १ ) कायद्यापेक्षा कायद्याची प्राणप्रतिष्ठा व इतिश्री करणाऱ्या व्यक्तीचे महत्त्व अधिक. विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांचा गुणगौरव. न्या. रानडे कसोटीला उतरले नाहीत. ( २ ) या कार्याची सद्यःस्थिती. विधवांचे विवाह आणि आर्थिक स्वातंत्र्य. लग्न जुळविण्याची सदोष पद्धती. कुमारिकांचाही प्रश्न. विवाहपूर्व परिचयाविना गत्यंतर नाही. प्रणयाची आवश्यकता. ( ३ ) नवा प्रश्न–अविवाहित तरुणी विवाहित पुरुषांशी लग्नास अधिक उत्सुक दिसतात त्या का ? परप्रांतीय वा परधर्मीय पुरुषांशीही विवाह. यावर मार्ग. परिचयाचे क्षेत्र वाढले पाहिजे. " विरहतरंगा "वरील टीकेचा उल्लेख.

**१६. कवि चंद्रशेखर-निधनाबद्दल दुःखप्रदर्शन** : २८ मार्च १९३७, पुणे / अध्यक्ष न. चिं. केळकर / ज्ञानप्रकाश, ४ एप्रिल १९३७.

पटवर्धनांनी दुखवट्याचा ठराव मांडला. त्यावर त्यांचे पहिले भाषण. अत्यंत आत्मीयतेने, रंगून बोलले. अध्यक्षांनी त्यांचा गौरव केला. चंद्रशेखर व्यक्ती व कवी म्हणून गौरव. त्यांची प्रतिभा, काव्य यांचे स्वरूप. मुक्तेश्वर-मोरोपंतांची परंपरा.

**१७. ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांना स्मृतिपुष्पांजलि** : ज्ञानप्रकाश, २० एप्रिल १९३७.

( अ ) ११ एप्रिल १९३७ / अंत्यविधीच्या प्रसंगी महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, येथे भाषण. केतकरांची असामान्य विद्वत्ता व विलक्षण उद्योगप्रियता. कार्य करणारी नवी तरुण पिढी निर्माण केली. अखंड उद्योग, ज्ञान व देश यांवर निष्ठा.

( ब ) १९ एप्रिल १९३७, पुणे/विलक्षण कल्पनाशक्ती. उच्च प्रतीची रसिकता. प्रांजलपणा. दुर्दम्य आशावाद.

**१८. ( मराठी ) काव्याला ओहोटी लागली आहे काय ?** : ६ वे शारदोपासक संमेलन, पुणे / ३० मे १९३७ / चर्चा / ज्ञानप्रकाश, ६ जून १९३७.

काव्याला भरती आली आहे, पण चटकदार काव्याची निपज होत नाही. तांबे–प्रभृतींचा भर गेला आहे. काही उल्लेखनीय कवी-कविता.—ओहोटीची नुसती ओरड नको. चांगल्या भावगीतांचे कौतुक झाले पाहिजे.-ज्या कवितांनी मनाला वेड लागते, एकांतात गुणगुणतानाही आनंद मिळतो, नवीन दृष्टी प्राप्त होते, मानवता वाढते ते श्रेष्ठ काव्य. ते कितीही वेळा ऐकले तरी कंटाळा येत नाही.–कवींनी जगाचा अनुभव घेतला पाहिजे. शोधक दृष्टी ठेविली पाहिजे.

**१९. भाषाशुद्धीच्या ठरावाला अनुमोदन** : एप्रिल १९३८ मध्ये वि. दा. सावरकर यांच्या अध्यक्षतेखाली मुंबईला भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात भास्करराव जाधव यांनी मांडलेल्या भाषाशुद्धीच्या ठरावाला अनुमोदन देणारे मुख्य भाषण.

**२०. कोशयुग व संकलनयुग** : ७ वे शारदोपासक संमेलन, पुणे / २९ मे १९३८ / ज्ञानप्रकाश, ५ जून १९३८.

कोशकर्ते स्वयंस्फूर्तीने काम करतात. पण त्यांच्या प्रयत्नांचे चीज होत नाही. जनतेत असावी तितकी ज्ञानलालसा नाही. "फार्शी-मराठी-कोशा"वर अद्याप कोणी उत्तम टीका केली नाही.

**२१. कवि व त्याचे खासगी जीवन** : ७ वे शारदोपासक संमेलन, पुणे / २९ मे १९३८ / ज्ञानप्रकाश, ५ जून १९३८.

कवीही समाजाचा इतरांप्रमाणे सामान्य घटक असतो. त्यांच्या सवलती, बंधने त्यालाही असू द्या. समाजाची छिद्रान्वेषी वृत्ती. कवीच्या जीवनाच्या माहितीने त्याच्या काव्यातील रसास्वाद वाढतो असे नाही. 'संगमोत्सुक डोह'च्या निर्मितीचा इतिहास.

**२२. मातृभूमी नि स्त्रिया** : ५ ऑगस्ट १९३८ / महाराणी लक्ष्मीबाई गर्ल्स हायस्कूल, कोल्हापूर / ज्ञानप्रकाश, २१ ऑगस्ट १९३८.

मातृभाषेची सेवा मातृभूमीच्या सेवेइतकीच महत्त्वाची. मायभाषेचे महत्त्व. श्रेष्ठ संस्कृती नि उज्ज्वल परंपरा जतन करण्यात स्त्रियांचा वाटा मोठा. मातृभाषा शुद्ध नि स्वाभाविक राखण्याचा स्त्रियांनी निश्चय करावा.

**२३. अध्यक्षीय** : महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटीचे ३२ वे वार्षिक संमेलन, पुणे २६, २७ नोव्हेंबर १९३८ / (१) 'त्रिकाळ', २८ नोव्हेंबर १९३८ / (२) 'ज्ञानप्रकाश', ४ डिसेंबर १९३८.

पटवर्धनांच्या तत्त्वनिष्ठेच्या, जीवनातील अनुभवांच्या दृष्टीने महत्त्वाचे. शिक्षण-क्षेत्रात कसे अनाचार चालले आहेत त्याचे सडेतोड दर्शन.

(१) शिक्षकवर्गाच्या कुचंबणेचे हृदयद्रावक चित्र. शिक्षण-व्यवसायात अभिमानास्पदता उरली नाही. शिक्षण-संस्थांचे पुनरुज्जीवन केले पाहिजे. आजीव सदस्य पद्धतीवर कडक टीका. ज्ञानवृत्ती, संशोधनकार्य थांबले. शिक्षकांची हेळसांड. (२) विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. परीक्षेवर विसंबू नका. परिश्रम करा. प्रामाणिकपणे वाटेल तो धंदा करा, त्यात तुमचा हात धरणार नाही अशी कीर्ती मिळवा. 'आधी मिळवीन व मग मिरवीन' अशी आकांक्षा बाळगा.

**२४. प्रा. पटवर्धनांचा कोल्हापुरात गौरव** : २० डिसेंबर १९३८ / नगर वाचन मंदिरातर्फे / अध्यक्ष पंडितराव / ज्ञानप्रकाश, २९ डिसेंबर १९३८.

या जिव्हाळ्याच्या गौरवाने समाधान वाटले. पदवीपेक्षा कर्तृत्व व लायकी यांवरच मनुष्याची योग्यता अवलंबून असते. स्वतःच्या अगोदर मुंबई विद्यापीठाने न. चिं. केळकर, रियासतकार सरदेसाई, ना.गो.चापेकर यांना पदव्या द्यावयाला पाहिजे होत्या.

२५. **दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलन** : अधिवेशन, मिरज / ज्ञानप्रकाश, ५ मार्च १९३९.

ना. सी. फडके यांच्या अध्यक्षीय निवडीला पाठिंबा देणाऱ्यांत पटवर्धन. (१) वास्तववाद विरुद्ध ध्येयवाद, (२) पावित्र्यविडंबन यांवरील चर्चेत भाषण. "छंदोरचने"स डी. लिट्. मिळाल्याबद्दल अभिनंदनाचा ठराव.

२६. **राष्ट्रभाषेची सक्ती** : २३ वे महाराष्ट्र साहित्य संमेलन, अहमदनगर / ८ एप्रिल १९३९ / ज्ञानप्रकाश, १६ एप्रिल १९३९.

हिंदी भाषेची सक्ती नसावी. आंतरप्रांतीय दळणवळणाच्या दृष्टीने जी भाषा अद्याप परिपूर्ण झाली नाही तिची सक्ती का करावी ? हिंदु-मुसलमान एकीच्या दृष्टीने विचार. त्यांच्यांतील तेढीची कारणे भाषा वा लिपी नाहीत.

२७. **कानडी-मराठी वाद** : १६ मे १९३९ / वसंत व्याख्यानमाला, पुणे / उपवक्ता-म्हणून भाषण / अध्यक्ष डॉ. जी. डी. चाफेकर / ज्ञानप्रकाश, २४ मे १९३९.

आपली भाषा, प्रांत यांबाबतीत आपण आळशी व उदासीन आहोत. कानडी-मराठी वाद क्षुद्र नाही. कोणताही वाद हा नव्या जागृतीचा व स्वाभिमानाचा द्योतक असतो. सीमाप्रांतातील महाराष्ट्रीयांकडे आपण दुर्लक्ष करतो ते चांगले नाही.

२८. **महाराष्ट्र–बृहन्महाराष्ट्रीयांचे ६ वे संमेलन, पुणे** : अध्यक्ष प्रा. न. ना गोडबोले / ज्ञानप्रकाश, २८ मे १९३९.

'बृहन्महाराष्ट्रीयांस पुण्यात स्वतंत्र रीतीने राहता यावे म्हणून येथे एक महाराष्ट्रभुवन बांधावे. या उपक्रमास आपण सक्रिय मदत करू.'

२९. **८ वे महाराष्ट्र शारदोपासक संमेलन, पुणे** : २९ मे १९३९ / अध्यक्ष भा. वि. वरेरकर/स्वागताध्यक्ष, माधवराव पटवर्धन / ज्ञानप्रकाश, ४ जून १९३९.

(अ) स्वागताध्यक्षीय भाषण.

(ब) **लेखक व लिहिणावळ** : चर्चा / ३० मे १९३९.

%%

ग्रं थ

१. आमचीं अकरा वर्षे : लीलाबाई पटवर्धन / प्रकाशक य. गो. जोशी, पुणे / मुद्रक श्री. र. राजगुरु, पुणे / प्रकाशनकाल २९ नोव्हेंबर १९४५ / पृष्ठे ८+१९६ / आकार १९×१२ सेंटीमिटर / किंमत ४ रु.

पटवर्धनांच्या पत्नी लीलाबाई यांनी पटवर्धनांच्या निधनानंतर त्यांच्या सहवासात घालविलेल्या अकरा वर्षांतील आठवणींचे केलेले हृद्य निवेदन. पटवर्धनांच्या गृह-जीवनाचे विशेष दर्शन. ही अकरा वर्षे त्यांच्या जीवनातील विशेष महत्त्वाची. पटवर्धनांच्या संसारी जीवनातील सत्याचे, प्रामाणिकपणाचे, प्रेमळपणाचे प्रयोग या आठवणींमधून सांगितले आहेत.–प्रारंभी पटवर्धनांच्या पूर्वायुष्याचे निवेदन. त्यांच्या स्नेह्यांचे परिचय. पटवर्धनांच्या काही कवितांच्या जन्माच्या हकिकती.

२. माधव जूलियन : डॉ. माधव त्रिंबक पटवर्धन : [ जीवनगाथा ]. गंगाधर देवराव खानोलकर / स्वस्तिक पब्लिशिंग हाऊस, मुंबई ४ / कल्पना प्रिंटिंग प्रेस, मुंबई / आ. १–जुलै १९५१ / पृ. ८+२७६ / १८×१२ सेंटीमीटर / ५ रु. ८ आ.

पटवर्धनांची ही एकवीस अध्यायी जीवनकथा आहे. त्यांचे जीवन जसे घडत गेले आणि दिसले तसे ते यात यथाक्रम सांगितले आहे. कथानायकाबद्दल वाटणारा जिव्हाळा ही या लेखनामागील प्रेरणा आहे.

आ० २ / पॉप्युलर प्रकाशन, मुंबई / मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई / १९६८ / पृ. १४+२९० / २२×१४ सेंमी. / १६ रु.

प्रथमावृत्तीत ज्या उणिवा राहून गेल्या होत्या त्या या आवृत्तीत दूर करण्याचा प्रयत्न केला आहे. पटवर्धनांच्या पूर्वायुष्यातील काही प्रसंग व घटना यांचे जेवढ्या निःसंदिग्धपणाने कथन होणे आवश्यक होते तेवढे, अनेक कारणांमुळे, पहिल्या आवृत्तीत होऊ शकले नव्हते. प्रस्तुत आवृत्तीत ते जेवढे करणे शक्य होते तेवढे केले आहे.

३. दिवस असे होते : विठ्ठलराव घाटे / मौज प्रकाशन गृह, मुंबई / मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई / २३ जुलै १९६१ / पृ. ६+४९९ / २२×१४ सेंमी. / १५ रु.

ख्यातनाम साहित्यिक, शिक्षणाधिकारी, पटवर्धनांचे बालमित्र विठ्ठलराव घाटे यांचे अभिजात आत्मचरित्र. त्यांच्या जीवनातील पटवर्धन ही एक प्रमुख व्यक्ती. ' माधवरावांनी तीस एकतीस वर्षे साथ दिली. ' ( पृ. ६ )–ग्रंथभर अनेक ठिकाणी पटवर्धनांचे उल्लेख. ' बडोद्यातले दिवस : तो दरबार आणि ते जलसे ' ( प्र. १३ ), ' बडोद्यातले दिवस : कविराज चंद्रशेखर ' ( प्र. १४ ), ' साताऱ्यातले दिवस : कंचनी ' (प्र. २२), ' पुण्यातले दिवस : रविकिरण मंडळ ' (प्र. २७), ' प्रेम आणि माधवराव ' (प्र. २८ ) या पाच प्रकरणांत तर पटवर्धनांवर प्रामुख्याने लेखन.

४. **स्वप्नभूमी** : माधव जूलियन यांचे चरित्र : शंकर केशव कानेटकर / व्हीनस प्रकाशन, पुणे / सुलभ मुद्रणालय, पुणे / २८ नोव्हेंबर १९६५ / पृ. ३२+३७५/ २२×१४ सेंमी. / १५ रु.

पटवर्धनांचे सविस्तर चरित्र. त्यांच्या वाङ्मयाचाही परिचय व परामर्श. वर्षानुवर्षे मानलेल्या मित्रऋणातून मुक्त होण्याच्या कर्तव्य-भावनेने, काहीशा विकल अवस्थेतही चरित्रलेखन. लेखनात अतिशय शैथिल्य. शांताबाई हेर्लेकर–पटवर्धन संबंध, वरदा नायडू-पटवर्धन संबंध, डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे पटवर्धनांचे त्यागपत्र प्रकरण अशा काही महत्त्वाच्या प्रकरणांविषयीचे कागदपत्र प्रथमच प्रकाशात आले. त्यामुळे महत्त्व. पटवर्धनांच्या कवितांचे स्थल-काल, सुनीत लेखनाच्या अकारविल्हे व कालानुक्रमे मित्या परिशिष्टात. कविवर्य भास्करराव तांबे यांनी पटवर्धनांना पाठविलेली पत्रे ( पृ. ३३३–३६५ ).

५. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** : सु. रा. चुनेकर / मौज प्रकाशन गृह, मुंबई / मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई / जून १९७३ / पृ. २० + ३९९ / २२ × १४ सेंमी / २१ रु.

पटवर्धनांच्या समग्र वाङ्मयीन कार्याचा शोध घेऊन त्याचे केलेले विश्लेषण. त्यांचे वाङ्मयीन कार्य व जीवन या दोहोंमधील संबंध लक्षात घेऊन त्यांच्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाचे दर्शन येथे घडविले आहे. ग्रंथाचे चार विभाग— ( १ ) 'उपोद्घात'. पटवर्धनांच्या वाङ्मयीन कार्याला आवश्यक तेवढी त्यांच्या जीवनाची पार्श्वभूमी. (२)'काव्यकर्तृत्वा'चा परामर्श. (३) 'काव्येतर कर्तृत्वा'चा परामर्श. ( ४ ) 'उपसंहार'– पटवर्धनांचे काव्यकर्तृत्व आणि काव्येतर कर्तृत्व यांतील संगती स्पष्ट केली असून त्याचा त्यांच्या जीवनाशी असलेला अन्वय विशद केला आहे. परिशिष्टे : (१) पटवर्धनांच्या जीवनाची रूपरेषा. ( २ ) जूलियन ॲडरले. ( ३ ) " दि स्टूडन्ट्स् मॅन्युअल. " ( ४ ) पटवर्धनांच्या कवितांचे लेखनकाल, प्रकाशनांचे स्थल व काल. ( ५ ) पटवर्धन यांचे लेख व भाषणे. ( ६ ) पटवर्धन यांच्यासंबंधी वाङ्मय.

६. डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन : द. न. गोखले / मौज प्रकाशन गृह, मुंबई / मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई / १ मे १९७८ / पृ. २४ + ४४४ / २२ + १४ सें. मी. / ४० रु.

पटवर्धनांचे समग्र चरित्र. काही नवीन उपलब्ध, अप्रकाशित साधनसाहित्याच्या आधाराने लिहिलेले. पटवर्धनांच्या वाङ्मयाचाही अनुषंगाने परामर्श. तेरा प्रकरणांत पटवर्धनांच्या समग्र जीवनाचे दर्शन. पटवर्धनांचे लौकिक चरित्र व त्यांचे आंतरिक जीवन यांचे सलग, सुसंगत असे दर्शन घडविण्याचा महत्त्वपूर्ण प्रयत्न.

७. माधव जूलियन : सु. रा. चुनेकर / साहित्य अकादमी, नवी दिल्ली / श्री राजमुद्रा मुद्रणालय, मुंबई २५ / ऑगस्ट १९८० / पृ. ८ + ९९ / २२ + १४ सें. मी. / २ रु. ५० पै.

साहित्य अकादमीच्या ' भारतीय साहित्याचे निर्माते ' मालेतील पुस्तक. पटवर्धनांचे जीवन, काव्य, इतर वाङ्मय यांचा परिचय व परामर्श. प्रामुख्याने अमराठी वाचकांसाठी लेखन.

८. विरहतरंग–एक अभ्यास : डॉ. लीला गोविलकर / प्रभाकर पुस्तकालय, अहमदनगर / [ प्रकाशन-काल नाही; १९८१–? ] / पृ. ५२ / ६ रु.

अगदी सामान्य, एम. ए. च्या विद्यार्थ्यांसाठी लिहिलेले जुजबी पुस्तक. ' प्रभाकराच्या प्रेमात नको तितक्या बायकी वृत्ती शिरल्या आहेत; प्रेयसीची सेवा करण्याची इच्छा करणारा, तिला जीवनाची भवितव्यता मानणारा प्रियकर स्वाभाविक वाटत नाही. ' हा प्रभाकरावरील आक्षेप, एका स्त्रीचा म्हणून लक्षणीय.

९. विरहतरंग : भावे–दाते / अजब पुस्तकालय, कोल्हापूर / [ प्रकाशन काल नाही. ] / पृ. ५१.

' मराठी गाईड '. अतिशय जुजबी, टाकाऊ. इकडची तिकडची हाती लागतील ती शिते गोळा करून तयार केलेले. लेखकांना स्वतःचा कसला समज, जाण नसते. अशी ' गाईडे ' ही शैक्षणिक क्षेत्रातील अपप्रवृत्ती.

% %

## नियतकालिकांचे विशेषांक*

१. **साप्ताहिक मौज** : संपादक द. पु. भागवत, मुंबई / ६ डिसेंबर १९३९ / १। आणा.

२. **साप्ताहिक पूर्णिमा** : संपादक भा. वि. वरेरकर, मुंबई / ९ डिसेंबर १९३९ / १॥ आणा.

३. **सह्याद्रि** : संचालक न. चिं. केळकर, पुणे / जानेवारी १९४०.
लेखांशिवाय या अंकात असलेला मजकूर : ( १ ) अद्वितीय द्वितय–अ. पटवर्धनांची शेवटची कविता ( ' वाटे तुझ्यापाशीं धावतच जावें ' ) ठसा. ब. Doctor of Letters पदवी-प्रमाणपत्राचा ठसा. ( २ ) डॉ. पटवर्धन यांचा जीवनपट, पृ. ९७.

४. **राजारामीयन** : राजाराम कॉलेज, कोल्हापूर, चे नियतकालिक / संपादक दिनकर द. पाटील / फेब्रुवारी १९०४.

या अंकात पटवर्धनांविषयी बराच मजकूर. ' वाटे तुझ्यापाशी धावतच जावे ', कवितेचे पुनर्मुद्रण. वि. बा. पत्कींचा लेख. दोन तीन कविता.

५. **लोकशिक्षण** : संपादक ग. गं. जांभेकर, पुणे / फेब्रुवारी-मार्च १९४०.
पटवर्धनांवर निघालेला महत्त्वाचा विशेषांक. लेखांशिवाय या अंकातील परिशिष्ट-वजा मजकूर : ( १ ) प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन : चरित्राची रूपरेषा. ( २ ) कै. मा. त्र्यं. पटवर्धन यांची जन्मपत्रिका. ( ३ ) प्रो. माधवराव पटवर्धन यांचा लेखनसंभार [ सूची ]–अ. स्वतंत्र प्रकाशन. ब. संयुक्त प्रकाशन. क. प्रो. मा. त्र्यं. पटवर्धन यांचे किरकोळ लेख. ( ४ ) कै. माधवरावांचे हस्ताक्षर–रुग्णशय्येवरून लिहिलेला शेवटचा अभंग ( ' वाटे तुझ्यापाशी धावतच जावे. ' )

६. **ज्योत्स्ना** : संपादक वि. स. खांडेकर, मुंबई / मे १९४०.

७. **प्रतिभा** : संपादक, जगन्नाथ परमानंद मुळे, औरंगाबाद / डिसेंबर १९४७.

---

* या विशेषांकांतील लेखांची सारे लेख-सूचीत योग्य स्थली दिलेली आहेत. त्यामुळे येथे फक्त त्या अंकांच्या नोंदी केलेल्या आहेत.

लेख

## १. आठवणी :

[ माहितीचा क्रम पुढीलप्रमाणे आहे : अनुक्रमांक / लेखाचे नाव / लेखकाचे नाव / प्रकाशनाचे स्थल व काल / पृष्ठ. ]

१. **माझी स्मृति–सुमनांजली** : लीलाबाई पटवर्धन / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ४६–४९.
पटवर्धनांच्या आठवणींतून त्यांच्या उज्ज्वल व्यक्तिमत्त्वाचे घडविलेले भावपूर्ण दर्शन.

२. **काही आठवणी** : सौ. वत्सलाबाई घाटे / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ६७–६९.
पटवर्धनांसंबंधी कौटुंबिक जिव्हाळ्याने सांगितलेल्या आठवणी. त्यांची मुंबईतील अखेरची भेट. आजारपणाची लक्षणे. ठरल्याप्रमाणे कार्यक्रम उरकण्याची शिस्त. निग्रह. उमदा स्वभाव.

३. **आठवणी** : सह्याद्रि, जानेवारी १९४०.
( १ ) के. ना. वाटवे, पृ. ६३, ( २ ) ल. द. दीक्षित, ( ३ ) लीला नणदीकर ( ४ ) गो. कृ. चिरमुले, ( ५ ) रा. बि. म., ( ६ ) दि. रा. जोगळेकर, ( ७ ) नी. शं. नवरे, ( ८ ) लं. बि. काशीकर, ( ९ ) सौ. उमाबाई कानेटकर, ( १० ) मोहन नगरकर.

४. **आठवणी–सप्तक** : नी. शं. नवरे / यशवंत, जानेवारी १९४०.

५. **माधवरावांसंबंधी काही आठवणी** : वि. द. घाटे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ५३१–५३५.
( "दिवस असे होते", पृ. १३२, १३८, १४२, १४३, २५५ यांत यातील सर्व भाग आला आहे. )

६. **अंमळनेरच्या काही स्मृती** : ( १ ) वि. रा. रानडे, पृ. ५३६–५३९. ( २ ) वि. म. घेडेकर, पृ. ५४०–५४३ / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४०.

( १ ) माधवरावांनी पूर्वायुष्यातील प्रसंगांचे केलेले निवेदन ऐकताना शापभ्रष्ट देवदूत आपल्या छळाची कहाणी सांगतो आहे असे वाटले. मराठीकरणाचे वेड. ( २ ) 'सहज स्नेहमंडळा'ची स्थापना. दुर्दम्य तरुण वृत्ती. वेचक शब्दांची पारख.

७. **माधवरावांचा खंबीरपणा** : ना. म. भिडे / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० / पृ. ५४४.

माधवरावांच्या शेवटच्या आजारातील भेटीमधील आठवण.

८. 'ज्योत्स्ना' मे १९४० मध्ये आलेल्या ११ लेखांखेरीज दिलेल्या आठवणी : ( १ ) खंडेराव कुलकर्णी. ( २ ) भ. रा. देशपांडे. ( ३ ) वसंत गं. फणसळकर (डी.लिट्.नंतर राजाराम कॉलेजात सत्कार झाला त्यावेळचा एक गंभीर प्रसंग. महत्त्वाची आठवण ). ( ४ ) र. वि. कुलकर्णी. ( ५ ) अ. रा. शिंदे. ( ६ ) रा. अ. काळेले. ( ७ ) द. ल. कळेकर. ( ८ ) ल. श्री. वैद्य. ( ९ ) कृ. गं. कचवाळे. ( १० ) मो. रा. वाळंबे.

९. **टू एम्. टी. पी.** : वि. ना. लिखिते / सह्याद्रि, जून १९४० / पृ. २१–२२.

आगगाडीत कोणा एका वृद्ध गृहस्थांकडील पटवर्धनांच्या पत्रात 'To M.T.P.' कविता लिहिलेला कागद मिळाला, त्याची आठवण. कागदाच्या शेवटी २७–५–१३ ही तारीख. ( 'टू एम्.टी.पी. कविता बापूराव [श्री.रा.] शिंद्यांचीच आहे.' "आमची अकरा वर्षे", पृ. १११ ).

[ यावर 'सह्याद्रि' जुलै १९४०च्या अंकात वि. पां. नेने यांचा परखड आरोप– ही कविता सर्वांना आधी ज्ञात. लिखित्यांचा फसवणुकीचा ( बुद्धिपुरस्सर ) प्रयत्न.] उद्धृत, "माधव जूलियन", आ. २, पृ. ६७-६८. ]

१०. **'प्रकाशकाचे पान'** : य. गो. जोशी / आमची अकरा वर्षे / २९ नोव्हेंबर १९४५.

य. गो. जोशांचे "श्रीमुखांत" पुस्तक पटवर्धनांनी भेट घेतले नाही. पुढे "नकुलालंकार" भेट दिले. "श्रीमुखांत"ची मागणी.

११. **आणखी काही आठवणी** : लीलाबाई पटवर्धन / रोहिणी, ऑगस्ट १९४७ / व. १ अं. ३/ ४ पृष्ठे.

व्यक्तिदर्शनाच्या दृष्टीने "आमची अकरा वर्षे" पेक्षा अधिक विशेष नाही. ( १ ) अत्रे नि माधवराव संबंध. ( २ ) तात्यासाहेब कोल्हटकरांचा स्नेह. (३) 'रेझरेक्शन' चित्रपट लीलाबाईंना दाखविण्यासाठी मुद्दाम कोल्हापुराहून पुण्याला आले. ( ४ )

काही विक्षिप्त मते : "विरहतरंग"ची नायिका विधवा ठेवली, 'कारण मला स्त्रिया कुंकू लावतात ते आवडत नाही.' असे माधवराव म्हणत. कुंकू न लावणे, स्त्रीने नोकरी करणे, 'लेखिका' होणे त्यांना आवडे. 'सध्याच्या परिस्थितीतील मी माधवरावांना जास्त आवडले असते.' दिनूची मुंज विठ्ठलराव घाट्यांच्या पौरोहित्याने करण्याची इच्छा. मुलीची मुंज लावण्याची इच्छा. 'ते जुन्या मताचे होत चालले होते हे सर्वच बाबतीत खरे नाही.' (५) काही कवितांची पार्श्वभूमी. "नावेतील गाणे', 'येथेच'. (६) माधवरावांचे व्यक्तिमत्त्व. प्रामाणिकपणा, प्रेमळपणा व बुद्धिमत्ता. –थोडे "आमची अकरा वर्षे"बद्दल.

**१२. कै. कवि माधव जूलीयन यांच्या आठवणी :** वि. के. महाबळेश्वरकर/भारती, दिवाळी अंक, १० नोव्हेंबर १९४७/ पृ. ५२–५६.

माधवरावांच्या कवितेने वेड लावलेल्या चाहत्याच्या आठवणी. श्री. के. क्षीरसागरांबरोबर माधवरावांच्या कविता म्हणत सातार्‍याला गेंडा माळावर चांदणी रात्र जागवली. माधवरावांचा साधेपणा; मुसलमान–विरोध; अन्यायाची विलक्षण चीड या वृत्तिविशेषांचे दर्शन.

**१३. काही आठवणी :** लीलाबाई पटवर्धन / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. ३.

(१) माधवरावांच्या पाच कवितांचे बाई आझमबाईंनी केलेले गीतमुद्रण. 'वासन्त-उषा'चे लेखन. (२) शेवटच्या आजारातील प्रसंग, 'Be bold and brave.' (३) माधवरावांचा हळवेपणा. सुधा साडेतीन वर्षांची असताना तिचा पाय मुरगळला तेव्हा दिसलेला.

**१४. माधवराव पटवर्धन (काही स्मृती) :** शं. के. कानेटकर / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. १०–१२.

(१) माधवरावांचा स्वभाव. फटकून वागणे. स्वभाव चिकित्सक. पैसे बुडाले तेव्हाचा प्रसंग. आत्याबाईंचे पैसे फेडले. (२) प्रथम ओळख झाली तेव्हाचे पटवर्धनांचे वर्णन. (३) औपचारिकतेचा अभाव. अधिकारातील अंतराचे भान नाही. (४) दुटप्पी वर्तनाचा राग; प्रो. पंगूंसंबंधी १ डिसेंबर १९३६ चे पत्र. (५) व्यक्तिस्वातंत्र्य व अन्याय यांबाबत झगडा, श्री. के. क्षीरसागरांच्या निमित्ताने. (६) आजारीपणात "नकुलालंकार" impersonal केले. (७) मृत्यूपूर्वी ४–६ दिवस. द. ल. गोखल्यांसंगती मोकळ्या गप्पा, चेष्टाविनोद.

**१५. साहित्यक्षेत्रांतील काही आठवणी :** शं. के. कानेटकर / ज्ञानप्रकाश, दिवाळी अंक, १९५०.

३–४ पृष्ठांचा छोटा लेख. आरंभी गोविंदाग्रज, बालकवि, अनंततनय, रेंदाळकर, दिवाकर यांच्यासंबंधी आठवणी. शेवटी माधवरावांच्या जीवनातील एका प्रसंगाचे निवेदन.–फर्गसन महाविद्यालयाचा राजीनामा दिला त्या दिवसाची आठवण. [ यातील बहुतेक भाग " माधव जूलियन " ( आ. २ ) पृ. १५१–१५२ वर उद्‌धृत. ]

**१६. मला परिचित असलेले कांहीं साहित्यिक** : म. भि. कुलकर्णी / संजय, जून १९५६.

७ ते ९ सप्टेंबर १९३७ या दिवसांत कुरुंदवाडास सरकारी वाड्यातील गणेशोत्सवात काव्यगायन. तेव्हाच्या आठवणी. राजवाड्यात सोय केली असूनही पटवर्धन कुलकर्ण्यांकडे उतरले –जेवताना आग्रह खपत नसे. एक जिन्नस थोडा अधिक वाढला तेव्हा त्यांचा चेहरा रागाने लाल झाला. कुरुंदवाडपासून दोन मैलांवर तेरवाड, तेथून जवळ पंचगंगेकाठी मुक्तेश्वराची समाधी. ती पाहण्यास गेलो.

**१७. कै. माधव ज्युलियन यांच्या काही आठवणी** : प्रि. ग. ह. पाटील / रविवार सकाळ, २९ नोव्हेंबर १९६४.

**१८. देव तेथेचि जाणावा** : वि. स. खांडेकर/ ' राजस ', दिवाळी अंक, १९७५.

पृ. १२– डॉ. रा. ह. भडकमकर यांच्यावरील व्यक्तिलेखात माधवरावांच्या अखेरच्या आजारपणातील आठवण.

## २. व्य क्ति आ णि वा ङ्म य :

**१. माधव जूलियनांचे प्रेमचित्र** : (लेखांक १, २) डॉ. श्री. व्यं. केतकर / विद्यासेवक, जून १९२८ / पृ. ८–१३/ऑगस्ट १९२९ / पृ. २१–२९. ( हे अंक प्रत्यक्षात एका पाठोपाठचे आहेत. व. ५ अं. ३ व व. ५ अं. ५ ) [ समाविष्ट : " डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर : वाङ्मयविषयक लेख ", संपादक गं. दे. खानोलकर / १९७४ / पृ. ९८–१०५; १०६–११६ ]

लेखांक १–१. ( १ ) संस्कृत प्रेमकाव्यातील प्रेमकल्पनांचे विहंगमावलोकन. ( २ ) अ. प्राचीन मराठीतील प्रेमकाव्ये. पंडिती शृंगारकाव्ये. लावण्या. ब. इ. स. १८१८ ते १८५८ मधील मराठीतील प्रेमकाव्ये. या काळात खोट्या सभ्यपणाची बीजे. मोकळ्या मनाची काव्यनिर्मिती नाही. क. इ. स. १८५८ ते १८९८ या काळात संस्कृत काव्यावर पुष्ट झालेली उत्तान शृंगारिक. काव्ये. ड. १८९८ ते १९२८ यात मर्यादशीलपणा आला. इंग्रजी अभिरुचीचे वळण. महाराष्ट्रीय मनोवृत्तीचा प्रेमकाव्याच्या स्वरूपावर परिणाम. समाजपरिस्थितीचा परिणाम. २. " विरहतरंगा "चे–वैशिष्ट्य.

( १ ) त्याच्यावरही लोकांच्या शृंगारविषयक असमाधानकारक वृत्तीचे दडपण. ( २ ) नायकाच्या अनुनयाचे स्वरूप. पुरुषप्रेमाइतके स्त्रीप्रेमाचे चित्र सुंदर नाही.

–लेखांक २—( ३ ) "विरहतरंगा"तील नायक–नायिका संबंध कृत्रिम वाटतात. नायिकेच्या मानसिक परिवर्तनाची संगती न लागल्याने अस्वाभाविकता आली आहे. ( ४ ) नायिका नायकाच्या खोलीत, तो अस्वस्थ असता त्याचे चुंबन घेते हा प्रसंग अस्वाभाविक. ( ५ ) नायक-नायिकेचे बिनसले कोठे हे समजत नाही.—आपला भाव लपविण्याच्या कवीच्या धडपडीतून हे दोष आले असावेत. ( ६ ) शेवटचे चार श्लोक गाळल्यास स्वाभाविकता येईल.–नायिकेच्या वृत्तीची एक संभवनीय मीमांसा. ३. "सुधारक". ( १ ) "सुधारक" नाव अयोग्य. "उद्धारक" योग्य. ( २ ) महाकाव्य नव्हे. ( ३ ) विषयाची व्यापकता अल्प. ( ४ ) सरला, श्यामा इ. स्त्रीपात्रे. ( ५ ) वासूचे चित्र उदात्त न दिसता त्राग्याचे दिसते.

**२. कवि 'माधव जूलियन' यांची कविता :** ( परीक्षणात्मक लेख. ) गोपीनाथ गणेश तळवलकर / यशवन्त, सप्टेंबर १९२९ / पृ. ३३–४५.

सामान्य, विस्तृत लेख. गोविंदाग्रजांच्या अनुयायांतील अनिष्ट अनुकरणाला माधव जूलियनांनी प्रतिबंध केला. त्यांच्या काव्यात व्यापकता. प्रेम, अनुकंपा, समतावाद, राष्ट्रवाद या चार तत्त्वांवर त्यांच्या काव्याची उभारणी झाली आहे.

**३. माधव जूलियन :** गं. दे. खानोलकर / साप्ता. प्रगती, २३ जानेवारी १९३० / ३॥ स्तंभ.

'विद्यमान साहित्यसेवकांस अनावृत पत्रे' या पत्रमालेतील तिसरे पत्र. माधवरावांशी निकट परिचित, त्यांच्याविषयी आदर असणाऱ्या, वयाने लहान असणाऱ्या स्नेह्याने अत्यंत गौरवाने लिहिलेले पत्र. ( १ ) माधवरावांवरील तत्कालीन बेसुमार टीकेचा स्पष्ट संदर्भ. टीकेच्या संकटाच्या वादळातही आपण निर्भयपणे, निर्धाराने शिखर गाठलेत. ( २ ) आपल्या स्फुट कवितेने मराठी कवितेला वळण लावले. ( ३ ) "विरहतरंगा"चा झालेला गौरव. त्यातील अवतरणे. ( ४ ) "सुधारक"चा परिचय. ( ५ ) "फार्सी–मराठी–कोश", "छन्दोरचना" या कर्तृत्वाचे गुणगान. ( ६ ) आपल्याकडून अपेक्षा. – 'आपल्या विचारांवर नियतिवादाची छाया कित्येकदा बरीच पसरलेली दिसते.' कित्येकदा नैराश्याचे आक्रमण एवढे होते की, त्यात ध्येय, आशा गडप होतात. "सुधारक", त्यातील तरलेचे चित्र त्यामुळे असे प्रवाहपतित झाले आहे.

**४. प्रो. मा. त्रिं. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन :** गं. दे. खानोलकर / 'प्रतिभा' पाक्षिक, ३० जानेवारी १९३३.

५. **माधव जूलियन : स्वभावचित्र २** रे. गोपाळ गंगाधर पोतदार, एम्. ए., एल्. टी. / नवजीवन, मे १९३४ ( व. ३ अं. ५ ) / पृ. २७–२९.

गौरवपर परिचय.

६. **गडकरी व प्रो. माधवराव पटवर्धन :** रामशास्त्री [ वा. ना. देशपांडे ]/ प्रतिभा, २३ ऑगस्ट १९३५.

७. **माधवज्युलियन :** श्री. के.क्षीरसागर / 'लोकशिक्षण', ऑक्टोबर १९३६. [ समाविष्ट : "व्यक्ति आणि वाङ्मय" / श्री. के. क्षीरसागर / १९३७ / पृ. ६४–७३ ].

पटवर्धन महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले त्यानिमित्ताने. माधवरावांवर भरपूर लिहिले गेले असले, टीका झाल्या असल्या तरी त्यात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा यथार्थ बोध होणार नाही. माधवरावांचे व्यक्तिगत स्वभावविशेष, त्यांच्या कर्तृत्वाची अंगे यासंबंधी गौरवपर लेख. पण त्यात डोळसपणा. त्यांच्या मर्यादा व वैगुण्ये. सद्यःस्थितीतील माधवरावांचा मोठेपणा मान्य, पण त्यांच्या अधिक विकासाच्या आड त्यांच्या स्वाभाविक प्रवृत्तीच्या मर्यादा.—( १ ) ते बहुगुणी आहेत, पण त्या गुणांतही परस्परविरोध. संमिश्र व्यक्तिमत्त्व. ( २ ) त्यांच्या वाङ्मयकर्तृत्वाचा आरंभ. त्यांच्या लेखनात प्रतिबिंबित होणारे चित्ताकर्षक व्यक्तिमत्त्व. कवी, तसे पंडित, संशोधक. ( ३ ) परिचयात दिसणारे स्वभावविशेष—अर्भकासारखा सरळ स्वभाव. संभाषण-कला. सहृदयता. वक्तृत्व—त्यातील विशेष. 'समाजसुधारकाची भूमिका हीच त्यांची सर्वांत अलिकडची खरी भूमिका'. ( ४ ) त्यांचे प्रसिद्ध नसणारे गुणविशेष—गणित, इंग्रजी यांवरील प्रभुत्व. ( ५ ) त्यांची मर्यादा व वैगुण्ये. 'काव्यशक्तीस त्यांच्या भाषाविषयक एकान्तिक मतांनी मर्यादित केले आहे.' wrong emphasis-अस्थानी, गौण गोष्टींवर जोर. 'आजकाल माधवरावांस हिंदु संस्कृतीच्या व हिंदु जातीच्या रक्षणाविषयी विशेष तळमळ लागून राहिली आहे.'

८. **म. सा. संमेलन, जळगावच्या अध्यक्षपदासाठी वाद :** य. ना. टिपणीस, ज. र. आजगावकर / 'मौज', २८ ऑक्टोबर १९३६, मध्ये भा. वि. वरेरकरांची मुलाखत / 'निर्भीड', अ. ह. गद्रे, 'ज्योत्स्ना', :डिसेंबर १९३६ / अध्यक्षीय भाषणावर टीका.

९. **प्रो. माधवराव पटवर्धन :** एक चाहता / 'संजीवनी, नोव्हेंबर १९३६, २॥ पृष्ठे.

सर्वसाधारण परिचयपर, दुरून लिहिलेला लेख.

१०. Prof. M. T. Patwardhan : K. D. Pednekar, M.A./Vidyapeeth Patrika, कोल्हापूर / २॥ पृष्ठे.

थोडा प्रासंगिक. ना. सी. फडके व पटवर्धन यांतील अंतर.–पटवर्धनांचे शब्दचित्र. त्यांचे वैशिष्ट्य. शैलीबरोबर उद्बोधक तुलना. पटवर्धनांची परिश्रमशीलता.

**११. जळगाव साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष प्रो. माधवराव पटवर्धन :** ग. त्र्यं. माडखोलकर / ज्योत्स्ना, नोव्हेंबर १९३६ / २–२। पृष्ठे.

फारसा गौरवपर नव्हे. ( १ ) भा. वि. वरेरकर, रियासतकार सरदेसाई, कवि तांबे यांना अन्याय. ( २ ) पटवर्धनांचे अकालवार्धक्य. ( ३ ) वाङ्मयक्षेत्रातील त्यांची मुख्य भूमिका कवीची असली, तरी पार्श्वभूमी मात्र पांडित्याची आहे. ( ४ ) "सुधारक" नंतर स्वतंत्र कृती नाही. ( ५ ) टीकालेखन. त्यांच्या पृथक्करण-पद्धतीवर टीका. ( ६ ) भाषाशुद्धीवर टीका. पटवर्धनांच्या बौद्धिक, राजकीय, सामाजिक, धार्मिक विचारसरणीवर टीका.

**१२. जीविताशी समरस होणारा कवि माधव जूलियन :** शं. के. कानेटकर ज्योत्स्ना, नोव्हेंबर १९३६ / ३॥ पृष्ठे.

वाङ्मयीन आठवणी. 'भितो मी तुझ्या चुम्बनाते', 'खरा शूर', 'रसिकास', 'आत्मनिवेदन', 'हाकाटी', 'सर्वस्वाचा यज्ञयाग' या कवितांविषयी आठवणी.– मुलांविषयी कविता.–बहुरंगी विनोद.–माधवरावांचे पंचहत्यारीपण.–पायाशुद्ध विचारसरणी.

**१३. जळगाव साहित्य संमेलन :** वि. भि. कोलते / वऱ्हाड शालापत्रक, नोव्हेंबर १९३६ / पृ. ३६४–३७१ [ म. नि. ]

**१४. जळगावचे साहित्य संमेलन :** चिं. वि. जोशी / सहविचार, डिसेंबर १९३६ / पृ. २९–३२. [ म. नि. ]

**१५. यंदाचे जळगाव येथील साहित्य संमेलन :** अप्पा पेंडसे / कलादर्श, डिसेंबर १९३६ / पृ. ५१–५२ [ म. नि. ]

**१६. एकविसावे महाराष्ट्र साहित्य संमेलन :** शं.दा. पेंडसे / लोकशिक्षण, डिसेंब १९३६ / पृ. ४२४–४३३.

**१७. साहित्य सोहळ्यांतील जळगावी भजी :** ( विनोदी वृत्तांत ) मुक्ताप्पा / ज्योत्स्ना, डिसेंबर १९३६ / पृ. ६५–६८. [ म. नि. ]

**१८. जळगाव येथील एकविसाव्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाची फलश्रुती :** समीक्षक / यशवंत, डिसेंबर १९३६ / पृ.१६ [ म. नि. ]

**१९. ( प्रो. ) माधव त्र्यंबक पटवर्धन :** महाराष्ट्र-परिचय, डिसेंबर १९३६ / पृ. १४. [ म. नि. ]

२०. **कवितेचे छन्दान्तर आणि त्याचे समर्थन** : बा. भ. बोरकर / ज्योत्स्ना, व. १, अं. १२, एप्रिल १९३७ / पृ. ४६–४९. [ म. नि. ]

माधव जूलियनांच्या परिष्करणाविषयी.

२०. अ. **पटवर्धन व त्यांचे काही टीकाकार** : रा. चिं. श्रीखंडे / ज्योत्स्ना, व. २ अं. १, मे १९३७ / पृ. ५८–६३.

'मी व माझे टीकाकार' ( ज्योत्स्ना, एप्रिल १९३७ ) या पटवर्धनांच्या लेखावर प्रतिवाद–[ पहा, पटवर्धन-वाङ्मय, क्र. व. ६ ]

२१- **संपादकीय** : ( प्रा. माधवराव पटवर्धन यांचा सन्मान ) : मो. शा. डाहाणे / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९३९ / पृ. २२.

पटवर्धनांना डी. लिट्. मिळाली त्याबद्दल अभिनंदन. डी. लिट्. बादळाचे पडसाद. पटवर्धनांच्या चाहत्यांना पदवीप्राप्तीच्या बाबतीत काय निर्णय होईल याबद्दल धाकधूकच वाटत होती. 'पण अतिस्नेहामुळे उद्‌भवलेले हे संकट पंगू पडले.'

२२. **मराठीचे पहिले डी. लिट्. प्रो. माधवराव पटवर्धन यांचा अल्प परिचय** : वि. बा. पत्की, एम्. ए. / 'मनोहर', फेब्रुवारी १९३९. भरपूर चांगली, जुनी छायाचित्रे.

( १ ) आठवणी व चरित्र. १९११ तील आठवण—'तू कसल्या कविता लिहितोस ?' चौथ्या–पाचव्या वर्षी आई प्लेगने आजारी.—१९०६ त हात मोडल्यावेळची आठवण. स्वकृत पहिले पद्य.–१९०९ च्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील आठवण. ( २ ) माडखोलकरांचे उद्‌गार.—काणेकरांना उत्तर.—'काव्य म्हणजे सांकेतिक डायरी पाहिजे' असे ते म्हणत. ( ३ ) 'प्रो०' खोडल्याची आठवण.— "सुधारक"ची प्रेरणा.

२३. **डॉ. माधव त्र्यंबक पटवर्धन, एम्. ए., डी. लिट्. (परिचय)** : वि. बा. पत्की, एम्. ए. / 'राजारामीयन', फेब्रुवारी १९३९.

२४. **डॉ. प्रो. माधवराव पटवर्धन, एम्. ए., डी. लिट्**; (अनाम=गं.भा.निरंतर) वाङ्मयशोभा, जुलै १९३९.

प्रेमादरपूर्वक लिहिलेला व्यक्तिपरिचयात्मक लेख. व्यक्तिगत लकबा, मूर्तिवर्णन, स्वभावविशेष, आणि त्यांवर सौम्य मतप्रदर्शन. पोशाखाबाबत कटाक्ष नाही. खासगी संभाषणात एखादी खांडेकरी कोटी. मतांविषयी दृढ, पण त्यात चीड नाही. प्रतिपक्षाला आपली मते पटविण्याचा अट्टाहास. 'चिकाटीवाई ! तुमचे नाव माधवराव'. "छंदोरचने"ची काही माहिती मिळविण्यासाठी भर दुपारी ४/५ मैल सायकल मारून

आले. ' शरीरासाठी न थांबणारे मन '. कवित्वापेक्षा विद्वत्त्व अधिक. बुद्धिप्रधान' संस्करणाबद्दलच्या मित्रांच्या कुरकुरीकडे लक्ष देत नाहीत. पूर्णपणे व्यावहारिक. ' व्यवहारनिष्ठुर समजले जातात. ' हितशत्रूचा पाठपुरावा. ग्रंथप्रकाशनाबाबत इतका काटेतोल लेखक प्रकाशकांनी पाहिला नसेल.–एका विद्वान प्रोफेसराला खडसावले.– कवितेचे पुस्तक आधी रुपया देऊन प्रकाशकमित्राकडून विकत घेतले.–' चहाची पद्धत मोडली पाहिजे. '–त्यांनी व्यावहारिक जीवनास इतकी सलगी करू देऊ नये.– डॉ. माधवराव म्हणजे थोडे जास्त भाग्यवान केतकर.

२५. **व्यावहारिक ज्ञानकोश** : ( भा. ४ था ). मुख्य संपादक ग. रं. भिडे / १ ऑक्टोबर १९३९.

पृ. ११६५ वर मा. त्र्यं. पटवर्धनांचे त्रोटक चरित्र.

२६. **माधवराव पटवर्धन** : ( अनाम ) ध्रुव, व. ५ अं. ९, डिसेंबर १९३९ / पृ. ५५५–५६.

२७. **माधव जूलियन** : प्रभुप्रभात, व. १७ अं. १०, डिसेंबर १९३९ / पृ.१३–१४. [ म. नि. ]

२८. **कै.माधव ज्यूलियन** : चित्रा, ३ डिसेंबर १९३९/स्फुट. श्रद्धांजलि. सामान्य. काही चुका, अपुरेपणा.

२९. **कै.डॉ.माधवराव पटवर्धन** : विविधवृत्त, डिसेंबर १९३९ / स्फुट. श्रद्धांजलि.

३०. **पं. क. डॉ. मा. त्र्यं. पटवर्धन** : मौज, ६ डिसेंबर १९३९. संपादकीय. श्रद्धांजलि.

३१. **डॉ. माधवराव पटवर्धन** : श्री. रा. टिकेकर/मौज, ६ डिसेंबर १९३९/पृ. ६. गुणगौरवपर लेख. ' नमुनेदार उमदा मित्र '. मत्सरग्रस्त नव्हते. उदार मन.

३२. **अश्रूंची ओंजळ** : स. अ. शुक्ल / मौज, ६ डिसेंबर १९३९ / पृ. ७.

काही वैयक्तिक आठवणी. भावपूर्ण गौरव.

३३. **माधव जूलियन यांची शेवटची कविता** : अनंत अंतरकर / मौज, ६ डिसेंबर १९३९ / पृ. १४.

भावपूर्ण आदरांजलि. ' रामद्वारीं ' कवितेसंबंधी आवड व्यक्त केली आहे.

३४. **" ऐकिव तव मधुबोल ! "** जी. एन्. जोशी / मौज, ६ डिसेंबर १९३९ / पृ. १५.

माधवरावांच्या मित्रपरिवारातील चाहत्याने वाहिलेली श्रद्धांजली. १९३२ साली

शांताबाई कशाळकरांकडे माधवरावांचा पहिला परिचय. जोशांनी ध्वनिमुद्रित केलेल्या माधवरावांच्या 'प्रेम कोणीही करीना', 'संगमोत्सुक डोह', 'ऐकिव तव मधुबोल' कवितांची माहिती.

३५. **क्रांतिकारक कवि !** : ग. त्र्यं. माडखोलकर / मौज, ६ डिसेंबर १९३९ / पृ. १८

अत्यंत गौरवपर लेख. मराठी कवींत अग्रपुजेचा मान. काव्यात क्रांतिकारकता. रविकिरण मंडळाच्या कर्तबगारीचे, यशाचे बव्हंशी श्रेय त्यांनाच. क्रांतिदर्शी कवित्व.

३६. **डॉक्टर माधव जूलियन !** : श्री. बा. रानडे / मौज, ६ डिसेंबर १९३९ / छोटा लेख.

पूर्वपरंपरागत संकेतांपेक्षा जिवंत मनोव्यापाराकडे त्यांचा अधिक ओढा. बंडखोर मनोवृत्ती. सुधारणेची तळमळ. जाज्वल्य देशभाषाभिमान.

३७. **मराठी वाङ्मयाचे एकाकी शिलेदार** : श्री बा.रानडे / धनुर्धारी, ९ डिसेंबर १९३९ छोटा लेख.

माधव जूलियनांमध्ये क्षात्रवृत्ती व काव्य यांचा मिलाफ. आयुष्यात त्या त्या काळी लोकविरुद्ध विचारसरणीमुळे एक विरुद्ध अनेक अशा परिस्थितीत माधवराव झगडले. अनेकदा पाडाव झाला तरी तत्त्वे सोडली नाहीत. अन्यायाची चीड, स्वमताचा अभिमान, सत्यवक्तेपणा.

३८. **(डॉ.) माधवराव पटवर्धन** : ( श्रद्धांजलि ) 'मनोहर' व. ६ अं. ७०, डिसेंबर १९३९/ पृ. ५ [ म. नि. ]

३९. **माधवरावांचा अंमळनेर येथील अज्ञातवास** : एक शिष्य ( अंमळनेर ) / पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९. [ शेवटी टीप '' 'कॉंग्रेस' पत्रावरून' ]

सामान्य लेख. नवीन नाही.

४०. **माधव ज्यूलियन यांच्या काही काव्यांच्या जन्मकथा** : शं. के. कानेटकर / पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९, व. १ अं. ११.

( १ ) "विरहतरंग", ( २ ) "सुधारक", ( ३ ) "तुटलेले दुवे", ( ४ ) रुबाया व "द्राक्षकन्या", ( ५ ) "नकुलालंकार" यांच्याविषयी थोडी माहिती. त्रोटक, वरवरचा लेख. नवीन नाही.

४१. **माझे थोर मित्र माधवराव** : गंगाधरराव खानोलकर / पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९, व. १ अं. ११.

पटवर्धनांनी खानोलकरांना अंमळनेरहून पाठवलेली दोन पत्रे उद्धृत. त्यांचा

उपयोग " माधव जूलियन " मध्ये खानोलकरांनी केलेला आहे. पहिल्या भेटीचे वृत्त. (" आमचीं अकरा वर्षे " पृ. ११७-११९ वर आलेले ) पत्र, १-१३ जुलै १९२५ : '...मी एक दुबळ्या मनाचा...कुली...' रानडे, यशवंत, घाटे, गोखले यांच्याविषयी गौरवोद्गार. -' टोसर ' काव्याचा उल्लेख. पत्र २, २७ ऑगस्ट १९२५ : यातील बहुतेक भाग " माधव जूलियन ", पृ. ११४ ते ११६वर उद्धृत.

४२. **माधव ज्यूलियनांची पिवळी जुनी कविता वही :** श्री. बा. रानडे / पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९.

छोटा लेख. यातील बहुतेक भाग " आमची अकरा वर्षे ", पृ. ११४ ते ११६वर उद्धृत. माधवरावांची-श्री.बा.रानड्यांची पहिली ओळख. महाराष्ट्र शारदा मंदिरातील बैठकी. -माधवरावांनी वाचावयास दिलेली ' कविता-वही '. माधवरावांच्या कवितांचे शारदा मंदिरात वाचन.

४३. **डॉ. पटवर्धन यांचे वैशिष्ट्य :** ग. त्र्यं. माडखोलकर / पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९.

छोटा लेख. पटवर्धनांची वैशिष्ट्ये दाखवणारे तीन प्रसंग : ( १ ) लो. टिळकांना द्यावयाच्या मानपत्रप्रसंगी विरोध. ( २ ) फर्गसन महाविद्यालय सोडण्याच्या वेळचे धैर्य. ( ३ ) ' प्रो. ' खोडल्याने ' डॉ. ' लावण्याची ईर्ष्या. -त्यांच्या वाङ्मयाविषयी गौरवोद्गार. संघर्ष-अनुभूती यातून व्यापक, सकस जीवनविषयक तत्त्वज्ञान. वाङ्मयात त्याचे प्रतिबिंब. या बंडखोरपणामुळे समकालीनात प्रभावी.

४४. **माधव जूलियन स्मृति :** माधव मनोहर / (१) पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९. विशेष नाही. माधव जूलियनांच्या पहिल्या भेटीचे निवेदन. त्यापूर्वीची मनःस्थिती. ठराविक पद्धतीचा गौरवपर लेख.

( २ ) पूर्णिमा, १६ डिसेंबर १९३९ / पृ. २३-२४.

माधवराव : व्यक्ति व व्यक्तिमत्त्व यांविषयी अत्यंत आदराने, जिव्हाळ्याने लिहिलेला लेख. आठवणी.

४५. **कै. डॉ. माधव त्र्यंबक पटवर्धन, एम्. ए., डी. लिट.-व्यक्ति व वाङ्मय :** कृ. पां. कुलकर्णी / विविधवृत्त, १० डिसेंबर १९३९.

[ समाविष्ट : " वाग्यज्ञ ", लेखसंग्रह, कृ. पां. कुलकर्णी / ऑक्टोबर १९५२. त्यातील लेखाचा पूर्वार्ध, पृ० ११८—१२४, १३० ].

चांगला, प्रमुख लेख. ध्येयवादी लेखक. व्यक्तिगत उमदेपणा. माधव जूलियन युग. चिरंतन तत्त्वांचे आविष्करण. काव्यपरिचय. संशोधनकार्य. मराठीचे वेदांगकार. भाषाशुद्धि. मराठीचे जगन्नाथपंडित.

४६. **श्रद्धांजलि** : चित्रमयजगत्, जानेवारी १९४०.

त्यांच्या चरित्रामागे एका व्यक्तीची आपल्या व्यक्तित्वासाठी चाललेली अखंड धडपड आहे. –" विरहतरंगा "वर वगैरे त्यांच्या प्रसिद्धीच्या काळात बेछूट टीका झाली. –तरुण कवीने तरुण मनासाठी लिहिलेले ते काव्य. बेडर झुंजार वृत्ती. – डी. लिट्. प्रकरणी काहींनी पंगू करण्याचा प्रयत्न केला, पण तेच पंगू झाले. – " नकुलालंकार "वर त्यांच्याच एका मित्राचे एका प्रसिद्ध साप्ताहिकात परीक्षण १॥ ओळीचे. त्याने ते सद्गदित झाले.

४७. **कै. डॉ. माधवराव पटवर्धन** : दा. पां. रानडे / चित्रमयजगत्, जानेवारी १९४० / पृ. ५२ [ म. नि. ]

४८. **कै. डॉ. माधवराव पटवर्धन यांजविषयी आम्हास काय पाहिजे** : वाङ्मय-शोभा, जानेवारी १९४०.

माधवरावांचे घराणे, बालपण, शिक्षण, पौगंडावस्था व तारुण्य, महाविद्यालयातील विद्याभ्यास; डे. ए. सोसायटीतील आगमन, तेथील वैचारिक जीवन, राजीनामा–प्रकरण; खानदेशातील जीवन; भावे स्कूलमधील काळ; राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर वास्तव्य; खाजगी जीवन; वाङ्मयीन योजना, कार्यपद्धती, आकांक्षा यांसबंधी कुणी काय लिहावे याविषयी चरित्रग्रंथ पूर्ण करण्याच्या दृष्टीने अपेक्षा व्यक्त करणारे स्फुट.

४९. **( माधवरावांवरील अंत्यलेख )** : डॉ. रा. चिं. श्रीखंडे / यशवंत, जानेवारी १९४०.

माधवरावांशी प्रथम परिचय १९३० मध्ये. " स्वप्नरञ्जन "च्या परीक्षणासंबंधी उल्लेख. –माधवराव भेटीस आलेल्या पुस्तकांपैकी काही श्रीखंड्यांना देत. ' श्याम-लेस 'चा आस्वाद घेत. " चंद्रिके "ची प्रत- त्यावर मार्मिक संस्कृत सुभाषित–पृष्ठ. श्रीखंडे यांच्या स्वतःच्या रोजनिशीतील दोन उतारे. माधवरावांच्या ' शूर्पणखे 'वरील निबंधातील कवितेचे शोकपर्यवसान मान्य नाही. " विरहतरंगा "च्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळी पहिल्या आवृत्तीतील अशुद्धे शोधण्यास श्रीखंड्यांना सांगितले. — १९३५–३६ची थोरल्या महाराजांच्या पुण्यतिथीची आठवण. अनुष्टुभाची मोहिनी. "नकुलालंकारा"वरील ' केसरी 'तील अत्यंत प्रतिकूल परीक्षणासंबंधी पटवर्धन म्हणत, ' त्या परीक्षकाला माझी भूमिका समजली नाही.'–' ज्ञानप्रकाशा 'त " सुधारका "वर माधवरावांनी स्वतःच परीक्षण लिहिले.

५०. **माधवरावांचे मरण** : सौ. विमल भावे / यशवंत, जानेवारी १९४०.

पोकळ मोठेपणा, बोजडपणा पत्करून लिहिलेला लेख. दुर्बोध. ' प्रश्नचिन्हास '

कविता [ " उमरखय्यामकृत रुबाया "च्या आरंभीची '? स' ] मित्राला उद्देशून.

५१. 'ते दिलखुलास हसणे!' : य. गो. जोशी / यशवंत, जानेवारी १९४०.

आठवणी, परिचयकथन. 'काव्यापेक्षा मनमोकळे दिलखुलास हसणे विशेष आवडे मला त्यांचे.' त्याची आठवण. –'गेल्या सुटीत कोल्हापूरला जाण्यापूर्वी माझ्याकडे २/४ तासांची बैठक झाली. प्रथमच. पुन्हा दुसऱ्या दिवशी आले. मी कामात होतो. दोन मिनिटांनी निरोप घेऊन निघाले. अखेर चहा घेऊन गेले.'

५२. कै. डॉ. माधवराव पटवर्धन, एम्. ए., डी. लिट्. : ना. गो. चापेकर / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९४० ( व. १३ अं. १ ) / दोन पृष्ठे.

सामान्य मृत्युलेख. ( १ ) माधवरावांचा गुणगौरव. ( २ ) महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारिणीतील त्यांचे कार्य. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'चे संपादक असतानाही चिंतोपंत कर्व्यांचे त्यांना फार साहाय्य. ( ३ ) ते भावनाप्रधान, पण हाडाने सनातनीच.—व्यवहारदक्ष होते.

५३. 'अश्रु-मुक्ता-माला' : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९४०/पृ. ४–७.

ग. त्र्यं. माडखोलकर ( पूर्णिमा ), अरुण ( आशा ), द. ल. गोखले ( सह्याद्रि ), कु. पां. कुलकर्णी ( विविधवृत्त ), अनाम ( ध्रुव ), वत्सलाबाई घाटे ( सह्याद्रि ), श्री. बा. रानडे ( सह्याद्रि ), विठ्ठलराव घाटे ( सह्याद्रि ), लीलाबाई पटवर्धन (सह्याद्रि) यांच्या कंसात, निर्देशिलेल्या नियतकालिकांतील लेखांतील उताऱ्यांचे संकलन.

५४. माधवराव पटवर्धन : रघुवीर सामंत / 'ज्योति', जानेवारी १९४०, व. १, अं. १ / पृ. ५-६. [ म. नि. ]

५४. अ. कै. डॉ. माधवराव पटवर्धन ( पुण्यस्मरण ) : गो. वि. नामजोशी / 'प्राथमिक शिक्षण', जानेवारी १९४०, व. १२, अं. १० / पृ. ४६३–४६६. [ म. नि. ]

५५. माझा बालमित्र गेला! : विठ्ठलराव घाटे / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ५०–५४. ( १३ डिसेंबर १९३९ ला केलेले मुंबई नभोवाणीवरील भाषण )

अनेक मित्रांच्या सूचनेवरून केलेले माधवरावांच्या चरित्रातील एका महत्त्वाच्या प्रसंगाविषयी सत्यकथन.—माधवरावांचे व्यक्तिदर्शन, स्वभावदर्शन, माधवरावांच्या काव्याचे वैशिष्ट्य.—फर्गसन महाविद्यालय प्रकरणाला कारण झालेल्या वरदा—माधवराव संबंधाबाबत निवेदन.—माधवरावांचे जीवन व त्यांचे काव्य यांच्या संबंधाचे विश्लेषण.

५६. माधव जूलियन : नावाचे कूळ व कवितांचे मूळ : गंगाधरराव खानोलकर / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ५५–५७.

(१) ' माधव जूलियन ' नावाचे मूळ कशात आहे ते सांगणारे पत्र. (२) माधवरावांच्या काही कवितांच्या मूळासंबंधीचे विपर्यस्त समज. त्यांचे निराकरण. [ या लेखात एक चूक. ' सहधर्मिणीस ', गज्जलाञ्जलि, क्र. २५, मनोरमाबाई रानडे यांच्या मृत्यूनंतर लिहिलेला गज्जल असे यात म्हटले आहे. पण मनोरमाबाईंचा मृत्यू १३ जानेवारी १९२६, प्रस्तुत गज्जलाचा लेखनकाल १९ जून १९२३. " मधु-माधवा "त प्रकाशित. ]

**५७. गुरुवर्य डॉ. माधवराव पटवर्धन :** गोपीनाथ तळवलकर / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ५८–६०.

त्या वेळच्या तरुण मनाचा प्रातिनिधिक लेख. (१) प्रेमकाव्य माधवरावांचे आत्मिक वैशिष्ट्य. (२) माधवरावांवरील प्रतिगामीपणाच्या आक्षेपाला उत्तर. त्यांची सामाजिक, राजकीय वृत्ती.

**५८. माधव जूलियन आणि मुले :** श्री. बा. रानडे / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ६१–६३.

मुलांच्या कार्यक्रमात, ११ डिसेंबर १९३९ ला, मुंबई आकाशवाणीवर केलेले भाषण. मुलांसाठी माधवरावांच्या कवितांची ओळख.

**५९. माधव जूलियन यांच्या स्त्रीजातीविषयी भावना :** सौ. शालिनीबाई रानडे / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ६४–६६. [ मुंबई नभोवाणी भाषण, १४ डिसेंबर १९३९ ].

' महाराष्ट्रीय स्त्रियांचे उज्ज्वल अंतरंग आपल्या उदार मनाने सर्वांना पटवून देणारा एकमेव जातिवंत लेखक. '

**६०. माधवराव–प्रेम आणि मरण :** श्री. के. क्षीरसागर / सह्याद्रि, जानेवारी १९४० / लेखन २२ डिसेंबर १९३९ / ३॥ पृष्ठे.

आठवणीवजा लेख. पण त्यातून माधवरावांच्या स्वभावविशेषांचे दर्शन घडवण्याचा प्रयत्न. भाष्य. यानंतरचा ' लोकशिक्षण 'मधील ' तरुण माधवरावांची दुःखे ' आणि प्रस्तुत लेख परस्परपूरक. या लेखाचा त्या लेखात विकास आहे. यात वैयक्तिक जिव्हाळा आहे, तसे, सत्यशोधनाचे प्रयत्न आहेत. निव्वळ निवेदन नव्हे, तर मीमांसेचा प्रयत्न. (१) १९२४ त प्रथम परिचय. (२) माधव जूलियनपासून स्वतःचा मराठी काव्यवाचनास आरंभ. (३) परिचय–विकास. (४) भाषाशुद्धिवादातील आठवण. I have made a painter. (५) अखेरपर्यंत प्रचलित वादाचे महत्त्व त्यांस मला पटविता आले नाही. (६) जून १९३९ तील ' नकुलालंकारा 'च्या प्रसंगाने आठवण ( त्याचे बरेचसे हस्तलिखित १९३३ की ३६ सालीच तयार ).

एक आठवण. स्नेह्याकडे उतरण्यासंबंधी. त्यातून स्वभावदर्शन. ( ८ ) स्त्रिया आणि लोकापवाद यांच्याबाबत वास्तववादी दृष्टिकोण त्यांस अखेरपर्यंत आला नाही. रविकिरण मंडळाच्या प्रमुख सदस्यांचे उसाशांचे शास्त्र! ( ९ ) त्यांच्या योग्यतेच्या मनुष्याने फी भरून डॉक्टरेट मिळविणे अपमानच. (१०) अखिल भारतीय कीर्ती मिळविण्यासारखा हा पंडित क्षुद्र समकालीनांत सामील होण्यास उत्सुक असे!—आणखी काही ओझरते वैयक्तिक निर्देश. अखेर गौरवपूर्ण उद्‌गार. 'तारुण्यात त्यांनी आम्हांस प्रेम शिकवले.' 'आमचा कप्तान गेला!'

६१. **वाङ्मयक्षेत्रातील थोर विभूती :** द. ल. गोखले / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ७८–७९.

माधवरावांच्या अखेरच्या आजारातील आठवण.—ऐहिक देहाच्या मरणप्रसंगी जसे बेगुमान धैर्य व विनोदवृत्ती दाखविली तशीच मोठ्या सार्वजनिक गंडांतराच्या वेळीही दाखविली.—माधवरावांची पहिली ओळख.—'भावना, भाषा, विचार, अलंकार, छंद अशा सर्व बाजूंनी मराठी काव्यात त्यांची कामगिरी महनीय आहे.'

६२. **कविवर्य माधव जूलियन :** रा. श्री. जोग / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ ८१–८७.

माधवरावांच्या काव्यप्रकाशनाच्या वेळची आरंभीची वाचकांची प्रतिक्रिया फारशी अनुकूल नाही. पुढे त्यात बदल होत गेला.—स्फुट काव्य, शिशुकाव्य यांचे विवेचन. गूढगुञ्जनाचा अभाव.—"विरहतरङ्ग" आणि "मेघदूत".—"तुटलेले दुवे". —"सुधारक".—"नकुलालङ्कार".—रुबायांची भाषांतरे.—यांचे विवेचन. —पटवर्धनांच्या काव्येतर लेखनाचा परामर्श.—जगन्नाथपंडितांशी तुलना.—मराठी कवितेकरिता काय केले?—गेल्या वीस वर्षांतील मराठी काव्यात त्यांचे स्थान पहिले आहे.

६३. **डॉ. पटवर्धन यांचे तीन विशेष :** ग. त्र्यं. माडखोलकर / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ८८. [ समाविष्ट : "माझे आवडते कवि", ग. त्र्यं. माडखोलकर / जून १९६५ / पृ. २४५–२४८ ]

माधवरावांच्या स्वभावाचे तीन विशेष : ( १ ) चिकाटी, ( २ ) स्वत्वाची विलक्षण चाड, ( ३ ) मतपरिवर्तनशीलता.

६४. **कोल्हापूरातील जीवन :** द. सी. पंगू / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ८९–९३.

माधवरावांचे कोल्हापूरातील जीवन सांगितले आहे. लेखात कसलीही लपवाछपवी, औपचारिक खोटे दुःख नाही. आपल्या एकंदर परिचयाचे थोडक्यात सरळ निवेदन.

माधवरावांचा मोकळेपणाने गौरव. ( द. सी. पंगू, जन्म १८९८. १९२२ त बी. ए., १९२६ त राजाराम महाविद्यालयात प्राध्यापक. )

( १ ) प्रथमचा परिचय—१९२२, डेक्कन कॉलेजात. तेव्हाचे वर्णन. १९२६ त पुन्हा कोल्हापूरला दर्शन. १९२३ ते १९२८ मधील पटवर्धनांच्या जीवनाचे थोडक्यात निवेदन. ( २ ) कोल्हापुरात प्राध्यापक. प्रथम आगमन. १९३३ पर्यंत.—नाडगोंडे यांच्या घरी फारच सुखाचा सहवास. तत्कालीन दिनक्रम. आठवणी. माधवरावांचे काही स्वभावविशेष. अत्यंत घरोबा. ( काही स्नेह्यांचे उल्लेख. ) 'विरहतरंग आणि मेघदूत' वरील रा. ग. हर्ष्यांच्या व्याख्यानाचा प्रसंग.—साहित्यस्नेहमंडळाची कल्पना माधवरावांची. जुजबी गैरसमजामुळे दोघांचाही त्याच्याशी संबंध सुटला. "सुधारक", "विरहतरंग" संबंधीची पंगूंची आवड. 'ऐकव तव मधुबोल' कवितेचे मर्म. प्रणय-तरलवृत्ती पुढे टिकली नाही याची खंत.—१९३४ नंतर माधवरावांच्या काव्यात्म वृत्तीचा लोप होऊन गांभीर्य, विरक्ती, पांडित्य यांचा प्रभाव. 'अंतर्मुख होत चालले.' कुटुंबाची काळजी त्यांना वाटत असावी.— 'सर्वां खल्वियं माया' संबंधी. –रसिकता, परिष्करण, भाषाशुद्धि; काही कविता–यांसंबंधी आठवणी. काही सवयी. स्वतःवरील परिणामही पंगूंनी सरळ सांगितला आहे. डी. लिट्. चे वृत्तही सहज उल्लेखिले आहे.— ( वैयक्तिक संबंध संभाळून घेण्याची पंगूंची वृत्ती दिसते. )

६५. **डॉ. माधवराव पटवर्धन** : वि. वा. पत्की / राजारामीयन, फेब्रुवारी १९४०.

६६. **माधव जूलियन व आदर्श काव्यगायन** : र. ज. सामंत / 'ज्योति', फेब्रुवारी १९४०, व. १ अं. २ / पृ. १३–१४. [ म. नि ]

६७. **( कै. डॉ. ) माधवराव पटवर्धन** : सहविचार, फेब्रुवारी १९४०, व. १८ अं. २ / पृ. ४१–४२. [ म. नि. ]

६८. **कै. प्रो. माधवराव पटवर्धन** : शं. के. कानेटकर / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० ( पटवर्धन विशेषांक ) / ११–१२ पृष्ठे.

चरित्रलेख. सरळ कथन. जेव्हा माधवरावांविषयी चरित्रग्रंथ नव्हते तेव्हा उपयोगी. पण आता विशेष नाही. स्थूल, सांकेतिक विवेचन बरेच. सहवासातील उत्कटतेचा प्रत्यय नाही. स्वतःकडेही जाताजाता मोठेपणा घेण्याची वृत्ती. अतिशयोक्तीही काही ठिकाणी. क्वचित काव्यपंक्तींचा वापर. ( १ ) प्रास्ताविक सामान्य विवेचन. ( २ ) चरित्रकथन. ( ३ ) जीवनविषयक कल्पना. काव्याचे थोडे स्वरूप. अखेर झपाट्याने मतपरिवर्तन. ( ४ ) समारोप.

६९. **'रविकिरणमंडळ' व माधवराव** : श्री. बा. रानडे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ५२१–५२६.

रविकिरण मंडळाच्या स्थापनेची हकिगत. '(या आठ लोकांची) सर्वांचीच सामाजिक मते पुढारलेली आहेत या जाणिवेने निकट आलेल्या या लोकांना शेवाळू लागणाऱ्या मराठी काव्याला नवनवे पाट फोडण्याची तळमळ लागली, एकमेकांसंबंधी जिव्हाळा उत्पन्न झाला.'–त्यावेळचे काव्यक्षेत्र. मंडळाची प्रकाशने–सदस्यांतील मतभेद. रविकिरण मंडळाचे कार्य.

७०. **'रविकिरणमंडळ' व श्री. माडखोलकर** (खुलासा) : श्री. बा. रानडे / लोकशिक्षण, एप्रिल १९४०.

'लोकशिक्षणा'च्या पटवर्धन अंकातील रानडे यांच्या उपरोक्त लेखातील [क्र. ६९] काही विधानांबद्दल रानडे यांनी संबंधित व्यक्तींच्या सूचनेवरून केलेला खुलासा. मुख्य खुलासा : (अ) रविकिरण मंडळाचा समारोपाचा ग्रंथ काढून त्याचे विसर्जन करावे अशी माधवराव प्रभृतींची सूचना. पण सर्वांचे अनुमोदन न मिळाल्याने ते चालू राहिले. (आ) माडखोलकरांचे एकही पुस्तक मंडळाकडून प्रसिद्ध झाले नाही. पण त्यात माडखोलकरांचा दोष नाही. त्यांच्या "विलापिका" पुस्तकाच्या प्रकाशनाच्या प्रश्नावर, ते मंडळाकडून प्रसिद्ध होऊ नये असे बहुमताने ठरले. त्यानंतर त्यांच्या पुस्तकाच्या प्रकाशनासंबंधाने ते व मंडळ दोघे मुग्ध राहिली.

७१. **'माधव जूलियन' : काही विशेष** : रा. चिं. श्रीखंडे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ५४५-५५०.

"स्वप्नरंजन" वरील श्रीखंडे यांच्या टीकेच्या [लोकशिक्षण, डिसेंबर, १९३५; पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क्र. क. ३·८४] अनुरोधाने लेखन. प्रच्छन्न, उपरोधगर्भ प्रतिकूलता. 'माधवरावांवर यथार्थ टीकास्त्र असे फारसे कोणी चालविले नाही.' 'माधवराव महाराष्ट्राचे इतके लाडके कवी बनले की, त्यांच्या विक्षिप्तपणालाही गुणांचेच कौतुकस्थान संपादन करता आले!' 'मतप्रसार व नवरूढिप्रस्थापना ही दोन्ही माधवरावांची वैशिष्ट्ये होती.' माधवरावांची भाषासरणी काहीशी कृत्रिम व विक्षिप्त, मात्र तिच्यात आवेश. श्रीखंडे यांच्या "स्वप्नरंजना"वरील टीकालेखावर भा. रा. तांबे यांचे श्रीखंडे यांना आलेले पत्र उद्‌धृत. ते महत्त्वाचे. श्रीखंडे यांच्या टीकालेखावर टीकेचा सूर –'साहित्य स्नेह मंडळा'ची हकिगत –माधवरावांची वृत्ती. 'त्यांना अन्यायाची अत्यंत चीड होती असे म्हणतात; पण अन्याय झाल्याबद्दल त्यांचा अनेकदा गैरसमजच झालेला असे!'

७२. कविवर्य **'माधव जूलियन'** : रा. श्री. जोग / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ६५७–६७६.

माधवरावांच्या लेखनाचा परिचय. त्यामागील त्यांची भूमिका. त्यांच्या कवित्वाचे

विश्लेषण. 'माधवरावांच्या साऱ्या प्रेमकाव्यांतून शारीर सौंदर्याच्या वर्णनास गौण महत्त्व असून, खोल व खऱ्या प्रेमभावनेस प्राधान्य आहे.' – "विरहतरंग" "मेघदूता" पेक्षा सरस.—"विरहतरंग", "सुधारक", "तुटलेले दुवे", "नकुलालंकार" यांचे विवेचन. रुबायांच्या भाषांतराचा विचार. – 'कवी' म्हणून माधवरावांचे विशेष कार्य.

७३. **तरुण माधवरावांची दुःखे अर्थात् माधवरावांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान :** श्री. के. क्षीरसागर / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ५२७–५३०.

महत्त्वाचा लेख. माधवरावांच्या स्वभावातील मर्यादेची, वैगुण्याची चिकित्सा.– तात्त्विक, पण मधून काही व्यक्तिगत निर्देशही. या स्वभावजन्य मर्यादेमुळे त्यांच्या कर्तृत्वाला, कार्यक्षेत्रालाही कशा आपोआप मर्यादा पडत गेल्या याचा यावरून बोध होईल. १. माधवरावांना भोवतीच्या माणसांची खरी किंमत ओळखता आली नाही. आपल्या सामर्थ्याची खरी कल्पना त्यांना नव्हती. भोवती मर्यादित, कृत्रिम जग कल्पून त्यातच प्रतिष्ठा मिळवण्यासाठी ते भ्रमत राहिले, धडपडत राहिले. – त्या जगाने त्यांना झिडकारले तरी. ज्या स्त्रियांना त्यांनी दैवत मानले, त्यांपैकी एकीनेही त्यांच्या अपेक्षांना आपण पात्र असल्याचे पुढील आयुष्यात दाखवले नाही यावरून हेच दिसते. २. माधवराव भावनाप्रधान व तर्कनिष्ठ होते. पण त्यांची भावना आसक्तीचे दुर्बल रूप घेई आणि त्यांचा तर्क त्यांस विनोदबुद्धीस पारखा करी. ३. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातही माधवरावांच्या मनाच्या वाढीस पक्षघात झाला होता. अध्यात्माच्या उच्च काव्यमय क्षेत्रात ते झापडबंद ठरले. ४. प्रत्यक्ष सामाजिक जीवनातही याच मर्यादा. कृत्रिम व खुजट जगास न झिडकारण्याचे ग्रहण.—पण महाराष्ट्रात स्वर्गीय प्रेम त्यांनीच केले.

७४. **'माधव जूलियन' यांची स्त्रीसृष्टी :** सौ. मुक्ताबाई दीक्षित / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० / पृ. ६४३–६५०.

ज्या विशिष्ट कालखंडात माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास झाला आणि त्यांची स्त्रीविषयक दृष्टी बनली त्याचे दर्शन. – माधवरावांची एक दृष्टी रम्याद्भुत होती आणि दुसरी सुधारकी होती. 'ते स्त्रीसौंदर्याकडे किंवा स्त्रीमार्दवाकडे पाहून जसे विह्वल होतात, स्त्रीजातीवर होणाऱ्या अन्यायाकडे पाहून त्यांना जशी चीड येते, त्वेष येतो, मातृप्रेमाच्या विश्वव्यापी स्वरूपाकडे पाहून ते जसे आदराने गहिवरतात, तसे स्त्रीमनाच्या सूक्ष्म व वास्तव व्यापारांचे अचूक निदान ते करू शकत नाहीत. एवढेच नव्हे, तर स्त्रीहृदयाच्या या अंगाविषयी त्यांचा थोडा भोळा भावच असावा अशीही शंका येते.' – काव्यातील 'भगिनीप्रेमा'च्या कल्पनेवर महत्त्वाची टीका. – 'अमोघ भाषाप्रभुत्व, सूक्ष्म वर्णनशैली, कल्पनेची भरारी व वेचक शब्दयोजना ही

सर्व काव्याची महत्त्वाची अंगे जरी या काव्यांतून दृष्टोत्पत्तीस येत असली, तरी पार्थिव सौंदर्य व त्याचा तरुण हृदयावर होणारा परिणाम या दोनही गोष्टी दाखविणाऱ्या लालस दृष्टीपलीकडची, कवीचे विचारप्रगल्भ अंतरंग दाखविणारी दृष्टी त्यात नाही.'

**७५. गद्यलेखक व टीकाकार पटवर्धन :** कृ. पां. कुलकर्णी / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ६५१–६५६. [ समाविष्ट : "वाग्यश" / कृ. पां. कुलकर्णी / ऑक्टोबर १९५२. त्यातील लेखातील उत्तरार्ध, पृ. १२४–१३० ].

पटवर्धनांच्या गद्यलेखनाचा परिचय व परामर्श. – त्यांच्यामध्ये कवीची प्रतिभा व संशोधकाची प्रतिभा यांचे द्वंद्व. – स्फूर्ती व लेखनसरणी या दृष्टीने माधवरावांच्या गद्यलेखनाचा सामान्यतः विचार. विचारसरणीच्या दृष्टीने त्या लेखनाचे अल्प निरीक्षण.

**७६. कै. डॉ. माधव त्र्यंबक पटवर्धन :** कृ. पां. कुलकर्णी / "वाग्यश", ऑक्टोबर १९५२, [ लेखसंग्रह, कृ. पां. कुलकर्णी / पृ. ११८–१३०. यांपैकी पूर्वार्ध 'विविधवृत्ता' त व उत्तरार्ध 'लोकशिक्षणा' च्या पटवर्धन अंकात. पाहा, क. २·७५ ].

माधवरावांच्या निधनानंतर बारा दिवसांनी लिहिलेला. चांगला, प्रमुख लेख. माधवरावांच्या कार्याची थोरवी सांगणारा. ( १ ) कवी, ( २ ) संशोधक, ( ३ ) टीकाकार अशी त्रिविध ओळख करून देणारा लेख. व्यक्तिपरिचयही चांगला.— माधवरावांचे कर्तृत्व, आकांक्षा, जीवन, गुणविशेष, त्यांची वृत्ती, व्यक्तित्वदर्शन घडवणारा. दिलदार, उमदी वृत्ती. 'पराभूतांचे कैवारी.' अव्वल दर्जाचा कवी व संशोधक. 'माधव जूलियन' युग. शब्दसंशोधन. छंदसंशोधन. यापुढे रसचर्चा करण्याचा माधवरावांचा संकल्प. गद्यलेखन. कवी व संशोधक अशा दोन प्रतिभांचे माधवरावात द्वंद्व. उत्तरायुष्यात संशोधनप्रतिभेचा प्रभाव. सुरस काव्यलेखन नाही. भाषाशुद्धीच्या अभिनिवेशाने आरंभीच्या गद्यलेखनात कृत्रिमता, बोजडपणा. 'स्थितिनिष्ठ नवाभिनिवेशी.'

**७७. आमच्या डोक्यावरील छत्र नाहीसे झाले ! :** लीलाबाई पटवर्धन / ज्योत्स्ना, मे १९४० / दोन पृष्ठे.

बहुतेक भाग "आमची अकरा वर्षे" मध्ये आला आहे. ( १ ) स्वतःचे दुःख. ( २ ) माधवराव टॉड्ला सर्व श्रेय देत. ( ३ ) मुलामुलींना सिनेमागृहात बघून, पोषाख, चैन करताना बघून खिन्न होत. 'आधी मिळवा, मग मिरवा' म्हणत. ( ४ ) गरीब, कष्टाळू विद्यार्थ्यांना उत्तेजन. ( ५ ) माधवरावांची वृत्ती, कवितांची मुळे यांबाबत निर्वाळा. ( ५ ) पैशाच्या बाबतीत अत्यंत व्यवस्थित. ( ७ ) एकटे राहण्याची लहर येई.

**७८. माधवराव पटवर्धन : व्यक्ति व वाङ्मय :** माधव केशव काटदरे / ज्योत्स्ना, मे १९४० / ५॥–६ पृष्ठे.

माधवरावांचे व्यक्तिमत्त्व समजण्यास साहाय्यक होण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा लेख. ( १ ) प्रथम-परिचय माडखोलकरांमार्फत. " नवयुग 'मध्ये माधवरावांच्या प्रकाशित झालेल्या कविता. ( २ ) यापुढील गाठीभेटी. त्यांतील गप्पांचे विषय. त्यातून विविध विषयांवरील माधवरावांची मते. उत्तरोत्तर त्यांत कशी पक्वता येत गेली याचे दिग्दर्शन. 'जूलियन' नाव त्यांना दुसऱ्या एका व्यक्तीने दिले होते. ( ३ ) पटवर्धनांच्या महत्त्वाकांक्षी, विकासोत्सुक मनाची कौटुंबिक जीवनात होणारी कुचंबणा सूचित करणारे महत्त्वाचे उद्गार ( १९३२ ते ३४ च्या दरम्यान ). ( ४ ) माधवांच्या कवितासंग्रहाच्या प्रकाशनानंतर त्यांना माधवरावांचे गेलेले पत्र. ( ५ ) दत्त गणेश काळे यांना योग्य बोध करून त्यांच्या परिस्थितीला दिलेली कलाटणी. काळ्यांच्या पत्रातून उतारा.

**७९. माधवराव : काव्य आणि जीवन** ( दिग्दर्शनात्मक ) : वि. स. खांडेकर / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ८९–९२. [ समाविष्ट, " गोफ आणि गोफण ", वि. स. खांडेकर, १९४६. ]

( १ ) कवीचे काव्य व वैयक्तिक जीवन बिंब-प्रतिबिंब मानण्यात अन्याय. ( २ ) कवीची जीवनाकडे बघण्याची दृष्टी, त्याच्या व्यक्तित्वाचा विकास यांचा शोध घेण्याचा छोटासा प्रयत्न. त्यांच्या आरंभीच्या व अखेरच्या कवितांच्या तुलनात्मक अवलोकनातून. ( ३ ) पुढेपुढे आयुष्यातल्या अनेक कटू अनुभवांमुळे त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोण अधिक व्यावहारिक झाला. दिवसेंदिवस रसिकतेवर पांडित्याचा व काव्यावर व्यवहाराचा अधिक पगडा. अलीकडच्या त्याच्या कविता वाचताना त्यांच्या पूर्वकवितेच्या चाहत्याला चुकल्यासारखे वाटे. आपण प्रौढ झालो आहो हे विसरून जाण्याची त्यांची शक्ती आयुष्यातल्या अनेक लढायांनी कमी केली होती.

**८०. प्रेम आणि माधवराव :** विठ्ठलराव घाटे/ ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ४५-५२. [ समाविष्ट : " विचारविलसिते ", विठ्ठलराव घाटे यांचा लेखसंग्रह / १९७३ / पृ. १०३–११७. ]

माधवरावांची प्रेमविषयक दृष्टी, तत्त्वज्ञान स्पष्ट करणारा, निकट परिचिताने लिहिलेला महत्त्वाचा लेख. अनेक प्रश्नांना, विचारांना चालना देणारा. काही व्यक्तिगत निर्देश. ( १ ) माधवरावांच्या असामान्य लोकप्रियतेचे कारण त्यांची प्रेमगीते. मराठी प्रेमकवितेवरील बुरखा काढून तिला मोकळ्या वातावरणात आणले. तत्कालीन पार्श्वभूमीवर प्रेममूर्तींचे चित्रण. ( २ ) माधवरावांचे जीवन समजून घेताना गज्जलांचा

वापर जपून—न केला तरीही चालेल. तो माधवरावांचा कल्पनाविलास. नवीन चाली मराठीत आणण्याच्या हेतूने बऱ्याच गज्जलांचे लेखन. ' श्यामलेस ', ' हृदयराणी ', ' प्रेम कोणीही करीना ', ' तेथे चल राणी ' या गज्जलांचे विवेचन. ( ३ ) माधवरावांची प्रीतीची मीमांसा " विरहतरंग ", " तुटलेले दुवे ", " सुधारक " मध्येच. त्यांत माधवरावांची स्वानुभूती. " विरहतरंग ", " तुटलेले दुवे " मध्ये विलक्षण साम्य. जगाच्या कटू अनुभवानंतर किंकराची मूर्ती त्यांनी निर्मिली. तो मरताना ध्येयवाद सोडतो. [ हे बरोबर नाही. ] इंदू व शारदा प्रेमाचा अव्हेर का करतात समजत नाही. इंदू दैववादी, morbid. ( ४ ) " सुधारक " माधवरावांच्या आत्म्याचे चित्र. बासू माधवरावांना डोळ्यांपुढे उभे करतो. तो त्यांच्या wishful thinking चे फल आहे. ( ५ ) माधवीय प्रेमतंत्राचे सर्वसामान्य समालोचन. निष्काम प्रेमयोग. प्रेमवर्णनात सामाजिक जीवनामधला एक cross-section कापून घेतला. वर्गकलहाचे रूप. माधवरावांच्या स्त्रीविषयक प्रेमात पुत्रभक्तीचे मिश्रण.

८१. **माधवरावांची प्रेमगीते :** गं. भा. निरंतर / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ९३–९७. [ समाविष्ट " ग्रंथांच्या सहवासात " / गं. भा. निरंतर / मार्च १९४५ / पृ. ८८–९९ ]

माधवरावांमागील तरुण पिढीतील डोळस चाहत्याचा लेख म्हणून महत्त्व. वि. द. घाटे यांच्या लेखाबरोबर वाचण्यासारखा. पण काहीसा एकांगी. ( १ ) तरुण मनातील प्रेमविषयक भावना प्रथम गोविंदाग्रजांनी मोकळेपणाने व्यक्त केल्या. पण त्यांनाही थोडा सांप्रदायिकपणा पत्करावा लागला. त्या सांप्रदायिकतेचा खोटा बडेजाव बाजूस सारून तरुण मनाला माधवरावांनी बोलके केले. प्रेमकाव्याला प्रतिष्ठा मिळवून दिली. ( २ ) माधवरावांच्या प्रेमभावनेचे वर्णन. प्रेम ही स्वयंपूर्ण, स्वयंसिद्ध भावना आहे. ते जीवनातील स्वप्न आहे. ते स्वप्न पारखून पाहण्याची त्यांस भीती वाटते. स्त्रीहृदय याबाबतीत बेफिकीर, निर्बुद्ध, लहरी, खोडकर. म्हणून तरुण आपल्या भावना अस्फुट ठेवू इच्छितो. ही ओढ चूक असली तरी ' सहज ' आहे. ' पुरुषाच्या जीवनाचे साफल्य अशा ( स्त्रियांसारख्या ) अप्रबुद्ध प्राण्यांच्या सहानुकंपावर अवलंबून असावे हाही एक दैवदुर्विलासच ! !' ( ३ ) शेलीने प्रेयसीपेक्षा प्रेमावरच प्रेम केले म्हणून त्याचे जीवित भकास होत गेले. तसे माधवरावांचेही. पण काव्यात्म जीवनाच्या राखेतून पांडित्यरूपाने पुनर्जन्म घेणारे माधवराव शेलीच्या पुढे गेले.

८२. **माधवरावांची काव्यसृष्टी :** द. के. केळकर / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ८१–८६. [ समाविष्ट : " साहित्यविहार " / द. के. केळकर यांचा लेखसंग्रह / जून १९४४. ]

थोडक्यात माधवरावांच्या कविता, विशेष यांचा परिचय. ( १ ) भरपूर निर्मिती

करीत होते. अकस्मात मृत्यू. रचनेचे वैपुल्य. तसेच विद्वत्त्व व कवित्व एकत्र. ( २ ) हुबेहूब शब्दचित्रे रेखाटणे हे वैशिष्ट्य. पण कथानककौशल्य नाही. काव्य-संवादचातुर्य. ( ३ ) निसर्गसृष्टीचे विलोभन कमी. केवळ निसर्गवर्णने थोडी. इतरत्र ती मानवी जीवनाची, भावनांची पार्श्वभूमी. ( ४ ) सभोवतालच्या समाजजीवनाचे पडसादही आहेत. मातेच्या स्मृतीने कवीचे अंतःकरण उचंबळून येते. ( ५ ) पण रसोत्कर्षाची परमोच्च सीमा प्रेमकाव्यात. प्रेमभावनेच्या विविध छटा हळूवारपणे रंगविल्या आहेत.

८३. **एक क्रांतिकारक कवी माधव जूलियन** : ना. म भिडे / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ६७–६९.

माधवरावांच्या काव्याच्या प्रसिद्धिकाली त्याचे स्वागत कसे झाले, त्या काव्या-संबंधीच्या प्रतिक्रिया काय झाल्या हे समजण्यास उपयोगी. ( १ ) रुबायांच्या भाषांतराचे यथायोग्य चीज झाले नाही या भावनेने, यशवंत-गिरीशांइतका बोलबाला वाट्यास आला नाही म्हणून, टीकाकारांच्या करड्या नजरेतून सुटले नाहीत म्हणून, लोकप्रियतेच्या कसोटीस उतरले नाहीत म्हणून माधवराव स्वतःच्या काव्याविषयी उदासीन असत. त्यांच्या काव्यनिर्मितीवरही याचा परिणाम झाला असावा. पहिल्या उमेदीतल्यासारखी काव्यरचना त्यांच्याकडून पुढे घडली नाही. ( २ ) उपहास–काव्याची गणना अधम काव्यात. तरी कौशल्य हवे. उपहास–खंडकाव्यांना मराठीत मान्यता मिळवून दिली. ( ३ ) त्यांच्या काव्यात स्फूर्तीची खळबळ, भावनोद्रेक असले तरी विवेचकपणा व सुसंबद्धता यांचाच प्रकर्ष. केसपिंजणाचाच प्रकार. ( ४ ) माधवरावांच्या प्रसिद्धीला " किरण " वरील टीका, केशवकुमारांची विडंबने कारण. ( ५ ) 'युगप्रवर्तक कवी' म्हणून विशेष. विचार व रचना याबाबतीत मराठी कवितेत क्रांती घडवून आणली.

८४. **डॉ. माधवराव पटवर्धन सामाजिक टीकाकार** ( चर्चात्मक ) : मा. दा. अळतेकर / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ३७–४१.

' माधवरावांची सामाजिक टीकाकाराची भूमिका विशद करणारा विस्तृत लेख अळतेकरांकडून आला होता. पण उशिरा आल्याने सारांशरूपाने छापला. ' अशी संपादकीय टीप.—सामान्य लेख. थोडी विचारप्रवृत्त करणारी, वादमूल विधाने. ( १ ) माधवरावांचा सर्वसाधारण गौरव. भाषेच्या शास्त्रीय स्वरूपाकडे लक्ष देणाऱ्या थोड्यांपैकी एक. सामाजिक प्रश्नांवर प्रत्यक्ष लेखन नाही. पण " विरहतरंग ", विशेषतः " सुधारक "वरून शोध घेण्याचा प्रयत्न. राजकीय उल्लेख फारसे नाहीत. जहाल-मवाळांत समतोल. आगरकरांचे सामाजिक सुधारणेत अनुगामी. ( " सुधारक "ची कादंबरी फार सुरेख झाली असती. ) श्यामाच्या चित्रात येणाऱ्या युगातील

विकृतीचा कवडसा. ( २ ) " विरहतरंगा "च्या आधाराने त्यांची प्रेमविषयक भूमिका. ( ३ ) " सुधारक "चा विचार. सरला आरंभी तरला-बासू प्रेमास प्रतिकूल असते. पुढे अनुकूल होते. खरी सुधारकी म्हणजे भूतदया. ( ४ ) व्यक्तिविकसनास पूर्ण वाव व विवाहाला प्रेमाचे अधिष्ठान या तत्त्वांवर भर —सामाजिक टीकाकार म्हणूनही त्यांचा दर्जा मोठा. जगले असते तर अधिक परिणती झाली असती.

८५. **थोडक्यात माधव जूलियन** : कवि यशवंत / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. १३६–१३८.

संपादकीय प्रास्ताविक—यशवंतांना लेख लिहिण्याची विनंती. तिचा अव्हेर करणारे यशवंतांचे पत्र. पुन्हा त्यांना विनंती. मग लेख. ( १ ) आधुनिक कवींत अग्रपूजेचा मान माधव जूलियनांचा. माडखोलकरांच्या प्रश्नाला उत्तर. ( २ ) चोखंदळपणाचा त्यांच्या ठिकाणी अतिरेक. भाषाशुद्धी तत्त्वदृष्ट्या समर्थनीय असली तरी सौंदर्यदृष्ट्या हानिकारक. [ महत्त्वाचा आक्षेप. ] ( ३ ) माधवरावांची कवितेची व्याख्या अठराव्या वर्षी त्यांनी लिहिलेल्या पत्रातून : ' कवितेतून उन्हउन्ह ताजे रक्त खेळत असले पाहिजे. ' ही व्याख्या, आणि ' तेथे चल राणी ', ' संगमोत्सुक डोह ', ' भ्रान्त तुम्हा का पडे ' या तीन कविता म्हणजे ' थोडक्यात माधव जूलियन. ' यांचाच विस्तार म्हणजे त्यांची प्रदीर्घ काव्ये. ( ४ ) एके काळचे काव्यात्म माधवराव जीवनाच्या अनुभवानंतर आयुष्याकडे तडजोडीच्या दृष्टीने पाहू लागले.

८६. **फार्सी भाषेचे पहिले महाराष्ट्रस्थ प्राध्यापक** : ग. र. दंडवते / सहविचार, ऑगस्ट १९४० / पृ. ४९–५२.

८७. **प्रणयपंढरीचा वारकरी कै. माधव जूलियन** : शांताराम ( नागपूर ) / यशवंत, अं. १२९, जानेवारी १९४२ / पृ. २०–२२.

८८. **माधव जूलियन आणि प्रेम** : नीळकंठ म्हात्रे / ' नयन ', फेब्रुवारी १९४२, व. १ अं. ७ / पृ. २५–२६. [ म. नि. ]

८९. **केशवसुत आणि डॉ. माधवराव पटवर्धन** : रा. श्री. जोग / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९४५ / पृ. २–८.

९०. **माधव जूलियन : महाराष्ट्राचे प्रातिनिधिक कवि** : ना. ग. जोशी / अभिरुचि, मे १९४५, व. ३, अं. ४ / पृ. ५१–५३. [ समाविष्ट : " साहित्यविवेचन ", लेखसंग्रह, ना. ग. जोशी / १९६८ / पृ. १५८–१८० ].

( १ ) [ **व्यक्तिदर्शन** ] काव्यात्म, लढाऊ, चिकित्सक, आणि मानव्यप्रेमी अशा एकमेकांना विरोधी पण योग्य प्रमाणात मिश्रण झाल्यामुळे एकसंध होऊ शकलेल्या चार प्रकारच्या मनोवृत्ती माधव जूलियनी भावकाव्यात दिसतात. या चार वृत्ती

महाराष्ट्राच्या प्रातिनिधिक आहेत. परंतु त्यांतच माधवरावांची मर्यादा. त्यांच्या मनोवृत्तीची बैठक आध्यात्मिकतेला, गूढवादाला विरोधी. बुद्धिगम्य भौतिक सृष्टीशी ती रममाण होणारी आहे. ही तार्किक, जडवादी वृत्ती तर्कातीत, चैतन्यमय सत्याचे कसे आकलन करणार ? जागतिक महाकवी होण्याला जी भव्योत्कटता, गूढगंभीरता आणि विशाल कल्पकता लागते तिचा अभाव त्यांच्या काव्यात आहे. ते मोठे कवी आहेत, कारण ते सहानुभूत, सौजन्यशील असे कल्पक, रसिक, आणि चतुर शब्द-शिल्पी आहेत. महोदार वृत्ती. ( २ ) [ कवित्वदर्शन. ]( "तुटलेले दुवे", "नकुलालंकार", "मधुलहरी" यांची 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'त वेगवेगळ्या वेळी आलेली परीक्षणे येथे एकत्र केली आहेत.) "तुटलेले दुवे" : त्याचे कौतुक. सौंदर्यदर्शन. विविधता दर्शन. ( अ ) अंतर्गत पाहाणी. ( ब ) रचनानियमांच्या दृष्टीने पाहाणी. सुनीतांचे रचनादृष्ट्या पृथक्करण. भाषासरणी. या १०१ सुनीतांतील किती सुनीते उत्कृष्ट ? कमी. कारण, उत्कट विविधतेची उणीव. किंकराचे जीवन फारसे खळबळीचे नाही. उत्तम संग्रह.—"नकुलालंकार" : परिचय. 'कोप' श्लोकत्व पावला. "सुधारक"—"नकुलालंकारां"त अंतर. "नकुलालंकारा"चा चित्रफलक मर्यादित. आर्येची तपासणी. अलंकारवैविध्य. भाषा. श्रुतोक्ति. गुणशाली "नकुलालंकार".—"मधुलहरी". माधव जूलियन अंतर्मुख होत चालले होते. ते भावकवी म्हणून प्रथम अतिशय उत्कट. ते कमी होत गेले. पंडित कवी म्हणून ख्याती. पण भावकवीच प्रिय.

**९१. माधव जूलियनांचे ओझरते दर्शन** : ( ज. ना. ढगे ? ) / 'क्षितिज', ( ठाणे, संपादक माधव गडकरी ) / जून १९४७, व. १ अं. १ / पृ. १५–१८.

**९२. कै. कवि माधव जूलियन यांच्या आठवणी** : वि. के. महाबळेश्वरकर / भारती, दिवाळी अंक, १० नोव्हेंबर १९४७ / पृ. ५२–५६.

चांगल्या आठवणी.—माधवरावांच्या कवितेचे वेड. श्री. के. क्षीरसागरांबरोबर सातारला माधवरावांच्या गजला म्हणत माळावर चांदणी रात्र जागविली. माधवरावांविषयी आदर-भक्तिमिश्रित भाव. माधवरावांचा निर्मत्सरीपणा. नवीनांच्या गुणांचे कौतुक करून प्रोत्साहन देणारी वृत्ती. मोठेपणाचा देखावा नाही. मुसलमानाच्या दुकानातून माल न घेण्याचे धोरण. अन्यायाची विलक्षण चीड.

**९३. माधवरावांचे चरित्र कोणी लिहावे ?** : श्री. के. क्षीरसागर / प्रतिभा ( औरंगाबाद ), डिसेंबर १९४७.

माधवरावांचे चरित्र लिहिण्यास आवश्यक गुण कोणते ? चरित्रविषय होणाऱ्याचे गुणविशेष. मोठेपणाइतकीच कुतूहलजनकता हवी. अंतरंगातील खळबळींना महत्त्व. चरित्र लिहिण्यास अगदी अयोग्य कोण ?—पत्रांच्या ट्रंकेचा प्रसंग. माधवरावांच्या चरित्रातील गूढ आपल्याला ठाऊक आहे असे सांगणारे अनेक. असे कसे ? माधव-

रावांची स्वभावप्रकृति.—चरित्रकार समकालीन असूनही समानधर्मा हवा. आधुनिक कवींच्या रूपाने महाराष्ट्रात जन्माला आलेल्या 'मानवी नमुन्या'चे आकलन करण्याची पात्रता हवी. कल्पक सहृदयता आणि सहृदय कल्पकता कवितांची संगती लावताना हवी.—माधवरावांच्या शब्दशैलीतील दोष.—विठ्ठलराव घाटे माधवरावांचे चरित्र लिहायला पहिले अधिकारी. नंतर शं. के. कानेटकर.

९४. **माधवराव पटवर्धन** : नी. अ. पोखारे / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. २५-२८.

चरित्रपर, सामान्य लेख.

९५ **"'माधवराव' म्हणजे मला जादूचा शब्द वाटतो!"**.[कै. 'माधव ज्यूलियन'-स्मृति-तरंग] : गोविंद झोकरकर / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. १८–१९.

सामान्य, वैयक्तिक आठवणीपर लेख. –भा. रा. तांबे म्हणत, "माधवराव म्हणजे मला जादूचा शब्द वाटतो!"

९६. **मनस्वी माधवराव** : बा. श्री. पुरोहित / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७.

भाविकाचे स्मृतिवंदन. पहिली भेट–१९२६. नंतर १९३३–नासिक, महाराष्ट्र कविसंमेलनाच्या वेळी. तेव्हाच्या भाषणाची आठवण. एका मराठी शिक्षकाला, त्याच्या पत्रानंतर, पटवर्धनांनी आपल्या समग्र वाङ्मयाची भेट दिल्याचा संस्मरणीय प्रसंग.

९७. **माधवराव पटवर्धनांची पृथगात्मता** : यशवंत कानिटकर / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. २९–३०, ३३.

माधवरावांनी रंगविलेल्या भावना व त्यांची शैली यांचे तेज स्वयंभू. त्यांच्या प्रणयभावनेचे विश्लेषण. पटवर्धनांची भाषा.

९८. **माधव जूलियन आणि गूढवाद** : गं. भा. निरंतर / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. २१–२४, ३१–३२.

गूढवादाचे प्रास्ताविक विवेचन. माधवरावांच्या प्रेमगीतांत प्रेममार्गी गूढवादाचे स्वरूप व्यक्त झाले ते स्पष्ट करण्याचा प्रयत्न या लेखात केला आहे. माधवरावांनी केशवसुतांच्या गूढवादी कवितेवर केलेल्या टीकेचे समर्थन, स्पष्टीकरण. प्रेममार्गी गूढवादाचे माधवराव साधक होते.

९९. **कै. लीलाबाई पटवर्धन** : (श्रद्धांजली) य. दि. पेंढरकर / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल-जून १९४९.

**१००. पटवर्धन, माधव त्रिंबक :** गं. दे. खानोलकर / " अर्वाचीन मराठी वाङ्मय-सेवक ", खं. ३ / १९४९ / पृ. २-५०.

( १ ) चरित्रविषयक टिपण. (२) प्रसिद्धीचा आरंभ. ( ३ ) फार्सी-मराठी कोश. काही लेखनसंकल्प. ( ४ ) " विरहतरंग "-जन्मकथा. " तुटलेले दुवे "मधील व्यक्तिगत घटनांचे पडसाद. ( ५ ) " सुधारक "-भाष्य. ( ६ ) " नकुलालंकार " पुण्यातील मत्सरी कविब्रुवाबद्दलच्या तिरस्कार-संतापातून. " नकुलालंकारा "च्या लेखनाच्या वेळी ते कविब्रुव हयात होते. ( ७ ) उमरखय्यामच्या रुबायांची भाषांतरे; " गज्जलाञ्जलि ", " स्वप्नरञ्जन " यांचा परिचय. " मधुलहरी ". इतर गद्य लेख. लेखाअखेर माधवरावांचे वाङ्मय, त्यांच्यावरील वाङ्मय यांची यादी.

**१०१. माधव जूलियन यांची काव्यव्यक्ती :** गो. के. भट / ' साहित्य ', डिसेंबर १९४९, व. ३ अं. २ / पृ. ४६-६०. [" मधुधारा " लेखसंग्रह, गो. के. भट / जानेवारी १९५३ / २३ पृष्ठे. ] ( १९४४च्या पटवर्धन-स्मृतिदिनी महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, मध्ये न. चिं. केळकरांच्या अध्यक्षतेखाली झालेले व्याख्यान ).

महत्त्वाचा, मूलभूत प्रश्न उपस्थित करणारा लेख. माधव जूलियनांची काव्याची ( अभि )व्यक्ती, आणि काव्यातील ( काव्यात दिसणारी ) व्यक्ती यासंबंधी. त्यांच्या काव्याचे मर्म शोधणारा लेख. ( १ ) बाह्य वैशिष्ट्य हे आता गौण. पांडित्य व प्रणय या दोन उपाधी गैरसमजोत्पादक. त्यांत माधव जूलियनांच्या काव्याचे मर्म नाही. ( माधव जूलियनांच्या प्रेमभावनेचे वर्णन. त्यांची प्रेमविषयक दृष्टी. ) ( २ ) कविमन. त्यातील दोन भिन्न प्रवृत्ती. ' भावजीवी मन ' आणि ' सौंदर्यभोजी मन '. आत्मनिष्ठ व वस्तुनिष्ठ कवी. बहुधा या दोहोंपैकी एक पारडे जड. माधव जूलियन वस्तुनिष्ठ कवी. वस्तुनिष्ठ मनोवृत्ती. यातच त्यांचे सामर्थ्य. अनेकविध उठावदार व्यक्तिचित्रे. प्रसंगांची, क्षणांची चित्रे. पण यातच मर्यादा. अंतर्मुखता नाही. ( " विरहतरंग " अपवाद. दोन वृत्तींचा समतोल. ) चारुता आहे, पण गंभीरता नेहेमीच आहे असे नाही. जीवनविषयक तत्त्वज्ञान निर्माण होत नाही. ( ३ ) काव्यातील व्यक्तिमत्त्वाचे वर्णन. प्रीतिविषयक. सामाजिक भावना-पण ती समता, समाजसत्तावाद यापलीकडे गेली नाही. माधव जूलियनपेक्षा माधवराव पटवर्धन श्रेष्ठ.

**१०२. माधव जूलियन** (वाङ्मयविषयक मूल्यमापन) **:** मार्तण्ड निळकंठ गलगलीकर/ ' युगवाणी ', जानेवारी १९५०, व. ५, अं. १ / पृ. ८-१८. [म.नि.]

**१०३. गडकरी व माधव जूलियन :** श्री. के. क्षीरसागर / रविवारची लोकसत्ता, १० फेब्रुवारी १९५२ / पृ. ४ / सुखसंवाद ३ (१८).

**१०४. कै. माधव ज्यूलियन :** म.श्री दीक्षित / साप्ता.विवेक, २९ नोव्हेंबर १९५३/

पृ. ४. [ समाविष्ट : " साहित्यिकांच्या सहवासात " / म. श्री. दीक्षित / १९६३ ].
पटवर्धनांच्या १४व्या स्मृतिदिनानिमित्त लिहिलेला सर्वसाधारण छोटा लेख.

**१०५. ' प्रणयपंढरीचा वारकरी '** : भ. श्री. पंडित / सह्याद्रि, सप्टेंबर १९५४ / ८ पृष्ठे. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे मध्ये २९ नोव्हेंबर १९५३ ला पटवर्धन स्मृतिदिनानिमित्त दिलेले भाषण–किंचित् फेरफार करून. [ समाविष्ट, " संचय ", लेखसंग्रह, भ. श्री. पंडित / १९६६ ].

समग्र माधवरावांवर भाषण. माधवरावांचे गद्यपद्य वाङ्मय, तसेच त्यांचे चरित्र. यामुळे लेख धावता झाला आहे. पण परिश्रमपूर्वक तयार केलेला. ( १ ) प्रास्ताविक. माधवराव–प्रा. पंडित यांचे संबंध. ' माधवरावांचा पिंड हा वास्तविक जातिवंत भावकवीचा होता. ' लीलाबाई, खानोलकर, गिरीश यांच्या चरित्रांचा अपुरेपणा. ' केवळ सत्यान्वेषण या दृष्टीने अजूनदेखील त्यांच्या वास्तव चरित्राचे लेखन शक्य आहे. परंतु अद्यापि त्यांच्या संपूर्ण साहित्यावरील समालोचनाचा एकही ग्रंथ निर्माण झालेला नाही. तो अगोदर प्रसिद्ध होणे आवश्यक आहे. ' ( २ ) विवेचनार्थ घेतलेली काव्ये. १९२३–२८ हा कालखंड कवित्वाच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वाचा. (३) प्रेम आणि प्रणय. प्रेमात आंतरिक सौंदर्य; प्रणयात बाह्य विभ्रमांचे आकर्षण. ( ४ ) माधवरावांची कविता उच्च पायरीच्या प्रणयाने परिपूर्ण. प्लेटॉनिक लव्हचे विचार कोते, खोटे, अव्यवहार्य. ( ५ ) माधवरावांचा काल. ( ६ ) सर्वोत्तम काव्य " विरहतरंग ". ( ७ ) तारुण्य, प्रीती आणि स्त्री. ( ८ ) " सुधारक " यशस्वी होण्याचे कारण. ( ९ ) मायबोलीचा अभिनिवेश की तऱ्हेवाईकपणा ? ( १० ) माधवरावांविरुद्ध कारस्थान. डेक्कन एज्युकेशन सोसायटी राजीनामा प्रकरण. माधवरावांचे स्त्रियांच्या मानसशास्त्राविषयी गाढ अज्ञान. ( ११ ) कवितांमुळे सामाजिक बदनामी. म्हणून माधवराव शास्त्रीय ग्रंथरचनेकडे वळले. ( १२ ) व्यथित स्थितीत स्फुरलेल्या कविता. माधवरावांच्या प्रणयाची परिणती चिरंतन प्रीतीत झाली असती.

**१०६. माधव ज्युलियन** : पंडित आवळीकर / सुषमा, एप्रिल १९५५.

**१०७. माधव जूलियन : एक प्रयोगशील कवी** : गो. वि. करंदीकर / सत्यकथा, जानेवारी १९५८ / २॥ पृष्ठे. मुं. म. ग्रंथसंग्रहालयाने साजऱ्या केलेल्या पटवर्धन-स्मृतिदिनानिमित्त ( १९५७ ) आयोजित केलेल्या परिसंवादातील भाषण. [ समाविष्टः " परंपरा आणि नवता ", लेखसंग्रह, गो वि.करंदीकर / १९६७ / पृ.१८३–१८९].
( १ ) निव्वळ प्रयोगशीलतेच्या दृष्टीने माधव जूलियन हे केशवसुत आणि मर्ढेकर यांच्यांमधील दुवा आहेत. ही प्रयोगशीलता सजीव आणि साक्षेपी. ( २ ) माधव जूलियनांनी काव्याच्या जीवनविषयक आशयामध्ये मध्यमवर्गीय भावजीवन व त्याचा सामाजिक संदर्भ यांच्या स्वरूपाची उपहासपूर्ण व उपरोधगर्भ जाणीव हा नवीनच

घटक अंतर्भूत केला. मर्ढेकरांना हा एकमेव वारसा आधुनिक मराठी कवितेकडून. ( ३ ) हा नवा घटक अंतर्भूत करताना साधनही वेगळे. एका निराळ्या शैलीची आवश्यकता होती. बोलभाषेशी जवळीक करणारी मराठमोळी शैली आणि पांडित्याचे आडवळण साधणारी एक परभाषापुष्ट विक्षिप्त शब्दकळा या दोहोंच्या संघातातून हा नवा अनुभव साकार करण्याचा प्रयत्न केला. "सुधारक"मध्ये यशस्वी. "सुधारक" लिहिणारे कवी म्हणूनच भविष्यकाळ ओळखील. त्यासाठी वापरलेला छंद हाही खास त्यांचा स्वतःचा आहे. ( ४ ) तरी एक विचित्र असमाधान. त्यांच्या कलात्मक साहसाला साथ करणारा कलात्मक समजत नव्हता. वाङ्मयीन व्यक्तित्वात कलावंताला आवश्यक असणारा तटस्थपणा नव्हता.

**१०८. कविविशेष व व्यक्तिविशेष माधव ज्यूलियन** : श्री. के. क्षीरसागर / तरुण भारत, पुणे, १४ डिसेंबर १९५८.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे माधवरावांच्या स्मृतिदिनानिमित्त दिलेल्या व्याख्यानाचा मो. रा. वाळंबे यांनी संपादित केलेला गोषवारा.

**१०९. कवी माधव जूलियन** : वि. वा. पत्की / रविवारची लोकसत्ता, २९ नोव्हेंबर १९५९.

स्मृतिदिनानिमित्ताने परिचयपर, माधवरावांशी निकट संबंधिताचा जिव्हाळ्याचा लेख. नव्या आठवणी, माहिती. परिचयातील अप्रसिद्ध प्रसंग सांगणारा विस्तृत लेख. ( १ ) माधवरावांचा मृत्यू एका व्यक्तीचा नसून एका कविसंप्रदायाचा. ( २ ) आठवणी. ( अ ) माधवरावांविषयी विद्यार्थ्यांत प्रेम, आदर. ( ब ) ना. सी. फडके वक्ते, माधवराव अध्यक्ष असे एक व्याख्यान. ( क ) पुण्याबद्दल प्रेम. 'निवान्त'-मधील आठवण. १९३७ पर्यंत "दौलत" ( फडक्यांची कादंबरी ) वाचली नव्हती. ( ड ) कै. सी. बा. जोशी यांच्या "बनमाला" काव्यसंग्रहाला प्रस्तावना. ( इ ) डी.लिट्. ( ई ) 'मनोहर'मधील १९३८ च्या पत्कींच्या लेखाच्या निमित्ताने माधवरावांच्या जीवनाचे धावते दर्शन. ( ३ ) त्यांच्या काव्याची मोहिनी, सौंदर्य. शब्दयोजना. ( ४ ) वैयक्तिक थोरवी.

**११०. कवी माधव-ज्युलियन** : उषा पोतदार / द स्टाफ मिसलनी, श्री शाहू मंदिर महाविद्यालय, पुणे १९६१–६२.

महत्त्वाचा, विस्तृत टीकालेख. ( १ ) माधवरावांच्या काव्यप्रकृतीमध्ये एक मोठा अंतर्गत संघर्ष आहे. त्यांच्या आंतरिक आणि काव्यांतर्गत व्यक्तिमत्त्वामध्ये एक फार मोठे दुभंगलेपण आहे. पण हे व्यक्तित्व पूर्णपणे दुभंगलेले नव्हते हे भावकवितेला बाधक. ( २ ) माधवरावांची प्रकृती ही खरी विचारवंताची होती. माधवराव खऱ्या अर्थाने "सुधारक"मध्ये आहेत. या दोन मुख्य प्रमेयांच्या ('शोधां'च्या) अनु-

संगाने माधवरावांच्या कवितेतील लोकविलक्षण प्रेमभावना; त्या काव्याच्या भावकाव्य-स्वरूपाच्या मर्यादा, अपुरेपणा. तिच्या अभिव्यक्तीच्या मर्यादा व सामर्थ्य. परिष्करणाच्या हव्यासाने मूळ काव्याला तडे गेले —"सुधारक"मधील उपहास; त्यामागे सखोल कणव. "सुधारका"तील स्वभावचित्रण. माधवराव विचारवंत होते, पण तत्त्वज्ञानी नव्हते.

१११. **माधव ज्युलियन : एक आत्मचिंतन** : सरोजिनी वैद्य / महाराष्ट्र टाइम्स, रविवार, २ डिसेंबर १९६२.

पटवर्धनांच्या २३ व्या पुण्यतिथीच्या निमित्ताने आलेला छोटा लेख. पटवर्धनांसंबंधीचे नव्या पिढीतील वाङ्मयाभ्यासिकेने कुतूहलयुक्त, आदरपूर्ण चिंतन म्हणून महत्त्व. पटवर्धनांना उद्देशून केलेले 'आत्मचिंतन'. वाङ्मयसमीक्षणात्मक लेख नव्हे. लेखिकेच्या मनावरील संस्काराचे चित्र. पटवर्धनांविषयीच्या आत्मभावनांचा आविष्कार. त्याच्या वेगळ्या स्वरूपामुळे लक्षणीय. (१) पटवर्धनांच्या जीवनाभोवती आणि काव्याभोवतीही गूढरम्य आकर्षकतेचे वलय.—व्यक्तिमत्त्वातील एकाकीपणा. अगदी सामान्य गोष्टीसाठी मोठा झगडा द्यावा लागला. त्यामागे प्रखर ध्येयवाद नव्हता एकाकीपणाने स्वतःशी व इतरांशी नित्य झुंज. (२) काव्याचे नवे मूल्यमापन सुरू झाले. तत्कालीन नावीन्याची झळाळी ओसरली. काही ओळींत सच्चेपणा. पुढे मिसळ.

११२. **अनुदार व्यवहारवादी संप्रदायाचे औद्धत्य कै. माधवराव पटवर्धन : प्रेमकल्पना आणि प्रेमजीवन** : श्री. के. क्षीरसागर / केसरी, शुक्रवार, २९ नोव्हेंबर १९६३. [ "स्वप्नभूमी"च्या प्रस्तावनेत याच लेखातील आशय अधिक मोकळेपणाने, उघडपणाने आला आहे. ]

(१) 'रोमॅण्टिक कवीं'ची कविता समजून घेताना कवीच्या अंतरंगात आणि अनुभूतीत शिरावयास हवे. (पु. ग. सहस्रबुद्धे, रा. व. आठवले यांवर प्रच्छन्न टीका)—स्त्री-प्रेमावरील कविता.—'स्त्री-पुरुषांमधील प्रेम हे एक आकर्षणही आहे आणि एक धाडसही आहे.' प्रिय व्यक्तीने दिलेले दुःख म्हणजे कृपाप्रसाद. 'रोमॅण्टिक प्रेमा'तील ही अपार सात्त्विकता— ही स्त्रीपुरुषांतील 'मधुराभक्ति'...माधवराव पटवर्धनांनीच मराठीत...आणली. (२) तरुण मुलीबद्दल निष्काम आकर्षण. असे आकर्षण माधवरावांना पुण्यातील एका 'धिटुकल्या पोरी'बद्दल. (३) पण 'रविकिरण मंडळातीलच बायॉलॉजीचे प्रोफेसर, हार्ट स्पेशालिस्ट नाना रानडे, माडखोलकर यांच्यासारख्या धूर्त आणि धोरणी वास्तववाद्यांनी माधवराव पटवर्धनांसारख्याच्या ध्येयात्मक प्रेमाचा फैसला करायला बसणे यासारखी ध्येयवादाची क्रूर थट्टा कोणती असू शकेल?' 'या अनुदार व्यवहारवादी संप्रदायाने माधवरावांची

चौकशी करण्याचे जे औद्धत्य दाखविले त्याच्यापुढे विठ्ठलराव घाटे यांच्यासारख्या महाबुद्धिमान आणि दिलदार मित्रानेही मान तुकवावी हे पहिले आश्चर्य'; माधवरावांचे आकलन करण्याच्या कामी विठ्ठलराव ढुंके पडले.—' जे कित्येक पंडितांना जमत नाही ते सामान्य प्रांजल बुद्धीच्या माणसांना जमते.'

**११३. कविवर्य माधव जुलियन** : अविनाश केळकर / कौस्तुभ, मे १९६४.

**११४. सहृदय कविश्रेष्ठ–माधव जूलियन** : बि. बा. पत्की / महाराष्ट्र टाइम्स, रविवार, २९ नोव्हेंबर १९६४.

**११५. प्रास्ताविक** : श्री. के. क्षीरसागर / प्रस्तावना, "स्वप्नभूमी" / २८ नोव्हेंबर १९६५ / पृ.सात ते एकवीस. यातील काही भाग 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका', जुलै–सप्टेंबर १९६५ च्या अंकात मुद्रित. 'केसरी', २९ नोव्हेंबर १९६३ च्या अंकातील क्षीरसागरांच्या लेखातही [पहा, क्र. क. २-११२] यातील काही प्रतिपादन आले आहे.

माधवरावांच्या चरित्राचे विशेष. 'पुरोगामी म्हणून मिरविणाऱ्या व्यक्तींकडून ज्याची पुरोगामित्वाबद्दलच नालस्ती व गांजणूक झाली, अशा एका सरळ पण स्वतंत्र प्रज्ञेच्या कवीचे ते चरित्र आहे.' माधवरावांच्या व्यक्तिमत्त्वाचे विश्लेषण. माधवरावांच्या जीवनात आलेल्या स्त्रियांबद्दल अवहेलनेचे उद्गार.–माधवरावांच्या व्यावसायिक शत्रूंनी केलेला त्यांचा चारित्र्यघात.–बरदाप्रकरणावर भाष्य.–रविकिरण मंडळातील व्यवहारवादाच्या भोक्त्यांवर टीका.

**११६. माधवराव पटवर्धन यांची प्रीतिकल्पना** : सु. रा. चुनेकर / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल–जून १९६६ / पृ. ३९–४३.

प्रेमानुभूती ही पटवर्धनांच्या काव्यलेखनामागील प्रमुख प्रेरणा. त्यांची प्रेमकल्पना मुख्यतः त्यांच्या भावकवितेतून प्रकट झाली आहे. "गज्जलांजलि", "तुटलेले दुवे", "स्वप्नरंजन" यांतील कवितांतून आकारणाऱ्या प्रेमकहाण्या परस्परांशी मिळत्या-जुळत्या आहेत.–त्यांच्या बहुतेक प्रेमकवितांतून प्रेमसाफल्याच्या आशंकेतून किंवा वियोगातील स्मृतिरंजनातून निघालेला अतृप्तीचा सूर भरून राहिला आहे.–पटवर्धनांच्या कवितांतील प्रेमभावनेचे वर्णन.–'संगमोत्सुक डोह' व 'प्रेम आणि मरण' यांची तुलना.

**११७. माधवजूलियन आणि शोपेनहॉर** : पंडित आवळीकर / "वाङ्मयचिंतन", लेखसंग्रह, पंडित आवळीकर / १९६७ / पृ. १८९–१९६.

शोपेनहॉर [Schopenhauer] चा The Metaphysics of Love' निबंध

माधवरावांनी वाचलेला. या निबंधातील शोपेनहौरची प्रेमकल्पना व माधवरावांची प्रेमकल्पना यांची तुलना. शोपेनहौर प्रेम ही एक भावना न मानता वासना, विकार (Passion) मानतो. तिचे मूळ लैंगिक प्रवृत्तीत आहे. जातिवर्धन, जातिरक्षण, जातिसातत्य यासाठीच व्यक्तीचे अस्तित्व असते.–वासनावैफल्य दुःखद खरे, पण वासनासाफल्य त्यापेक्षा सुखाहून दुःखालाच कारण होते – शोपेनहौर आणि माधव जूलियन यांच्या प्रेमकल्पनेत अंतर. माधवराव प्रेम हा मनोभाव मानतात. अशरीरिणी प्रीती. –स्त्रीविषयक कुतूहल, आदर, भय माधवरावांच्या डोळ्यांत दिसतात –माधवराव वासनेच्या धगीत जळत, फुलत असल्याचे त्यांच्या कवितेत दिसत नाही. ते स्वतःच पुष्कळसे Cold–blooded आहेत असे वाटते.–' प्रेमाला Passion चे स्वरूप देऊन अखेर त्याच्या तृप्तीमुळे कसा स्वप्नभंग किंवा भ्रमनिरास (Disillusionment) होतो हे शोपेनहौरच्या निबंधामुळे माधवरावांच्या लक्षात आले असावे आणि त्यामुळे त्यांची विशिष्ट प्रेमकल्पना बनलेली असावी.'

११८. प्रणयपंढरीचे ज्ञानेश्वर माधव जूलियन : गोपीनाथ तळवलकर / महाराष्ट्र टाइम्स, रविवार २६ नोव्हेंबर १९६७.

[ १९६३ साली तळवलकरांचे महाराष्ट्र साहित्य परिषदेत माधव जूलियन स्मृति-दिनानिमित्त व्याख्यान [ पहा, क्र. ड. १. २२ ]. त्यातलाच बराच भाग लेखरूपाने हा असावा. मात्र त्या व्याख्यानाच्या शेवटी ' माधव जूलियन प्रणयपंढरीचे वारकरीच राहिले; मोक्षापर्यंत पोचले नाहीत. प्रेमातील आध्यात्मिकतेपर्यंत ते गेले नाहीत.' हा मुद्दा असावा. तो या लेखात नाही. ]

१. आठवणी. ( १ ) पाचोरा स्टेशनावरील गाडीतील भेट. इराणी कुटुंबासमवेत पर्शियनमध्ये गप्पा.–' त्यांच्या प्रतिक्रिया बहुतेक वेळा लहान मुलासारख्या असत.' चटकन रागाचा पारा चढे. तितक्याच लौकर मोकळेपणाने हसू बोलू लागत. ( २ ) ग्रीन्स हॉटेलात इच्छाभोजन. ' माधवरावांचे स्वैरालापसुद्धा अतिशय चित्ता-कर्षक असत.'–टिप देण्याच्या निमित्ताने संतप्त.– ' कधी न्यायाचा उमाळा, तर कधी औचित्यविचार, कधी अचूकपणाची दक्षता, तर कधी भाषाशुद्धी–यांपैकी काय कारण माधवरावांच्या खवळण्याला होईल याचा अंदाज बांधणे कठीण असे.'– तांब्यांनी एका बैठकीत माधवरावांना कविता म्हणावयास सांगितल्या. तो त्यांना अनुग्रह वाटला. उलट, एका बड्या धेंडाला ' तुम्ही माझ्याकडे येऊ नका. आपली मने एकमेकांबद्दल शुद्ध नाहीत.' असे बजावले. ' माधवरावांना सौजन्याचा मुखवटा चढवून कधीच वागता आले नाही.' ते त्यांच्या व्यावहारिक अपयशाचे, व साहित्यिक थोरवीचे कारण. ( ३ ) विक्षिप्त असामीसाठी ओव्हरटीन. ( ४ ) श्री. के. क्षीरसागरांना अर्पणपत्रिका. २. ' अनन्यगतीचे वेड ' माधवरावांचा स्थायीभाव होता. रोमँटिक

प्रेमकल्पनेला माधवरावांनी फार उंचीवर बसविले. 'उदात्त, निरपेक्ष समर्पणाची कल्पना' माधवरावांचा कळसाचा विशेष. 'रोमँटिक प्रेमाच्या तळमळीतून मुक्तीचा मार्ग दाखविणारा उद्गाता'. प्रेम ही एक उदात्त साधना आहे. संकुचित आत्मनिष्ठेतून मुक्तता.–साधकाच्या अनेक अवस्था माधवरावांनी आपल्या कवितेतून दाखविल्या आहेत.

**११९. निवेदन** : ग. त्र्यं.माडखोलकर / प्रस्तावना, "मी आणि माझे साहित्य" [ लेखसंग्रह, ग. त्र्यं. माडखोलकर, जानेवारी १९६८ ]

आपल्या कादंबरीलेखनामागील व्यक्ती व घटना यांच्यासंबंधाने निवेदन करणारे प्रास्ताविक. त्यात "भंगलेले देऊळ"च्या निमित्ताने माधवराव व शांताबाई कशाळकर यांच्याविषयी बराच भाग ( पृ. ७ ते २९ ). माडखोलकरांना काय नेमके म्हणावयाचे आहे ते कळत नाही. माधवरावांविषयी तिटकाऱ्याचे, प्रच्छन्न निंदेचे उद्‌गार आहेत; उघड, स्पष्ट गौरवाचे आहेत. मात्र जे आहे ते व्यक्ती माधवरावांविषयी; त्यांच्या वाङ्मयाविषयी नव्हे.—'डॉ. पटवर्धन हे विलक्षण आत्मकेंद्रित, अहंकारी आणि शिवाय आत्यंतिकही ( extremist ) होते.' 'मित्रत्वाचे पर्यवसान शत्रुत्वात केव्हा कोणत्या कारणामुळे होईल याचा नेम नसे.'—स्वतःच्या कवितेच्या माडखोलकरांना दिलेल्या वह्या त्यांच्याकडून परत घेऊन फाडून टाकल्या.—श्री. कृ. कोल्हटकरांकडे फर्गसन प्रकरणाबद्दल माडखोलकर बोलले त्याविषयी माधवरावांचे मत विपर्यस्त झाले.—वरदाविषयी प्रणयनिरपेक्ष विशुद्ध स्नेहाची त्यांची भूमिका. कौतुकयुक्त स्नेह. माधवरावांच्या जीवनातील मनोभंगाचे तीन प्रसंग.—'इतक्या उत्कट भावनांचा, इतक्या हळव्या मनाचा आणि इतक्या वादळी वृत्तीचा दुसरा कवी मी पाहिला नाही.'—'त्यांचे ते प्रेम आणि आकर्षण आक्रमक नव्हते, तर चिंतनैकशील होते.' 'मानसपूजा हे त्यांच्या प्रणयाचे वैशिष्ट्य.' 'स्वप्नाळू निष्क्रिय प्रेमिक.'—'आत्मकेंद्रित आत्यंतिकता आणि तज्जन्य आततायीपणा'

**१२०. मराठी काव्यात फुललेला इराणी गुलाब माधव जूलियन** : बालशंकर देशपांडे / वसुधा, जून १९६९ / पृ. २७ ३४.

सामान्य लेख.

**१२१. माधव जूलियन : काव्यदर्शन** : सु. रा. चुनेकर / युगवाणी, नोव्हेंबर–डिसेंबर १९६९ ( दिवाळी अंक ) / पृ. ३२३–३२८, ३३४. [ आकाशवाणी पुणे, भाषण, विद्यापीठासाठी, ३० जुलै १९६७. समाविष्ट : "सहा साहित्यकार", लेखसंग्रह, सु. रा. चुनेकर, १९८२ / पृ. ९४–१०६ ].

माधव जूलियनांच्या कवितेत भावार्त चित्ताच्या एकलेपणाची व्यथा सर्वत्र व्यापून

राहिली आहे.—मनाच्या गाभाऱ्यात जपलेले त्यांचे अंतरंग खुले होते ते त्यांच्या कवितेत.—कोणाच्याही पुढे कधी खुले न केलेल्या त्यांच्या दुर्भेद्य हृन्मंदिराचे त्यांच्या कवितेतून येथे दर्शन घडविले आहे.—माधवरावांच्या कवितेचा स्थायिभाव असणाऱ्या अस्वस्थतेची मीमांसा.— त्यांची प्रकृती मूलतः आत्मकेंद्रित, अहंवादी, आत्मनिष्ठ कवीची माधवरावांच्या वृत्तीतील पोरकेपणाचा भाव त्यांच्या कवितांतून कसा आविष्कृत झाला आहे याचे त्यांच्या कवितांतून दर्शन.—' ही कहाणी आहे श्रेयाच्या प्राप्तीसाठी तगमगणाऱ्या अतृप्तीची. जीविताच्या प्रवासात साथसंगतीसाठी आसावलेल्या, पण अंतर्यामी एकाकीच राहिलेल्या पोरक्या प्रेमपिपासू जीवाची. हे अंतरंग आहे बाह्य लौकिक जीवन आणि गूढ आंतरिक जीवन यांतील विरोधात पिळवटून निघालेले. '

**१२२. कवि माधव जूलियन : एक विलक्षण व्यक्तिमत्त्व :** पुरुषोत्तम आडिवरेकर, रविवार मराठा, पुरवणी, ७ डिसेंबर १९६९, पृ. ४.

**१२३. ' पन्नास वर्षांपूर्वी ' :** ग. त्र्यं. माडखोलकर / ( १ ) " गुरुवर्य प्रा. शं. के. कानेटकर ( कविवर्य गिरीश ) अमृत महोत्सव गौरवस्मरणिका ", ऑक्टोबर १९६९/ संपा. म. अ. कुलकर्णी. ( २ ) युगवाणी, जानेवारी १९७०. [ समाविष्टः " व्यक्ति तितक्या प्रकृति ", ग. त्र्यं. माडखोलकर, ऑक्टोबर १९७० ]

गिरीशांच्या निमित्ताने लिहिलेल्या या लेखात माधवरावांवरच कुत्सित लेखन. त्याने बरबटलेला, खोटा, विपर्यस्त, दीर्घ द्वेषातून निघालेला. माधवरावांचे प्रतिमाभंजन करण्याचा कडोनिकडीचा प्रयत्न करणारा.–प्रो. माधवराव पटवर्धनांचा आढ्यताखोर स्वभाव. गिरीश–गोखले आणि माडखोलकर यांच्याशी माधवरावांच्या वागण्यातील स्वार्थी तरतमभाव. प्रत्येक बाबतीत टोकाला जाणारा अतिरेकी स्वभाव. – वरदा-प्रकरणी माधवरावांचे चाहते श्री. बा. रानडे यांना दूषणे देतात. ' तथापि मला ती योग्य वाटत नाहीत. नानांच्या हातून अत्यंत सद्‌भावनेने काही चुका कदाचित् अभावितपणाने घडून गेल्या असतील. पण प्रो.पटवर्धन यांचे होस्टेलच्या सुपरिंटेंडेंटच्या दर्जाला न शोभण्यासारखे जे उल्लूपणाचे वर्तन झाले, त्याचाच मुख्यतः त्यांच्या हितशत्रूंना काव्याचा नायटा करण्याच्या कामी फायदा घेता आला, हे उघड आहे.' शंकरराव कानेटकरांनी या प्रसंगी माधवरावांची बाजू संभाळली याचे विशेष कौतुक. ' विशेषतः माधवराव हे आपल्या कृपण, संशयी स्वभावानुसार, पैशाच्या व्यवहाराच्या बाबतीतही त्यांच्याशी वाईट वागलेले असतानादेखील ! '–खुनशी पण तितकीच भीरू मनोवृत्ती.

[ याच स्मरणिकेतील ' अवघाचि संसार ' या आपल्या लेखात श्री. बा. रानडे या प्रसंगाच्या संदर्भात जाता जाता लिहितात, ' अतिरिक्त ध्येयनिष्ठेच्या भरात श्रीधरांनी स्नेह तोडणारे निष्ठुर शब्दाघात केल्यामुळे माधव जूलियन तर दुखावलेच...' ]

**१२४. प्रणयपंढरीचा वारकरी :** वि. मा. दी. पटवर्धन / अमृत, दिवाळी अंक, नोव्हेंबर १९६९ / पृ. १२०–१४३.

माधवराव–वरदासंबंधी प्रथमच प्रकाशित होणारी, स्वतः वि. मा. दी. पटवर्धनांशी संबंधित माहिती. वि. मा. दी. पटवर्धन माधवरावांचे विद्यार्थी, तसे शेजारी. माधवरावांविषयी भक्तियुक्त आदर. वरदा–माधवराव परिचयाच्या हकिगतीही त्यांनी सांगितल्या आहेत. वरदाचे प्रत्यक्ष चित्रण असे हे एवढे प्रथमच.—विद्यार्थ्यांचे माधवरावांवरील प्रेम, विश्वास. माधवरावांच्या बाजूने सह्यांचे निवेदन प्रि. परांजप्यांना. विद्यार्थ्यांनी घोषणा देत कॉलेजात उडवलेली धमाल. पुढे चौदा वर्षांनी याबद्दलची माधवरावांची वृत्ती.–यात महत्त्वाचा नवा मुद्दा : माधवरावांवर प्रि. केशवराव कानिटकरांनी [ हंगामी प्राचार्य] किटाळ आणले याचे कारण–त्यांचे उद्गार, " मि. पटवर्धन बॉज अ व्हेरी प्रॉमिसिंग ब्राईडग्रूम ! " कानिटकरांची मुलगी लग्नाची. ' जेलसी, दाय नेम ईज वूमन. ' दुसरा आक्षेप श्री. बा. रानड्यांसंबंधी. त्यांना अशा आंतरप्रांतीय विवाहाचे आकर्षण. त्यामुळे हौसेने, उत्साहाने त्यांनी माधवरावांना पूर्वकल्पना न देता वरदा–माधवराव भेटीचा घाट जुळवून आणला. ( त्यासंबंधी माधवरावांचे कटू उद्‌गार.) वि. मा. दी. पटवर्धन माधवरावांना तेव्हा म्हणाले, "तुमच्या डोक्यावर सोसायटीची टांगती तलवार आहे, हे माहीत असूनही त्यांनी जो तुमच्या अचानक भेटीचा धाडसी प्रयोग केला, तो केवळ त्यातील थ्रिल एंजॉय करण्याकरता." (या लेखात लालित्यासाठी कल्पनाविलास अधिक केलेला असावा. विश्वसनीयता संशयास्पद.)

**१२५. माधव जूलियन : " मराठीचे उमरखैयाम : "** मगनलाल कामेकर/यशोदीप [ यशवंत महाविद्यालय, नांदेड, वार्षिक ], १९६९-७० / पृ. ४१-४३ / पुनर्मुद्रित, ' लोकविजय ', बुधवार, २१ जानेवारी १९७०.

सामान्य लेख.

**१२६. माधव ज्यूलियन : एक न सुटलेले कोडे :** द. न. गोखले / केसरी, लेखांक १ – रविवार, २८ नोव्हेंबर १९७१ / लेखांक २ – रविवार, ५ डिसेंबर १९७१ / लेखांक ३ – रविवार १९ डिसेंबर १९७१.

माधवरावांच्या चरित्रातील काही कोड्यांचा काही अप्रकाशित साधनांच्या आधारे उलगडा करण्याचा, त्रुटित प्रयत्न. अशा साधनांचा परिचय. – अशा प्रकारच्या लेखाची आवश्यकताच नव्हती. लेखांत काही चुका.

**१२७. माधवरावांच्या मातुश्री उमाबाई :** कमल गोखले / केसरी, रविवार दि. ९ जुलै १९७२ / अर्धे पृष्ठ.

कमल गोखले यांच्या आत्याबाई व आई यांच्या आठवणींवर आधारून माधवरावांच्या मातुश्री उमाबाईंचा करारीपणा, कर्तृत्व, थोरवी सांगणारा लेख. काही

माहिती नव्याने कळते. 'प्रत्यक्ष अनुभव आणि मिळालेली माहिती सांगून उमाबाईंचे व्यक्तिमत्त्व, त्यांचे करारी, शिस्तशीर, स्वाभिमानी आणि कणखर स्वभावचित्र येथे उभे करण्याचा प्रयत्न केला आहे.' (१) त्रिंबकराव (माधवरावांचे वडील) आजारी पडले तेव्हा उमाबाई शुश्रूषेला आवळसला गेल्या. – उमाबाईंची भावजय घर सोडून माहेरी गेली. त्याचे खापर उमाबाईंवर फोडले. – पुण्याला उमाबाईंकडे त्रिंबकराव येऊन राहिले. त्रिंबकराव गबाळे. उमाबाईंना शिवीगाळ, मारहाण करीत. आळीतील सारी मुले त्यांची टिंगल करीत.–माधवरावांनी त्रिंबकरावांना कोल्हापूरला नेण्यासाठी टांग्यात घातले. पण ते मध्येच उतरले. –उमाबाईंचे करारी व्यक्तिमत्त्व. सर्वत्रांच्या मदतीला जात. व्यवस्थित राहणी. उमाबाई फार जुन्या वळणाच्या होत्या. –संसारातील कटुतेचा दोष त्रिंबकरावांकडेच. त्रिंबकराव उमाबाईंना शत्रू म्हणत.

**१२८. माधव ज्युलियन—आधुनिक मराठी कवींमधील एक आगळे व्यक्तित्व :** ग. वि. करगुप्पीकर / मराठा, ३ डिसेंबर १९७२ / पृ. २.

**१२९. भास्करराव आणि माधवराव :** वि. द. घाटे / सत्यकथा, जानेवारी १९७३ / पृ. २१ – २३. [ समाविष्ट, "विचारविलसिते", लेखसंग्रह, वि. द. घाटे / १९७३ / पृ. ११८–१२० ].

'भास्कररावांचे [ तांबे ] जीवन त्यांच्या काव्यासाठी होते. माधवरावांचे काव्य त्यांच्या जीवनासाठी, त्या जीवनातील संघर्ष, समस्या आणि संकल्प व्यक्त करण्यासाठी होते.' – "सुधारक" ही माधवरावांच्या आत्म्याची – त्यांच्या अंतर्जीवनाची आत्मकथा आहे. भास्कररावांना "सुधारक" लिहिता आले नसते. – 'काव्य' हेच भास्कररावांचे आराध्यदैवत होते. माधवरावांची अनेक दैवते होती. काव्य हे माधवरावांचे साधन होते.

**१३०. माधव जूलियन : एक चरित्रात्मक कादंबरी :** [ टिपण ] द. भि. कुलकर्णी / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९७३ / पृ. ७०–७२.

**१३१. एक मनस्विनी "शांताबाई कशाळकर" :** यशवंत शास्त्री / राजस, दिवाळी अंक १९७३. [ समाविष्ट : "यशवंत बाळाजी शास्त्री", आत्मचरित्र / १९७५ / पृ. १६८–१८२ ].

वाईट लेख. – शांताबाईंच्या मृत्यूनंतर यशवंत शास्त्र्यांचा 'तरुण भारता'त (नागपूर) शांताबाईंवर लेख आला होता,: त्यातील काही भाग या लेखात. – शांताबाईंनी मुलींसाठी चालविलेल्या होस्टेलात शास्त्री राहात असताना, त्या ठिकाणचे गैर अनुभव. ते विस्ताराने सांगितले आहेत. – लद्दी प्रकरण. – माधवरावांचे उल्लेख, पण तेही अर्धवट.

**१३२. माधव ज्यूलियन यांच्या जीवनातील रोमँटिसिझमचा बोजवारा :** श्री. के. क्षीरसागर / 'मनोरा' (पुणे), ऑगस्ट १९७४ / पृ. ४७–४९. 'कारण मी रोमँटिक आहे' या क्षीरसागरांच्या लेखमालेतील चौथा लेख.

एकांगी, पूर्वग्रहदूषित लेख. "स्वप्नभूमी"च्या प्रस्तावनेत माधवराव–शांताबाई हेर्लेकर संबंधासंबंधी जे म्हटले होते तेच अधिक भडकपणे या लेखात. शांताबाईंविषयी हेटाळणीचे लेखन.–माधव ज्यूलियन प्रेमासंबंधीच्या आणि सामाजिक सुधारणेसंबंधीच्या ध्येयवादापुरते महाराष्ट्राचे 'शेले'. प्रत्यक्ष जीवनात रोमँटिसिझमचा प्रयोग करणाऱ्यांचे ते आद्यप्रवर्तक.

**१३३. माधवराव : स्वप्नसृष्टी आणि व्यवसायातील मत्सर :** श्री. के. क्षीरसागर / 'मनोरा', सप्टेंबर १९७४ / पृ. ३–६. 'कारण मी रोमँटिक आहे' या लेख-मालेतील लेख.

भडक, एकांगी, विपर्यस्त विवेचन. रविकिरण मंडळाच्या सदस्यांवर आत्यंतिक, विपर्यस्त टीका. क्षीरसागरांनी इतरत्र लिहिल्यापेक्षा नवीन नाही, जास्त भडक. १. माधवराव एकीकडे कर्तव्य व कायदा यांचे कडक पालन करणारे; दुसरीकडे काही दृष्टींनी स्वप्नाळू. कामुक नसून स्त्रीपूजक. २. स्वप्नाळूपणा व्यवसायातही नडला. व्यवसायक्षेत्रीय मत्सराशी लढत देण्यास अपात्र ठरले. 'फर्ग्युसनमध्ये बुद्धिमान आणि धीट मुलगी.' त्याबाबतचे प्रकरण. त्यातली शोकांतिका. ३. रविकरण मंडळातील सदस्यांच्या या प्रसंगीच्या वर्तनावर टीका.—'हळव्या सौंदर्यवाद्याचा व्यवहार-वादी शत्रूंनी आणि न पारखता पत्करलेल्या मित्रांनी बळी घेतला.' 'माधवरावांवर शत्रु मित्रांनी अन्याय केला ही खरी ट्रॅजेडी नसून, ते माधवरावांनी जिवाला इतके लावून घेतले ही खरी ट्रॅजेडी होय!'

**१३४. खामोशी गुफ्तगु है आज बेजबाँ जबाँ मेरी :** श्री. के. क्षीरसागर / गोमंतक, दिवाळी अंक, १९७५ / पृ. ११३–११७.

"तसवीर आणि तकदीर" या क्षीरसागरांच्या आत्मचरित्रातील माधव जूलियन यांच्या जीवनातील विविध क्षण टिपणारा भाग या लेखांकात आला आहे.

**१३५. माधवराव पटवर्धन आणि आम्ही तिघे :** श्री. के. क्षीरसागर / पौरुष, दिवाळी अंक, १९७५ / पृ. ६९–७२.

"तसवीर आणि तकदीर" या क्षीरसागरांच्या आत्मचरित्रातील प्रकरण. क्षीर-सागर, गोपीनाथ तळवलकर, भय्यासाहेब उमराणी यांच्या संबंधाविषयी आठवणी. माधवरावांविषयी फारसे नाही.

**१३६. प्रणयपंढरीचा वारकरी** ( मा. त्र्यं. पटवर्धन ) : श्रीकांत कासकर / गोमंतक, ३० नोव्हेंबर १९७५ / पृ. ३.

**१३७. मराठीतला पहिला प्रेमकवि :** नाना राघव / साप्ता. परी ( मुंबई ), रविवार ११ एप्रिल १९७६ / पृ. १२.

मुंबई मराठी साहित्य संघात २०, २१, २२ मार्च १९७६ या दिवशी 'माधव जूलियन : प्रेमजीवन आणि प्रेमकविता' या विषयावर डॉ. द. न. गोखले यांनी गुंफलेल्या व्याख्यानमालेतील पहिल्या दिवशीच्या व्याख्यानाचा सारांश.

**१३८. माधव जूलियन : प्रेमजीवन आणि प्रेमकविता :** द. न. गोखले / लेखांक पहिला. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल–मे–जून १९७६, अं. १९७ / पृ. २०-२७.

मुंबई मराठी साहित्य संघाच्या कै. हरि नारायण आपटे व्याख्यानमालेत दि. २०, २१ व २२ मार्च १९७६ रोजी दिलेल्या व्याख्यानांच्या आधारे ही लेखमाला तयार केली आहे. त्यांतील पहिला लेख.

माधवराव पटवर्धन या आगळ्यावेगळ्या माणसाचे वास्तव प्रेमजीवन आणि त्याची प्रेमकविता यांत कोणता अनुबंध होता ? माधवरावांच्या बाबतीत प्रत्यक्ष प्रेम आणि प्रेमकविता यांत कोणते नाते होते ? दोन्हींत प्रेमाची जी रूपे दिसतात ती किती सदृश, असदृश किंवा विसंगत होती ? किती सुसंगत, असंगत, किंवा विसंगत होती ? दोन्हींचा परस्परांवर कोणता परिणाम होत असे ? ही दोन प्रेमरूपे त्या संपूर्ण मनुष्याच्या घडणीत कशी सहभागी झाली होती ? अशा प्रश्नांचा शोध घेण्याचा प्रयत्न या लेखमालेत केला आहे.

माधवराव–शांताबाई ( हेर्लेकर ) यांच्या प्रेमसंबंधाचा माधवरावांच्या काव्यावर परिणाम. अनेक कवितांमागे हा प्रेमानुभव.–हा मुख्य सिद्धान्त. त्याचे विस्ताराने, कवितांच्या आधाराने विवेचन. 'जे प्रत्यक्ष जीवनात घडले, त्याचा संदर्भ घेऊन व शांताबाईंना दृष्टीसमोर ठेवून त्यांनी कितीतरी कविता लिहिल्या.'

[ भाष्य : ( १ ) शांताबाई माधवरावांच्या मनात स्मृतिरूपाने, किंवा प्रतिमा-रूपाने राहिल्या—या विधानात नवीन नाही. माझ्या पुस्तकात सूचनेने ते आले आहे. ( " माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन ", पृ. १०–११ ). येथे माहितीचे काही कण, किंवा तपशील थोडा अधिक मिळेल.

( २ ) या लेखाच्या बैठकीशी माझा मूलभूत मतभेद. जीवन आणि काव्य यांचा संबंध–काव्यनिर्मितीची प्रक्रिया– आत्माविष्कार याचा अर्थ, वास्तव आणि कल्पित यांचे मिश्रण–माधवरावांची स्वतःची भूमिका या प्रश्नांकडे येथे दुर्लक्ष झाले आहे.– यामुळे काही कविता मर्यादित होतात. 'संगमोत्सुक डोह'चे असे झाले आहे. सु. रा. चु. ]

—लेखांक दुसरा, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९७६, अं.१९८, पृ. ११३–१३२.

[ या विवेचनात तसे नवीन काही नाही. या लेखाचे प्रयोजन, प्रतिपाद्य सूत्र काय तेही लक्षात येत नाही. माधवरावांचे जीवन, व्यक्तित्व, काव्य यांचे काही अधिक आकलन होते असे नाही. ]

१. शांताबाईंचे कशाळकरांशी लग्न झाले. त्यानंतर त्या 'मानसी' प्रतिमा म्हणून माधवरावांजवळ उरल्या. ही 'मानसी' प्रत्यक्षातल्या शांताबाईंपेक्षा वेगळी; स्वतःला हवी तशी करून घेता येत होती. कवितेत इष्ट-पूर्ति-चिंतन. ( काही कवितांचे विवेचन. "विरहतरंगा"तील इंदूचे बीज शांताबाईंत. )

२. ( १ ) शांताबाईंखेरीजही अन्य स्त्रिया माधवरावांच्या जीवनात आल्या. 'स्त्रीकडे नाना तऱ्हांनी आकृष्ट होण्याची आणि तिच्यासाठी हृदयदुःख सोसण्याची त्यांची शक्ती अमर्याद होती.' परंतु या सर्व स्त्रियांच्या केंद्रस्थानी शांताबाई राहिल्या.

( २ ) ज्या स्त्रिया माधवरावांच्या जीवनात प्रविष्ट झाल्या त्या त्यांच्या काव्यांतही प्रविष्ट झाल्या का ?

( ३ ) या प्रेमकवितेची मर्यादा. 'स्वानुभव नि स्वतःच्या भावना या पलीकडे ते फारसे जाऊ शकत नव्हते.'

( ४ ) 'पुण्याच्या कविता बडोद्याच्या कवितांच्या मानाने अनेक दृष्टींनी सरस आहेत.' याची मीमांसाः 'या काळात माधवराव स्वतःच्या भावनांपासून दूर उभे राहून त्या स्वतःच बघण्याच्या स्थितीत आले होते.'

( ५ ) माधवराव व त्यांच्या काव्यातील प्रेमिक यांच्यांतल्या नात्याचा विचार. 'माधवरावांचे व्यावहारिक रूप नि काव्यगत रूप ही बव्हंशी समान होती हे खरे आहे. पण ती रूपे सर्वथैव समान होती असे म्हणता येणार नाही.' या क्वचित् दिसणाऱ्या असमानतेची मीमांसा.

—लेखांक तिसरा. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी-जून १९७७, अं.२००-२०१ ( जोड अंक ) पृ. १६०-१७६.

[ काही थोडा माहितीचा तपशील अधिक. बाकी नवे फारसे नाही. ]

१. वरदा नायडू-माधवराव प्रेमभावनेचे स्वरूप व विश्लेषण. माधवरावांच्या जीवनात वरदेने गुप्त क्रान्ती घडविली होती. 'सामान्य प्रणयभावनेपेक्षा आगळी नि लग्न भावनेपेक्षा वेगळी अशी काही अनोखी भावना ( वरदेसंबंधी ) त्यांच्या मनात उद्‌भवली होती; आणि तिचे वर्गीकरण करणे, तिला नाव देणे त्यांना जमत नव्हते.' —माधवरावांच्या हृदयस्थ भावनेत सौंदर्यात्मकता, ध्येयात्मकता, आणि वात्सल्याची भूक या तीन छटा होत्या.

२. वरदेवरील प्रेमाचा मागमूस त्यांच्या प्रेमकवितेत शोधूनही फारसा सापडत नाही. ( 'तेथे चल राणी'चे विवेचन. ) त्याची मीमांसा. ( १ ) या कामासाठी जे क्रांतिकारी कवित्व आवश्यक होते त्यात माधवराव कमी पडले. [ अस्वीकार ].

( २ ) वरदेवरील प्रेमाचे आवर्त संपते न संपते एवढ्यात त्यांनी जणू प्रेमकवितेचा निरोप घेतला. ( ३ ) वरदेविषयीची भावना वर्णनीय वाटण्यापेक्षा चर्वणीय वाटली. [ अपुरे विवेचन ]. ( ४ ) व्यावहारिक अडचणींमुळे माधवरावांनी वरदेसंबंधीची आपली भावना काव्यात मुखर केली नाही.

३. वरदेशी ओळख झाल्याच्या काळात शांताबाई माधवरावांच्या मनात वागत होत्या, आणि त्यांच्यासंबंधीची प्रेमभावना ते काव्यात रंगवीत होते.

४. '१९२६ नंतरच त्यांच्यामधला आत्मकेंद्रित, प्रेमपरायण कवी परिवर्तन पावत जणू एक संशोधनमग्न विद्वान आणि समाजपरायण कार्यकर्ता झाला होता.' 'प्रीती'चा त्याग करून 'कीर्ती'ची कास धरण्याचा निश्चय त्यांनी पुढे अंमलात आणला. त्यांच्या स्वभावात मूलतः तीन प्रवृत्ती—( १ ) काव्यात्म प्रीतीमागे धावण्याची, ( २ ) ज्ञानाच्या संशोधनाची, ( ३ ) सामाजिक प्रतिष्ठा संपादन करण्याची. 'प्रीति'–'कीर्ती'ची ओढाताण.

[ कवितांच्या विश्लेषणात डॉ. गोखले उणे पडतात.

जीवन आणि कविता यांच्या संबंधासंबंधीची त्यांची भूमिकाच मुळात मला मान्य नाही.—सु. रा. चु. ]

**१३९. ( माडखोलकर-माधवरावविषयक नाना [ श्री. बा. ] रानडे यांची मुलाखत )** : सिरास, 'अरुंधती', जानेवारी १९७७. [ १ ]

**१४०. माधवराव पटवर्धन-संपादित साहित्य पत्रिका** : मंदाकिनी खोले / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर–डिसेंबर, १९७७, अं. २०३ / पृ. ४३–४७.

परिचयपर सामान्य लेख.

**१४१. मराठी कवींचा मानबिंदु : माधव जूलियन** : डॉ. व. दा. कुलकर्णी, अनुबंध ( गुलबर्गा ), जानेवारी–मार्च १९७८, पृ. २५–३७.

**१४२. वरदा–प्रकरणाचा रहस्य–भेद** : द. न. गोखले / 'रसिक', दिवाळी अंक, १९७८ / पृ. १०२–१०८.

द. न. गोखले यांनी स्वतःच्या "डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन" या चरित्र-ग्रंथाच्या लेखनामागील प्रेरणा, निर्मितीची प्रक्रिया, माधवरावांच्या जीवनातील विविध गोष्टींचा शोध कसा लागत गेला वगैरेंसंबंधी निवेदन करणाऱ्या लिहिलेल्या "एका चरित्राचे चरित्र!" या ( आगामी ) पुस्तकातील एक प्रकरण. वरदा–प्रकरणाचे धागेदोरे आपल्याला कसे उकलत गेले, आणि ते रहस्य कसे स्पष्ट झाले त्याचे कथन. 'माधवरावांना वरदेबद्दल खरोखर काय वाटत होते? वरदेला माधवरावांबद्दल काय वाटत होते?' याचा शोध. घाटे–गिरीश–खानोलकरादी माधवरावांच्या समर्थकांची

बाजू; सोसायटीची बाजू; वि. के. जोग-कानिटकर पक्षाची कुटिलता; सोसायटीच्या भूमिकेसंबंधात माधवरावांची भूमिका; माधवराव-वरदा स्नेहाचे स्वरूप; या स्नेहाचा गाढपणा, वेगळेपणा. वरदेची स्नेहभावना. नाना रानड्यांकडील मुंबई-भेटीची मीमांसा. [ लीलाबाई-वरदा नायडू यांचा पूर्वपरिचय असल्याचे गोखले म्हणतात; ते पूर्ण चूक. सु. रा. चु. ]

**१४३. ' तेथे चल राणी '** : श्री. के. क्षीरसागर / ' लोकसत्ता ', दिवाळी अंक, १९७८ / पृ. १२८-१३२.

डॉ. द. न. गोखल्यांनी आपल्या चरित्रग्रंथात या कवितेसंबंधाने जे म्हटले आहे, त्याचा काहीसा प्रतिवाद करण्याच्या निमित्ताने हा लेख. क्षीरसागरांनी इतरत्र अनेक वेळेला म्हटले आहे तेच येथे.—या कवितेत माधवरावांनी प्रेमातील ध्येयवादाचा आविष्कार केला आहे. माधवराव Love Mystics च्या ( प्रेमसाक्षात्कारमार्गी ) जातीतील होते.

**१४४. प्रणयपंढरीचा वारकरी माधव जूलियन** : प्रा. अविनाश केळकर ' पिसारा ', दिवाळी अंक, १९७८ / पृ. २१-३२.

डॉ. गोखल्यांच्या " डॉ. पटवर्धन० "च्या निमित्ताने. अतिशय सामान्य लेख.

**१४५. एक टीपण : शांता कशाळकरविषयी** : नरहर कुरुंदकर / ' ललित '/ एप्रिल १९७९ / पृ. ९-१२.

शांताबाई कशाळकरांच्या आत्मचरित्राविषयी टिपण. शांताबाईंच्या आत्मचरित्राची अंतिम प्रत मुलांनी जाळली. सध्या आहेत ती पूर्वतयारीची टिपणे. त्यावरून निष्कर्ष काढणे अपुरेपणाचे.

**१४६. माधव जूलियन यांचे व्यक्तिचित्र** : वि.ह.कुलकर्णी / ' अनुराधा ', दिवाळी अंक १९८१ / पृ. २९-३६.

सुमार लेख. काहीही नाही.

**१४७. माधव जूलियन आणि कुसुमाग्रज** : सु.रा. चुनेकर / " कै. भ. श्री. पंडित स्मृतिग्रंथ", मराठी विभाग, नागपूर विद्यापीठसाठी. [अप्रकाशित] समाविष्ट, " सहा साहित्यकार ", लेखसंग्रह, सु. रा. चुनेकर / १९८२/ पृ. १०७-१२०. ]

माधव जूलियन यांची कविता जेव्हा प्रस्थापित, तेव्हा कुसुमाग्रजांचा आरंभ.-माधव जूलियन कुसुमाग्रजांना समकालीन कवींत सर्वांत जवळचे-माधव जूलियन-कुसुमाग्रज यांचे व्यक्तिगत-वाङ्मयीन संबंध.-माधव जूलियन, कुसुमाग्रज यांच्या काव्यलेखनाच्या प्रेरणा, प्रयोजन भिन्न. -दोघांच्या काही कवितांच्या आधाराने साम्य-वैषम्य दर्शन. -उभयतांची पिंडप्रकृति.

१४८. विंदा तथा गो. वि. करंदीकर : [ मुलाखत : १ ] : विजया राजाध्यक्ष / 'ललित', जानेवारी १९८३.

या मुलाखतीत करंदीकर माधवराव पटवर्धनांविषयी बरेच बोलले आहेत. माधव जूलियनांचा-करंदीकरांचा संबंध आयुष्याला व्यापून राहिलेल्या नातेसंबंधातील एक नातेसंबंध.

१४९. माणूस एकंदरीत कठीणच : रा. भि. जोशी / साहित्य, दिवाळी अंक १९८३ / पृ. २६–२९.

आठवणीपर सर्वसाधारण लेख. लेखन विस्कळीत.

## ३. वाङ्मयकृतींवरील परीक्षणे, अभिप्राय

१. किरण : ( रविकिरण मंडळाचे पहिले प्रकाशन, ९ सप्टेंबर १९२३ ) (पुस्तक-परिचय ) वा. अ. भिडे / महाराष्ट्र साहित्य पत्रिका ( विविधज्ञानविस्तारांतर्गत ), डिसेंबर १९२३ ( पु. ११ अं. ४ ) / पृ. १३३-१३७.

रविकिरण मंडळाच्या पहिल्या प्रकाशनाचे सडेतोड, सर्व सदस्यांच्या वाङ्मयाचा समाचार घेणारे विस्तृत परीक्षण. कलाकैतवाचे कौतुक; पण आशयावर सामाजिक दृष्टीतून टीका.–हे सप्तरंग एकजीव नसून इंद्रधनुष्याप्रमाणे मनोहर. बरीचशी कवने मनःशांतीपेक्षा मनःक्षोभ करणारी. मुले मुली एकत्र कॉलेजात शिकण्यास आरंभ झाला असता शृंगारचेष्टा व उद्दाम प्रणयभावना उद्दीपित होणारी कवने रचणे व विद्यार्थ्यांच्या हाती पडणे घातक आहे. या प्रणयोद्गारात चोरटेपणा आहे. गुणांपेक्षा रूपावरच भाळलेले. माधवरावांवर विशेष कटाक्ष. चटोरपणात माधव जूलियन धाडसी आहेत.– या कवनांत कलागुण असल्याने त्यांची भयंकर परिणामकारकता दुणावली आहे. अनंत फंदी, परशराम, होनाजी, प्रभाकर इत्यादींच्या सुधारलेल्या अवतारांची सूचना. पुढील छकडालावण्यांच्या उदयाचा हा अरुणकिरण आहे.–दिवाकरांच्या नाट्यछटांचे कौतुक.

२. काव्यविचार : ( रविकिरण मंडळाचे दुसरे प्रकाशन, १९२४ ) रा. प. सबनीस / विविधज्ञानविस्तार, मे १९२४.

औपरोधिक परीक्षण.–'आपल्याला विक्षिप्त म्हणा हा पटवर्धनांचा आग्रह पुरा होईल.'

३. काव्यविचार : वि. स. खांडेकर / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, फेब्रुवारी जून १९२४.

४. उषा : ( रविकिरण मंडळाचे तिसरे प्रकाशन, ९ मे १९२४ ), वा. अ. भिडे / महाराष्ट्र साहित्य, जुलै १९२४ ( व. ६ अं. १ ) / पृ. २५-३०.

स्वागतपर अभिप्राय. “ किरण ” वरील स्वतःच्या टीकेचा पुनरुच्चार. नाट्यगीत, आणि कविभावना व्यक्त होणारे गीत.-एकेका कवीवर मत. माधव जूलियनांवर अधिक विस्ताराने लेखन.-यमक, सुनीत यांविषयी.

**मधुमाधव**

( वि. द. घाटे, माधव जूलियन यांचा काव्यसंग्रह, रविकिरण मंडळ प्रकाशन ४, २० ऑक्टोबर १९२४. )

५. **मधुमाधव** : श्री. म. माटे / ‘ लोकमान्य. ’ [ संदर्भ : ‘ मी व माझे टीकाकार ’ या लेखात पटवर्धनांनी ‘ स्वतंत्र, स्पष्ट व वाचनीय परीक्षण ’ असा याचा उल्लेख केलेला. ]

६. **मधुमाधव** वर तीन अभिप्रायः डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी च्य दप्तरातील परीक्षणांच्या नकला. परीक्षकांची नावे नाहीत. [ गं. दे. खानोलकरांकडील पटवर्धनांची संधारिका ].

७. **मधुमाधव** : ‘ आदर्श ’ (=वि. स. खांडेकर ), साप्ताहिक वैनतेय, १७ मार्च १९२५ / पृ. ५.

८. **मधुमाधव** : ज्ञानप्रकाश, २१ मार्च १९२५ ( ‘ काव्यशास्त्रविनोद ’-पुरवणीत )/ ३/४ स्तंभ.

तमाशातील अश्लील व शृंगारविषयक लावण्यांची छाप घाट्यांच्या प्रेमगीतांवर- -वर्ण्यविषय रंगविण्याची हातोटी, शब्दयोजना, भावनांची खळाली यांत माधव ज्यूलियनांची कविता अधिक सरस.

९. **मधुमाधव** : ‘ माधव ज्यूलियनांच्या काव्यासंबंधाने त्यांच्याच एका मित्राचे मत. ’ संपादकीय दुय्यम स्फुट, ज्ञानप्रकाश, शुक्रवार दि. १७ एप्रिल १९२५.

नागपूरच्या ‘ महाराष्ट्र ’ ( १२ एप्रिल १९२५ ) पत्रातील अभिप्रायाचे अवतरण. ( हा अभिप्राय ग. त्र्यं. माडखोलकरांचा असणार ) : ‘ त्यांच्या कवितेची एकंदर सजावट पाहिली म्हणजे एखाद्या सुधारकाच्या स्वतंत्र वृत्तीच्या हौशी मुलीचा भास होतो. ती छचोर नसली तरी, तिची चालचलणूक शिष्टसंमत, निदान आज तरी कुलीन किंवा शालीन वाटेल अशी नाही. ’ मित्राचा हा अभिप्राय वाचून माधव ज्युलियनची स्थिती केविलवाणी झाली असल्यास नवल नाही.

१०. **शलाका** : ( रविकिरण मंडळ प्रकाशन ५, ९ सप्टेंबर १९२५ ) वा. अ. भिडे / रत्नाकर, नमुना अंक, ऑक्टोबर १९२५ / ४·४॥ पृष्ठे.

रविकिरण मंडळासंबंधीच्या समकालीन वाङ्मयप्रेमिक जाणकारांच्या, मंडळाच्या

चाहत्यांच्या मंडळासंबंधीच्या समजुती, अपेक्षा या लेखातून समजतात. वा. अ. भिडे यांची वाङ्मयाकडे बघण्याची दृष्टी, सामाजिक विचारसरणी या लेखातून विशद होते. निरपेक्ष रसिक वाङ्मयप्रेमी मंडळाचे स्वागत कसे करीत ते दिसते. तसेच मंडळाच्या नावीन्याच्या हव्यासाने आचरलेल्या काही गोष्टींनी जाणत्यांची दिशाभूल कशी होई याचाही प्रत्यय येतो.–काव्याबाबत सर्वांचाच गौरव. माधवरावांच्या काही कवितांवर अभिप्राय. माधवरावांच्या भाषेतील अनौचित्य ( 'बेगमेचे विरहगीत' ). 'अन्'वर आक्षेप. तोंडभाषेतील अशुद्ध उच्चार ग्रांथिक नागर भाषेत योजणे अयोग्य. व्याकरण-शुद्धतेचा पुरस्कार.

**११. फार्शी–मराठी–कोश :** ( अभिप्राय ) केसरी, १५ जानेवारी १९२६ सुमार. ( संदर्भ : रा. बि. मराठ्यांना पत्र : २५ जानेवारी १९२६ ).

**१२. फार्शी–मराठी–कोश :** ( समीक्षण ). ग. ह. खरे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ६३१–६३४.

परिचय.–प्रशंसा.–अशा कोशाची पूर्वसाधने–कोश अत्यंत उपयुक्त.–त्यातील दोष, उणीवा.

## विरहतरंग

**१३. विरहतरंग :** ( परीक्षण ). केसरी, अर्ध्यापेक्षाही कमी स्तंभ एवढेच. [ संदर्भ : 'परामर्श', विरहतरंग, रा. श्री. जोग / "माधव जूलियन", गं. दे. खानोलकर, आ. २, पृ. १५९ ].

'विद्योपासनेच्या वेळी एखाद्या विधवेवर प्रेम करणे हे अनैतिक होय.' महाविद्यालयातील तरुण विद्यार्थी विधवेवर प्रेम ठेवतो ही नीतिदृष्ट्या तिरस्करणीय गोष्ट आहे.

**१४. विरहतरंग :** ( पुस्तकपरिचय ) गो. रा. हिंगणेकर / ज्ञानप्रकाश, रविवार १९ सप्टेंबर १९२६ / विस्तृत, संपूर्ण १ पृष्ठ.

गौरवपूर्ण, परिचयपर सर्वसाधारण लेख. ( १ ) कविगौरव. पुस्तकपरिचय. कथानिवेदन. ( २ ) कविचरित्र व काव्य यांच्या संबंधाचे विवेचन. ( ३ ) नायकाचे चरित्र. नायिकेची चरित्ररेखा, धार्मिक मते इत्यादी. त्यांच्या चरित्राच्या अनुकरणासंबंधीचा प्रश्न. ( ४ ) सामाजिक समस्यादृष्ट्या विचार. पुनर्विवाह. त्यात मर्यादातिक्रम. नीतिमत्तेस बाध येणारे काही नाही. ( ५ ) अंडी, सागुती यांच्या उल्लेखाचे समर्थन. ( ६ ) रविकिरण मंडळासंबंधीची प्रस्तावनेतील माहिती. त्याचा परिचय. (७) नायिकेच्या गौरवाच्या मर्यादा. ( ८ ) समारोपात काव्याबद्दल अत्यंत गौरवाचे उद्गार.

**१५. विरहतरंग :** डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीच्या परीक्षकांच्या अभिप्रायांच्या नकला. ( १ ) वा. अ. भिडे, ( २ ) अनाम, ( ३ ) वा. ग. खापर्डे.

[ पटवर्धनांचे चिकट पुस्तक-गं. दे. खानोलकर संग्रह ].

**१६. विरहतरंग** वर ग. त्र्यं. माडखोलकरांचे परीक्षण ? : यशवंत, मार्च १९२७ पूर्वी ? [ संदर्भ : " मी आणि माझे साहित्य ", ग. त्र्यं. माडखोलकर. पण ते आढळले नाही. यशवंत, एप्रिल-मे १९३० ( अं. १७–१८ ) मधील 'लेखनकला' या माडखोलकरांच्या लेखात "विरहतरंग", "सुधारक" यांवर टीका. तो संदर्भ अभिप्रेत ? ] त्या लेखांतील विधान, 'कॉलेजातील विद्यार्थ्यांत मानसिक संभोगाची जी चटक दिवसेंदिवस वाढत आहे, तिची शब्दचित्रे ( "विरहतरंग" आणि "सुधारक" ) या काव्यांत रेखाटून माधव जूलियन यांनी महाराष्ट्रास नकळत निःसंशय उपकृत केले आहे.'

**१७. विरहतरंग** : ( परीक्षण ) वि. स. खांडेकर / साप्ता. रणगर्जना, मुंबई, १८ ऑक्टोबर १९२६.

प्रभाकर महाविद्यालयीन विद्यार्थी. त्याचे वर्तन विद्यार्थिजीवनाला योग्य नाही. 'कॉलेजातील विद्यार्थ्यांचे गुरुमुखापेक्षा विद्यार्थिनींच्या चेहऱ्याकडे लक्ष असणे कोणत्याही दृष्टीने इष्ट नाही.' 'सरस्वतीमंदिरात प्रणयाच्या लीला चालणे कितपत इष्ट आहे हा प्रश्नच आहे...विरहतरंगात या वादग्रस्त प्रश्नाला जागा दिली नसती तर अधिक बरे झाले असते.' 'विरहतरंगाचे अंतरंग आकर्षक व सुंदर आहे. या सुंदर अंतरंगाचे मुख्य गुण सुश्लिष्ट रचना, पांडित्यप्रकर्ष व सरस कल्पना हे होत.' 'माधव जूलियन हे सौंदर्यवादी कवी आहेत, हे विरहतरंगावरून समजून येण्यासारखे आहे. काव्यानुकूल पांडित्य, भावनांची उत्कटता व पद्यरचनेचे प्रभुत्व या गुणांचा त्रिवेणी संगम त्यांच्या इतर सरस काव्यांप्रमाणे या काव्यातही आढळतो.' कवटे, सागुती [ श्लोक १५२ ] यांचे वर्णन अकाव्यमय. 'विद्यमान कवींमध्ये माधव जूलियन यांचा दर्जा बराच वरचा आहे.' [ "माधव जूलियन", गं. दे. खानोलकर, आ. २, पृ. १६०-१६२ वर उद्धृत ].

**१८. विरहतरंग** ( एक महत्त्वाचे पत्र ) : लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ५६२–५६४.

विरहतरंगाचे तत्कालीन तरुणांकडून स्वागत किती आत्मीयतेने, उत्कटतेने झाले त्याचे निदर्शक पत्र. 'K. B.' या आद्याक्षरांनी अन्वित. 'Students of the Fergusson College, F. Y. Class' असा उल्लेख. [ 'श्री. जोशी यांचे पत्र', दि. १६ ( १९२६ ? ), स्वप्नभूमी, पृ. १२३. ]

**१९. विरहतरंग** : ( पुस्तकपरीक्षण ) बा. अ. भिडे / रत्नाकर, मार्च १९२७, व. २ अं. ३ ) / पृ. २०९–२१५.

गाजलेले परीक्षण. काव्याची प्रस्तावना व काव्य दोहोंवर नजर ठेवून परीक्षण लिहिलेले. कलादृष्ट्या या काव्याचा गुणानुवाद; पण सामाजिक हितदृष्ट्या अनिष्ट मानून टीका. काव्याच्या तुटक्या स्वरूपाची मीमांसा. 'हृदयंगम प्रणयप्रधान काव्य.' ( १ ) कथानकातील कालानुक्रम. प्रथम हे तरंग सुटेच वाटतात. ( २ ) कवी व काव्य यांचा संबंध. काव्यनायक, कविजीवन, कवीची मते. 'नटवे व नखरे-बाज काव्य.' कलागुणांचे कौतुक. नायकनायिकांच्या व्यक्तिरेखांवर कडक आक्षेप. नायक नायिकांचे चरित्र गर्ह्य आहे. त्याचे समर्थन करून, त्यावर उदात्ततेचे आवरण चढविण्याचा कवीचा प्रयत्न अनुचित आहे. काव्यनायक स्त्रैण, दुर्बल. ( ३ ) भाष्यान्वित कथाकथन. [ इंदूचा भिडे 'बालविधवा' असा उल्लेख करतात. ] प्रभाकराच्या 'प्रणयपंढरीच्या वाऱ्या.' इंदूच्या वेडाने त्याच्या बुद्धि शीलाला ओहोटी लागली.—बिनसहीच्या पत्राने प्रभाकर नेमका इंदूकडे कसा गेला ?— सागुती–अंड्याच्या उल्लेखाने हिडिसपणाचे काजळ. 'पिधान'वर टीका. [ पटवर्धनांनी दुसऱ्या आवृत्तीत परिष्करणात हा उल्लेख गाळला. ] भ्रान्तचुम्बन. अंतिम कलह. ( ४ ) प्रेम इष्ट की अनिष्ट ? चर्चा. ( ५ ) शब्दयोजना मननीय. लेखनपद्धतीचा विचार. अनुस्वार अनुनासिक भेद. 'ऋ'कार. ( ६ ) समारोप. 'पटवर्धनांनी आपले गुण श्रेयस्कर काव्यरचनेला लावावे.'

२०. विरहतरंग : ( पुस्तकपरीक्षण ) वा. म. जोशी / विविधज्ञानविस्तार, जून १९२७ / पृ. १९९–२०२.

( १ ) कथानक, व्यक्तिदर्शन. ( अ ) इंदू प्रभाकराचा आपणहून परिचय करून घेते. अशी स्थिती आपल्या समाजात नाही. ती का परिचय करून घेते ? ( ब ) 'शुश्रूषेस मिळेल...' [ श्लो. ४३ ] अशी चेष्टा कोणी करील का ? ती सभ्य ठरेल का ? [ पटवर्धनांनी दुसऱ्या आवृत्तीत परिष्करणात हा श्लोक परिचयोत्तर घातला. ]
( क ) प्रभाकरात तर पुरुषी अरेरावीपणा कुठे दिसत नाही. ( ड ) विवाहाची इच्छा नसताना नायकाला बरे वाटावे म्हणून नायिकेने विवाहाला तयार होण्यात सात्त्विकता असली, तरी ते उच्च प्रेमाचे लक्षण नाही. आधी नायिका परिचय वृद्धिंगत का करून घेते, आणि अनेक वर्षे घोळवून एकदम विवाहास तयार का होते ? ( २ ) वैयक्तिक चरित्र आणि वाङ्मय. ( ३ ) भाषा, वर्णने. ( ४ ) वाचनाने होणाऱ्या आनंदात उणेपणा राहातो. नायकात अलौकिक, उदात्त गुण नाहीत. 'काहीतरी कमी आहे ही भावना थोडीबहूत राहतेच.'

**२१. विरहतरंग** : ( परीक्षण ) शं. के. कानेटकर / "काव्यकला" [ लेखसंग्रह, शं. के. कानेटकर, १९३६ ], पृ. ९४–११२.

बा. अ. भिडे, वा. म. जोशी, वि. स. खांडेकर यांच्या परीक्षणांचाही परामर्श.

—"विरहतरंगा"च्या मांडणीतील संगतीचे दर्शन. कवीने रेखाटलेल्या मानसशास्त्रीय अनुक्रमाने कथानकाचा गोषवारा. "विरहतरंगा"तील घटनांची पाहणी. घटना नैसर्गिक. रसपरिपोष चांगला साधलेला. आधुनिक जीवनाची सुंदर चित्रे हा एक विशेष. पांडित्य हा एक विशेष. "मेघदूत" व "विरहतरंग" यांची तुलना सर्वथा बरोबर आहे असे वाटत नाही. पात्रांचे स्वभावरेखाटन. 'इंदूचे पात्र जितके उदात्त, निसर्गरम्य व ध्येयभूत वाटते तितके प्रभाकराचे वाटत नाही. प्रभाकर हा एक निव्वळ प्रेम करणारा निर्जीव नायक आहे.' शृंगाररसाचा उठाव वीररसाच्या समवेत केल्यास तो फार उठून दिसतो. तसे येथे होत नाही. इंदूचे चित्र मनोहर व स्वाभाविक. सुंदर कल्पनांचा ठिकठिकाणी प्रकर्ष. या सर्व कल्पनांतून जिव्हाळ्याचे माधुर्य. 'ते [ पटवर्धन ] आधुनिक जीवनाचे भाष्यकार आहेत.'

[ 'मला स्वतःला हा नायक प्रभाकर हा एका काळी 'निर्जीव' व 'कमकुवत' आहे असे वाटत होते...पण आता माझे मत प्रभाकर 'निर्जीव व कमकुवत' नाही असे निश्चित झाले आहे.' "स्वप्नभूमी", पृ १३३. ]

२२. **विरहतरंग : काही सौंदर्यस्थळे** : दिनकर साक्रीकर / पूर्णिमा, ९ डिसेंबर १९३९, व. १ अं. ११.

'माधव जूलियनां'चा निस्सीम भक्त' म्हणून लेखन. 'विरहतरंग सर्वांत प्रिय.' काही फुटकळ सौंदर्यस्थळे, सुंदर श्लोक लालित्यपूर्ण भाषेत दाखविले आहेत.

२३. **विरहतरंग** : ( समीक्षण ) रा ग हर्षे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४०/ पृ. ५५५–५६१. [ समाविष्ट : "टीका आणि अभ्यास", लेखसंग्रह, रा. ग. हर्षे, १९४२, पृ. १०६–११५. ]

गडकऱ्यांनंतर महत्त्वाचे आधुनिक कवी माधव जूलियन. ते गडकऱ्यांप्रमाणेच संप्रदायप्रवर्तक. रविकिरण मंडळाचे रवी माधवरावच.—माधवरावांच्या अभ्यासाच्या दिशा.—"विरहतरंगा"च्या भाषेचे कौतुक. 'रचनेच्या संबंधात तर ते मेघदूताहूनही सरस आहे.' 'प्रेमासारखा काव्याचा चिरंतन विषय आणि त्याला लाभलेली ही रचनेची कलात्मक योजकता यामुळे हे काव्य मराठी वाङ्मयात अमर झाले आहे.' विरहतरंगाचे रसग्रहण. भरपूर कौतुक ते आधुनिक खंडकाव्यांत सर्वोत्कृष्ट. अभिजात काव्याचा कलात्मक आदर्श. इतर भाषांत भाषांतरीत झाल्यास माधवरावांना त्रिखंड कीर्ती मिळाल्याशिवाय राहणार नाही.

२४. **"विरहतरंगा"वरील विचारतरंग** : रा. श्री. जोग / ज्योत्स्ना, मे १९४० / पृ. ५५–५९.

यातील बराचसा भाग लोकशिक्षण, सह्याद्रि विशेषांकांतील लेख, धनुर्धारीतील

( दिवाळी १९४५ ) लेख, "विरहतरंगा"ला जोडलेला 'परामर्श' यांत आलेला. (१) आजच्या तरुणांच्या अभिरुचीवर कडू टीका. त्यांना अभिरुची नाही, काव्याची आवड नाही, समज नाही. ( २ ) "विरहतरंगा"चे खरे वैशिष्ट्य नायक–नायिकेच्या, विशेषतः नायकाच्या मनोविश्लेषणात. नायिकेवरील मुक्ताबाई दीक्षितांनी घेतलेल्या आक्षेपाच्या अनुरोधाने नायिकेच्या स्वभावचित्रणाचा विचार. हार्डी व तांबे यांचा पुरावा. ( ३ ) प्रभाकराचे स्वभावचित्रही लक्षणीय. प्रेमाच्या विकासाचा सुंदर चित्रपट. यातील प्रेमचित्रण तात्कालिक ठरले तरी एक नमूना म्हणून नेहमीच कुतूहल राहील. ( ४ ) इतर आरोपांचा विचार. ( ५ ) नायकाचे वैदग्ध्य दाखवणाऱ्या गोष्टी. ( ६ ) "विरहतरंगा"ची अपूर्व रचना. त्याच्या पर्यवसानासंबंधीच्या आक्षेपांचा परामर्श. ( ७ ) "विरहतरंग" "मेघदूता"पेक्षा सरस. ( ८ ) "विरहतरंगा"चे परिष्करण. नुसते फार्सी वा परकी शब्द काढण्यासाठी नव्हे. काही ठिकाणी इष्टतेबाबत शंका.

२५. **दोन विरहकाव्ये मेघदूत आणि विरहतरंग** : रा. श्री. जोग/धनुर्धारी, दिवाळी अंक, १९४५. [ समाविष्ट : विरहतरंग, आ. ४, जुलै १९५३, पृ. ११८–१२८/ "विचक्षणा", लेखसंग्रह, रा. श्री. जोग, १९६२. ]

"मेघदूत"कार कालिदास आणि "विरहतरंग"कर्ते माधव जूलियन या दोन कवींमध्ये ही तुलना नसून ती त्यांनी लिहिलेल्या दोन काव्यांमध्ये आहे.–प्रभाकराच्या विरहात उत्कटता अधिक आहे. "विरहतरंगा"त पाहावयास मिळणारा प्रेमाचा क्रमविकास "मेघदूता"त पाहावयास मिळत नाही.–"विरहतरंगा"त जसे प्रेमाचे तत्त्वज्ञान पाहावयास सापडते तसे "मेघदूता"त पाहावयास सापडत नाही.—"विरहतरंगा"त व्यक्तिदर्शन अधिक सविस्तर, व्यवस्थित आणि मनोवेधक.—प्रसंग आणि त्यांची कौशल्यपूर्ण मांडणी यामुळे यावयाची वेधकता "मेघदूता"त येऊ शकली नाही. "विरहतरंगा"त ती पुष्कळच अधिक आहे.—"मेघदूता"तील सृष्टिवर्णनात कल्पनेचा विलास अधिक असला तर "विरहतरंगा"तील वर्णने अधिक वास्तव वाटतील. "विरहतरंगा"तील सृष्टिवर्णने नायिकेला केंद्र करूनच आली आहेत. तसे "मेघदूता"त नाही.—"विरहतरंगा"चा आणखी एक विशेष म्हणजे त्याची निर्देशपूर्णता— "विरहतरंगा"च्या भाषेला "मेघदूता"च्या भाषेची बरोबरी करता आलेली नाही.

२६. **विरहतरंगातील विरह : मानसशास्त्रीय चर्चा** : ना. मा. संत / सत्यकथा, डिसेंबर १९४५.

"विरहतरंगा"ची नायिका इंदू हिच्या स्वभावाचे गूढ मानसशास्त्रीय चर्चेने उकलण्याचा प्रयत्न.–पुरुषी वृत्तीच्या स्वार्थीपणाने आणि मात्रासौख्यलालसेने तिला या गोष्टीची दडस बसली असावी; तिच्या मनात व्यक्तिशः आपल्या पतीबद्दल आणि

मग एकंदर पुरुषजातीबद्दल भीतीचा गंड निर्माण झाला असावा.–सुप्त भीतिगंडातून बचावयोजना म्हणजे तिची धिटाई, लाघटपणा.

**२७. विरहतरंगातील नायिकेचे गूढ** : रा. व्यं. जोशी / सत्यकथा, मे १९४६ / पृ. ४१–४२.

ना. मा. संत यांच्या प्रतिपादनाचे खंडन. (१) इंदूवर लग्न झाल्यावर अगदी थोड्याच कालावधीत वैधव्याचा घाला पडला असावा. केवळ वैधव्याची आपत्ती तिच्या दुःखाचे कारण. (२) इंदू प्रभाकराकडे प्रियकराच्या दृष्टीने पाहात होती. –शेवटी त्यागाचे तत्त्व पटून ती विवाहास तयार होते. [प्रा. पंगूंच्या "विरहतरंगा"-वरील लेखनाचा उल्लेख. ते कुठले? 'इंदूच्या खोलीत (पतीची) तसबीर नसण्याचे कारण प्रा. पंगू...सांगतात....']

**२८. 'सह नौ भुनक्तु' आणि कै. माधव ज्यूलियन** : ("विरहतरंग", श्लो. १० प्रमाद). म. दा. साठे / 'युगवाणी', नोव्हेंबर–डिसेंबर १९४६, व. १ अं. ११–१२/ पृ. ४२–४३. [म. नि.]

**२९. मेघदूत आणि विरहतरंग** : म. गो. माईणकर / नवयुग, दिवाळी अंक, १९४७ / पृ. ८३—८८.

(१) "विरहतरंग" व "मेघदूत" यांचे साम्य अगदी स्थूल मानाने व वरवरचे आहे. या दोघांची तुलना का व्हावी तेच कळत नाही.—"मेघदूता"तील नायक-नायिका ही 'सौंदर्यवादाची निर्मिती' आहेत, तर "विरहतरंगातील नायक-नायिका 'वास्तववादाची निर्मिती' आहेत. सौंदर्यवादी "मेघदूत" व वास्तववादी "विरहतरंग" यांची भिन्नता दाखवणे हाच या लेखाचा हेतू.— "मेघदूत" रसिकांना नेहमीच आनंद देईल; "विरहतरंगा"बद्दल तसे म्हणता येणार नाही.

**३०. डॉ. माधवराव पटवर्धन यांचे विरहतरंग** (रसग्रहण) : एम्. रघुनाथ/प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७ / पृ. १–२, ३४–३६.
सामान्य लेख.

**३१. परामर्श** : रा. श्री. जोग / विरहतरंग, आ. ७, एप्रिल १९७१ / पृ. १६–४५. आ. ३, सप्टेंबर १९४८ चे प्रास्ताविक समाविष्ट. हा भाग "दक्षिणा" (लेखसंग्रह, १९६७) मध्ये समाविष्ट, पृ.: ९७–१२४. अधिक पृ. ३८–४५ हा भाग या सातव्या आवृत्तीत अधिक.

अ. "विरहतरंगा"वर झालेल्या टीकांचा परामर्श. (१) विषयासंबंधी आक्षेप. केसरी, डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीचे परीक्षक, वा. अ. भिडे यांच्या टीकांचा परामर्श. —'विशिष्ट परिस्थितीत परस्परप्रेमाने बद्ध झालेल्या दोन व्यक्ती

विशिष्ट प्रकाराने वागल्या एवढे सांगण्याचाच कवीचा आशय आहे.' ( २ ) नैतिक मुद्यावर आधारलेला आक्षेप. माडखोलकरांचे त्याला उत्तर. ( ३ ) व्यक्तिदर्शना-वरील आक्षेप. वा. अ. भिडे, शं. के. कानेटकर यांचे आक्षेप. वामनराव जोशांचा आक्षेप.-नायिकेच्या व्यक्तिदर्शनावरील आक्षेप. डॉ. केतकर, मुक्ताबाई दीक्षित यांचे आक्षेप. ( ४ ) कथारचनेवरील आक्षेप. ( ५ ) भाषेवरील आक्षेप. ( ६ ) परिष्करणा-मधील बहुसंख्य स्थानी सुधारणा झाली आहे. ब. "विरहतरंगा"चे विशेष. ( १ ) प्रेमाच्या क्रमविकासातील चित्रे. ( २ ) प्रेमाचे तत्त्वज्ञान. ( ३ ) व्यक्तिदर्शन. ( ४ ) कथानक. ( ५ ) सृष्टिवर्णने. ( ६ ) उल्लेखपूर्णता. ( ७ ) अलंकारप्रचुरता.

३२. **मेघदूत आणि विरहतरंग** : प्रा. ग. वि. कुलकर्णी / लोकशक्ति, दिवाळी विशेषांक, नोव्हेंबर १९४८ / पृ. ६७–७२.

अपुरा लेख. काही विशेष नाही. दोन्ही कृतींचे मूलगामी विश्लेषण नाही. "मेघदूता"चा अभिमान, कौतुक. "विरहतरंगा"विषयी दुजेपणा. प्रा. जोग, रा. ग. हर्षे, माईणकर वगैरेंच्या लेखांच्या संदर्भात हा लेख लिहिलेला. जोग, हर्षे यांच्या विवेचनाला विरोध.—दोन्ही काव्ये आपापल्या परी रमणीय. स्थूल साम्य बाजूस ठेवले तर दोन्ही काव्यांच्या स्वरूपात पराकाष्ठेची भिन्नता आहे. नायकाच्या विरहा-वस्थेचे वर्णन करणारी "विरहतरंग" ही एक आधुनिक प्रेमकहाणी. "मेघदूता"त 'मेघावर सोपविलेले दूतत्व' ही चमत्कृतिपूर्ण, हृदयंगम आणि अत्यंत काव्यात्म कल्पना सूचित करावयाची आहे. "मेघदूत" लिहिताना कालिदासाची भूमिका Romantic आहे; "विरहतरंगा"त कवीची भूमिका Realistic आहे. "विरहतरंगा"-पेक्षा "मेघदूत" सरस.–"विरहतरंगा"तील दोषदर्शन. "मेघदूता"चे गुणवर्णन. "मेघदूता"वरील आक्षेपांचे खंडन.

३३. **"विरहतरंगा"ची नायिका** : रमेश तेंडुलकर / साहित्य, जानेवारी १९५२. [ मुखपृष्ठावर चुकीने 'जानेवारी १९५२' निर्देश असून अंक डिसेंबर १९५१ चा ]. पृ. ३–८, ४८–४९.

इंदूच्या 'स्वभावचित्राची उकल' करण्याचा प्रयत्न वा म. जोशी, मुक्ताबाई दीक्षित, वि. द. घाटे, रा. श्री. जोग, ना. मा. संत, द. सी. पंगू यांच्या टीका ध्यानात घेऊन पुढे ६ पृष्ठे स्वतःची मीमांसा. इंदू आक्रमक नायिका. ( "तुटलेले दुवे", "सुधारक" मधील नायिकांप्रमाणे.) प्रभाकराची भूमिका बचावाची. पण तो धीट होताच इंदूचे अवसान गळून पडते.—२८ व्या तरंगातील इंदूचे उद्गार गौण मानले पाहिजेत. तिचा तो वेळ मारून नेण्याचा प्रयत्न.-प्रभाकराच्या दृष्टीतून इंदूचे दर्शन होत असल्याने त्यात अपुरेपणा.-इंदूला यापूर्वी पुरुषसहवास झालेला आहे. अशारीर प्रेमाच्या अद्भुतरम्य कल्पनाजालात रमणे तिला अशक्य. प्रभाकराच्या

आयुष्यात ही पहिलीच तरुणी. म्हणून स्वप्नाळूपणा.—सहवासाच्या पर्यवसनाचा नायिका विचार करीत नाही. अकाली वैधव्याने अपुरी राहिलेली पुरुषसहवासाची इच्छा प्रभाकराच्या सहवासात भागत होती. तिच्या कृती प्रेयसीसारख्या. पण अखेर प्रत्यक्ष प्रसंगात ती कचरते. पुढे दोन वर्षांत बादळ. इंदूपुरते तरी तिचे स्वभावचित्र वास्तव, स्वाभाविक.

**३४. "विरहतरंगां"तील पहिले विक्रीडित : एक रसग्रहण :** कृ. बा. मराठे / सत्यकथा, मार्च १९६० / सुमारे २॥ पृष्ठे.

"विरहतरंगा"च्या प्रथमावृत्ती व द्वितीयावृत्ती यांतील पहिल्या श्लोकांत परिष्करणामुळे आपाद अंतर पडल्याच्या संदर्भात तौलनिक लेख. एका श्लोकावर २॥ पृष्ठांचे सौंदर्यरसग्राही भाष्य. मूळ कृतीपेक्षा रसिक, व्यासंगी टीकाकाराचे वैशिष्ट्य-दर्शन होते. अशा भाष्याने समग्र कृतीच्या आस्वादनात फारशी भर पडते असे नाही. "विरहतरंगा"विषयी अत्यंत गौरवपूर्ण लेख. परिष्करणोत्तर कृतीत केवढे अंतर पडते याचा दाखला देण्यास उपयोगी.- आरंभी 'इंदू' हे संबोधन समर्पक, सूचक. नायिकेच्या साहचर्यकल्पनेने नायकासंबंधीही कल्पना उभ्या राहतात. नायक संयमी, सुसंस्कृत. काव्याची सुरुवात रात्री न करता दुपारी करण्यात औचित्य. "विरहतरंगा" तील पहिले विक्रीडित "मेघदूता"च्या मंदाक्रांतेपेक्षा सर्वार्थाने पहिलेच आहे.

**३५. विरहतरंग :** द. भि कुलकर्णी / सत्यकथा, सप्टेंबर १९६७ / पृ. २९-३५. [समाविष्ट : "दुसरी परंपरा", लेखसंग्रह, द. भि. कुलकर्णी, जुलै १९७४, पृ. ५८-६९].

लेख सामान्य. ढोबळ. अनेक विधानांवर आक्षेप घेता येईल. काही ठिकाणी आपला सिद्धान्त पटविण्यासाठी ओढाताण केली आहे. उदाहरणार्थ, या काव्यात पटवर्धनांच्या झुंजार ध्येयप्रवण मनोवृत्तीचे दर्शन घडत नाही, म्हणून यात कवीचा आत्माविष्कार नाही. (१) प्रास्ताविक. काव्यस्वरूपाचा परिचय. (२) हे भावकाव्य नव्हे, तसे खंडकाव्यही नव्हे.– "विरहतरंगा"ची कथा. त्याला सुस्पष्ट कथा आहे. (तिचे निवेदन.) खंडकाव्यात नुसती कथा असून चालत नाही, तिचे कथन लागते.–ते भावकाव्यही नव्हे, की कथाकाव्यही नव्हे. भावकाव्याचा आद्य गुणधर्म 'कवीचा आत्माविष्कार.' तो इथे नाही.–पात्रनिर्मितीमुळे काव्यातील आशय कवीचा आत्माविष्कार उरत नाही. या पात्रांना प्रतीकात्मक पातळीही नाही.—या काव्यात कवीची खासगी प्रेमानुभूती आढळते ?–पण त्यावर काव्याचे भावकाव्यत्व अवलंबून नाही.– या काव्यातील अनुभूती कवीची स्वतःची नाही. कवीच्या झुंजार ध्येयप्रवण मनोवृत्तीचे दर्शन त्यात घडत नाही.–यातील दृष्टी भावकवीची नसून नाट्यकवीची आहे.

" विरहतरंग " हे दीर्घ नाट्यकाव्य आहे.–त्यातील दृष्टिगोचर वर्णनपद्धती नाट्य-काव्याला उपकारक.–परिष्करणाचा उपयोग मात्र नाट्यगुणवर्धनासाठी पुरेसा करून घेतलेला नाही. कारण कवीला हे दीर्घ नाट्यकाव्य असल्याची सुस्पष्ट जाणीव नसावी. ते एक मोनोलॉग आहे.–भाषा नाट्यगुणाला थोडी साहाय्यक. संवादवैपुल्य. ( ३ ) " विरहतरंग " आणि " मेघदूत ". " मेघदूत " नाट्यनिष्ठ नसून निवेदनप्रधान. " विरहतरंगा " चे स्वरूप आर्त–करुण नाही. अधिकांश काव्य म्हणजे मुक्त, प्रसन्न आणि तरुण जीवनाचा विलास. इथे " विरहतरंग "–" मेघदूत " साम्य.–" विरह-तरंगा " चे स्थान अनन्यसाधारण.

३६. **विरहतरंग** : सरोजिनी वैद्य / वागेश्री, दिवाळी अंक १९६७ / पृ. ९६–१०५.
[ समाविष्ट : " माती आणि मूर्ती ", लेखसंग्रह / सरोजिनी वैद्य / नोव्हेंबर १९७५, पृ. १०९–१२६ ].

१९६७ सालातील सुजाण साहित्याभ्यासकाच्या दृष्टीला " विरहतरंग " कसे दिसते, ते कळण्यास लेख वाचनीय. खूपच अडखळत लेखन, त्यामुळे लेखिकेला काही म्हणावयाचे असूनही ते पुरेसे स्पष्ट होत नाही.–" विरहतरंग " प्रत्यय देण्याला अपुरे. अनुभवांचा जिवंतपणा नाही. ही मुख्य दृष्टी या टीकालेखात.–१. प्रास्ताविक. आजवरच्या टीकांनी समाधान नाही म्हणून या काव्याचा स्वतंत्रपणाने शोध. २. ( १ ) नायिका. तिच्या व्यक्तिमत्त्वात अस्वाभाविकता, ढोंग नाही. 'तादात्म्याच्या शक्तीचा अभावच " विरहतरंगा " ला कलादृष्ट्या अनेकविध प्रकारांनी भोवलेला आहे.'–' " विरहतरंगा " च्या वाचनानंतर थोडी हुरहुरीची भावना निर्माण झाली तरी, किंवा त्यातील जीवनानुभवाने, विलक्षण अस्वस्थ करावे असा उत्कट प्रत्यय त्यामध्ये येत नाही.' ( २ ) प्रभाकर. तो अनेक ठिकाणी जिवंत वाटत नाही.–प्रत्यक्ष अनुभवापेक्षा त्यामागील तत्त्वावर लक्ष केंद्रित करण्याची प्रवृत्ती. ' ते धड कथाकाव्य झाले नाही, आणि भावकाव्यही झाले नाही. पुरेसे वस्तुनिष्ठ झाले नाही आणि आत्मनिष्ठही नाही.' ( ३ ) कवी व प्रभाकर. यांतील एकरूपतेचा विचार. आक्षेप. ( ४ ) " विरहतरंगा " तील प्रेमदृष्टी. तिच्याशी सहमत होता येत नाही –प्रेमभूमिकेत विसंगती आणि भाषेच्या बाबतीत चमत्कारिक विषम शैली. ( ५ ) भाषादृष्ट्या विचार. ( वरील सर्व विवेचनाचे प्रात्यक्षिक म्हणून तरंग ५–६ चे विश्लेषण. ) ३. " विरहतरंग " चे गुणविशेष. ( १ ) त्याचे नवेपण. ( २ ) माधवरावांच्या जीवन-दृष्टीतील, सौंदर्यदृष्टीतील ताजेपणा. ( ३ ) २०–२२ वयाच्या सुशिक्षित नायकाच्या दृष्टीतून सुशिक्षित स्त्री, प्रेमानुभव यांच्याकडे बघणे यात आकर्षकता. ( ४ ) मानसिक कारणाला महत्त्व. ( ५ ) स्वैर रचना. ( ६ ) निसर्गवर्णनात नवीन सौंदर्यदृष्टी.

३७. **विरहतरंग** : म. शं. वाबगावकर / सत्यकथा, जून १९७० / पृ. ७३–७४.

टिपण. सत्यकथा, सप्टेंबर १९६७ च्या अंकातील द. भि. कुळकर्ण्यांच्या "विरहतरंगा"वरील लेखातील [ पहा, उपरिनिर्दिष्ट क्र. ३५ ] विधानांचे खंडन. कुळकर्ण्यांच्या मते "विरहतरंग" भावकाव्य वा कथाकाव्यही नव्हे. परंतु त्या लेखात कुळकर्ण्यांनीच सांगितलेली खंडकाव्याची लक्षणे "विरहतरंगा"ला अचूक लागू पडतात. ( १ ) "विरहतरंगा"त प्रभाकर निवेदकाची भूमिका घेऊन कथेचे कथन करतो. ( २ ) 'श्रोता' हे पात्रही येथे अध्याहृत आहे.

## सुधारक

३८. **सुधारक** : डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटीतील अभिप्रायांच्या नकला. ( १ ) वा. अ. भिडे. ( २ ) ल. ग. लेले. ( ३ ) वा. ग. खापर्डे. [ पटवर्धनांचे चिकट पुस्तक. गं. दे. खानोलकर संग्रह. ]

३९. **सुधारक** : ( पुस्तक–परीक्षण ) : अनाम / रा. वि. मराठे यांच्या संग्रहातून. समकालीन वृत्तपत्रीय परीक्षण. १–१॥ स्तंभ.

माधवरावांची सामाजिक विचारसरणी न पटणारा परीक्षण–लेखक असावा. माधवरावांच्या टिळक, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यावरील टीकेवर राग.—वासूची तडफ ही सुधारणेची म्हणण्याऐवजी तारुण्यातील उतावीळपणाची.—मवाळ सुधारक पक्षातील सामान्य व्यक्तीच्या मनात जहाल पुराणाभिमान्याबद्दल ज्या गैरसमजुती व पूर्वग्रह वावरत असतात त्या कवीच्या मनात भरपूर आहेत.–भाषा, रचना, निरीक्षण असाधारण.—काव्य या दृष्टीने सफाईदार व चटकदार.

४०. **सुधारक** ( समालोचन ) : पु. द. मराठे / वैनतेय, २७ मार्च १९२८.

४१. **सुधारक** ( परीक्षण ) : केसरी, ३ एप्रिल १९२८.

४२. **सुधारक** ( पुस्तकपरीक्षण ) : वा. अ. भिडे / विविधज्ञानविस्तार.

चार लेखांकांत विस्तृत परीक्षण. माधवरावांच्या काव्यकौशल्याचा गौरव, पण सामाजिक इष्टतेच्या दृष्टीने टीका.–लेखांक१/जून१९२८, व.५९अं.६/पृ.२२१–२३३.

'महाकाव्य' असा "सुधारकां"चा उल्लेख. कोडकौतुकाने अभिनंदन. कथानकाचा विस्ताराने परिचय. भरपूर उतारे. ( अ ) सरलेची कथा. ( ब ) वासूची कथा.

—लेखांक २ / जुलै १९२८, व. ५९ अं. ७ / पृ. २६२–२७४.

काव्यस्वरूपाचा परिचय व परीक्षा. 'वाङ्मयदृष्ट्या विचार.' व्याकरण, लेखन, रचना इत्यादी दृष्टीने बाह्य गोष्टींचा विचार. एकाच वृत्तात रचना. त्यावर आक्षेप. भाषा गद्यसदृश. काव्य व कवी यांचा संबंध. शैलीचे कौतुक. उपहासात्मक विनोदाला

मिस्कील कुचाळकीचा उद्दाम दर्प. यमकयोजना. शब्दयोजना. वाक्यरचना. प्राचीन व खेडवळ शब्दांच्या उद्धारावर टीका. छन्दःशुद्धता. 'ऋ'. पटवर्धनांची लेखन-पद्धती. सहा मुद्दे.

—लेखांक ३ / ऑगस्ट १९२८, व. ५९ अं. ८ / पृ. ३१०-३१८.

या काव्यातील सामाजिक मतांचा विचार. काव्य आणि सामाजिक तत्त्वज्ञान यांचा संबंध काय? खरे तत्त्वज्ञान व उत्तम काव्य परस्परपोषक. सामाजिक सुधारणांविषयीच्या पटवर्धनांच्या अपेक्षांवर टीका. जातिभेदविचार. धार्मिक समतेचा विचार.

—लेखांक ४ / सप्टेंबर १९२८, व. ५९ अं. ९ / पृ. ३४९-३६२.

सामाजिक विचारांचे परीक्षण पुढे चालू. स्त्रीस्वातंत्र्याबाबत विचार. व्यक्ती आणि समाज यांचे संबंध. पटवर्धनांच्या स्त्रीरेखांची परीक्षा. विधवाविवाह, प्रेमाराधना वगैरेंविषयी. पुं-स्त्री मैत्री. स्त्री-पुरुषांतील विषमता. काव्यदृष्टीने मनःपूर्वक अभिनंदन, पण तरुणांच्या चाळ्यांचा पुरस्कार व समाजाला शिव्या देण्याचा उपक्रम हे नापसंत.

[यांपैकी शुद्धलेखनविषयक विवेचनाला 'विविधज्ञानविस्तारा'च्या नोव्हेंबर १९२८च्या अंकात पटवर्धनांनी उत्तर दिले आहे. पहा, पटवर्धनांचे वाङ्मय, पृ. ४८ क्र. १३२.]

४३. सुधारक (पुस्तकपरिचय) : महाराष्ट्र (नागपूर), रविवार १५ जुलै १९२८.

४४. सुधारक (पुस्तकपरीक्षण) : अनाम / ज्ञानप्रकाश, शुक्रवार २७ जुलै १९२८ / 'काव्यशास्त्रविनोदा'त ३॥-४ स्तंभ.

सर्वसाधारण गौरवपर परीक्षण. अगदी मोघम, स्थूल, अनिश्चित परीक्षण. (१) माधवराव व त्याचे काव्य यांचा गौरव. कथा अशी फार थोडी. कंसांच्या योजनेत नावीन्य असले तरी काव्यौघात विक्षेप येतो. चावटपणाच्या संभाव्य आक्षेपाचे निरसन. (२) वासूची व्यक्तिरेखा. थोडक्यात कथानिवेदन. (३) इतर व्यक्ती. रावबहादुर ठोसरांचे चांगले गुण चित्रित केले आहेत; पण त्यांचा काही गोष्टींबद्दल केलेला उपहास निष्ठूर वाटतो. रा. बं. चे वय ५०-५५ तरी असावे. पुनर्विवाहाच्या वेळी त्यांचे वय तिशीच्या आत असावे.—टपोऱ्या डोळ्यांनी कवीचा पिच्छा पुरवलेला दिसतो. (४) प्रेम आणि विवाह यांच्या दाखवलेल्या बाजू. कवीचा हेतू सफल. (५) 'काव्य' म्हणूनही रचना मनोरम, सफाईदार. काही अपरिचित संस्कृत-प्राकृत शब्द. लेखन-पद्धती खटकणारी. क्वचित् अश्लील ठिकाणे. प्राध्यापकांची हेटाळणी निंद्य. समाजातील घाणीचे प्रदर्शन-ती दूर व्हावी या हेतूने.

४५. सुधारक (परीक्षण) : ग. त्र्यं. माडखोलकर / अरुणमाला, ऑगस्ट १९२८ / पृ. १४-२३ [समाविष्ट : "वाङ्मयविलास", लेखसंग्रह, ग. त्र्यं. माडखोलकर /

ऑगस्ट १९३७ / २१ पृष्ठे; (२) " माझे आवडते कवि ", ग.त्र्यं. माडखोलकर / जून १९६५ / पृ. २२३–२४५.]

काव्य चांगले आहे, पण चांगले म्हणवत नाही अशी संभ्रांत अवस्था परीक्षण लेखकाची दिसते. हा लेख ' स्नेह्याचे परिहासविजल्पित ' ' हे वक्रोक्तिरम्य महाकाव्य लिहून प्रो. पटवर्धन यांनी " विश्वगुणादर्श "सारख्या सामाजिक उपहासकाव्याचे एक नवीनच दालन मराठी वाङ्मयात उघडले आहे. ' (१) प्रास्ताविक. विक्षिप्तपणात शिरणारे प्रो. पटवर्धनांचे बौद्धिक स्वातंत्र्य, स्ववैशिष्ट्य. (२) " सुधारका "त कवी व कोशकार यांचा संगम. (३) उपरोध काव्यामागील कवीच्या मनोवृत्तीची मीमांसा. काव्यात्म ध्येयप्रिय युवकाची प्रत्यक्षातील मनोभंगाने होणारी कटुवृत्ती. पण ध्येयाची बैठक जात नाही. (४) पात्रपरीक्षण. रा.ब. व्यवहारैकदृष्टी नेमस्त सुधारक. कवीची व्यापक सहानुभूती.- वासू हुतात्मा नाही; प्रेमपिपासू काव्यात्मा. (५) रचना, भाषा.

४६. **सुधारक** ( परीक्षण ) : प्रो. द. सी. पंगू / मनोरंजन, फेब्रुवारी १९२९, व. ३४, अंक ४०४ / पृ. ९३–१००.

सामान्य परीक्षण. (१) प्रास्ताविक. धावते वृत्त. ('खंडकाव्य' शब्द पंगू वापरीत नाहीत. ' कादंबरीच्या धर्तीवरील ' काव्य ) ( २ ) कथापरिचय. ( डॉ. ओंकार " रागिणी "तील बोधस्वरूप स्वामीप्रमाणे. ) ( ३ ) या काव्याचे वेगळेपण. ( काव्य-प्रबंध. ) उपमांची कोंडी, संकेत फोडले. नव्या उपमा, नवे संकेत. ( उदा० ' पाहा उलटता मध्यनिशा...' ). जातिभेद राष्ट्राला मारक हे योग्य. पण संकर हाच एक उपाय म्हणण्यात एकांगीपणा. ' कवीला याशिवाय दुसरा उपाय न सुचावा यातच त्याचा हेकेखोर स्वभाव स्पष्ट दिसतो. ' "बंधनाच्या पलीकडे" कादंबरीची आठवण. त्या कादंबरीत वडील-मातुश्रींमुळे प्रभाकराला मैनेशी लग्न करणे अत्यंत कठीण झाले. (४) अंतरंगवर्णन. (५) यातील सामाजिक मते. (६) वाङ्मयदृष्ट्या भरीव कामगिरी. संस्कृत व इंग्रजी सूक्तींची भाषांतरे. ' सर्व भगवद्गीतेचे असे भाषांतर कवीने करावे.' अशी सविनय शिफारस.–' वर मजल्यावर सार सुखाचे ' काव्यप्रकाश-मधील ' सार ' अलंकाराच्या श्लोकाचे भाषांतर. (७) भाषा. (८) समारोपात निःसंदिग्ध गौरव.

४७. **मराठी काव्यनाटकांची दिशा** ( पूर्वार्ध ) : वा. कृ. भावे / केसरी, २१ एप्रिल १९३१.

" सुधारका "वरील टीकेचा भाग यात. ' किंबहुना त्यांस समाजाला अनीतीच्या मार्गाकडे वळवावयाचे असल्यामुळे ' अशा शब्दांनी पटवर्धनांवर गंभीर आरोप.

४८. **सुधारक** ( समीक्षण ) गं.भा.निरंतर / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० /

पृ. ५६५–४७८. [ समाविष्ट : " ग्रंथांच्या सहवासात ", लेखसंग्रह, गं. भा. निरंतर / मार्च १९४५ / पृ. ७०–८८. ]

विस्तृत, महत्त्वाचा परीक्षणलेख. " सुधारक "च्या संबंधाने विचारांचे उठणारे तरंग. निर्माण होणारे प्रश्न. आगरकरांच्या 'सुधारक'बरोबर विचार.—' माधवरावांची मूळ प्रकृती भावगीतात्मक असल्यामुळे या खंडकाव्यातही भावगीताची उत्कटता उतरली आहे. '—" सुधारका "चे वैशिष्ट्य वाङ्मयीन नाही, तर सामाजिक आहे. वाङ्मयीन योग्यतेविषयी दुमत नाही.—सामाजिक जीवनेतिहासात "सुधारका"चे स्थान फार महत्त्वाचे आहे असे का वाटते हे दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न.—"सुधारक"मध्ये ज्या काळाचे समाजदर्शन ते नंतरच्या काळात कसे दिसते त्याचे अवलोकन. समाज-जीवनात पडत गेलेले अंतर. ' समाजाच्या दांभिकपणावर माधवराव हल्ला करू लागले म्हणजे त्यांच्यात आगरकरी आवेश उसळत असे. ' ' स्वतःच्या जीवनातील काही उणिवा भरून काढण्यासाठी त्यांनी ( पटवर्धनांनी ) काव्य सोडून विद्वत्तेचा आश्रय केला. ' कवी म्हणून पटवर्धनांचा मोठा गौरव.

**४९. माधवरावांचे " सुधारक " : एक उपहासप्रधान खंडकाव्य :** प्रा. गंगाधर नेर्लेकर / यशवंत, दिवाळी अंक १९६१ / पृ. ५१–५२.

**५०. माधवरावांच्या " सुधारका "चा नायक :** प्रा. गंगाधर नेर्लेकर / नवशक्ति, रविवार, ३ डिसेंबर १९६१ / सरासरी १/४ पृष्ठ.

वृत्तपत्री, छोटा, अत्यंत सामान्य लेख. अभ्यासाशिवाय, माहितीशिवाय लेखन. 'बासू राजे म्हणजे माधवराव ' असे मुख्य विधान. बासूचा अत्यंत गौरव. पटवर्धनांच्या नायिका सरस असा टीकाकारांचा अभिप्राय. पण बासूची व्यक्तिरेखा धीरोदात्त.

**५१. आवाहन :** ( प्रास्ताविक ) रा. श्री. जोग / सुधारक (आ० ३), मार्च १९६२/ पृ. ३–११.

" सुधारक " उपहासकाव्य. त्यातील टीकाविषय. " सुधारक " हे कथाकाव्य म्हणण्यापेक्षा व्यक्तिचित्रांची पोर्ट्रेट गॅलरी असे म्हणणेच युक्त होईल. यातील व्यक्ति-चित्रे अतिशय वास्तव आणि मर्मग्राही. —सुधारणेला विरोध असणाऱ्या गोष्टींचे विडंबन हा प्रस्तुत काव्याचा प्रधान हेतू. तरी यात कवीने आपला सुधारणेचा आदर्शही बासू राजेच्या व्यक्तित्वदर्शनाने दाखवून दिला आहे.—" सुधारका "चे मुख्य आवाहन रसिकाच्या बुद्धीलाच आहे, भावनेला नाही.—" सुधारका "ची निर्देशपरता.

**५२. सुधारक : काही विचार :** डॉ. पंडित आवळीकर / " वाङ्मयचिंतन ", ( लेखसंग्रह ) / पंडित आवळीकर / पृ. २१–३५.

"सुधारक" संबंधाने उत्पन्न होणाऱ्या अनेक प्रश्नांचा थोडाथोडा विचार. त्यामागे एक विचारप्रमेय नाही. तरीही काही विचार महत्त्वाचे.—"सुधारका"त माधवरावांच्या वैयक्तिक जीवनातील अनुभव शोधण्याचा प्रयत्न.—'माधवरावांची सुधारक लिहिण्यामागील भूमिका प्रचारकी आहे.'—माधवरावांत 'बुलबुल' आहे तसा 'स्वतंत्रतेचा कोंबडा' आहे. सुधारक म्हणजे या कोंबड्याची बांग.—'आत्मनिष्ठ माधवरावांनी वस्तुनिष्ठ मानल्या जाणाऱ्या काव्यप्रकाराचा आश्रय घेऊन सामाजिक प्रश्नांना हात घातला हेच काहीसे 'स्वधर्म' विरोधी होते.' समाजाच्या प्रश्नांशी भिडू पाहणारे, त्या प्रश्नांचा मूलगामी विचार करू शकणारे मन माधवरावांजवळ नव्हते. माधवरावांचे मन काव्यात्म होते, सामाजिक नव्हते.

## रु बा यां ची भा षां त रे

५३. **उमरखय्यामकृत रुबाया : ज्ञानप्रकाश, ८ नोव्हेंबर १९२९.**

५४. **उमरखय्यामकृत रुबाया** (परीक्षण) : अ. ज. करंदीकर / केसरी, २३ नोव्हेंबर १९२९.

'कोणत्याही इंग्रजी पद्यभाषांतरांपेक्षा हे भाषांतर मुळाला अधिक धरून झाले आहे.' इतका अनुकूल अभिप्राय देऊन मग लेखकाने त्या भाषांतरातील काही प्रमाद दाखवले होते आणि माधवरावांच्या भाषांतरविषयक मतांवर थोडक्यात सौम्य टीका केली होती.

५५. **उमरखय्यामकृत रुबाया** : द. गो. कुलकर्णी / मनोरंजन, डिसेंबर १९२९ / पृ. ४६१–४६३.

पटवर्धनांच्या भाषांतराचे सामान्य, अभिनंदनपर परीक्षण. उमरच्या सुराचा यात प्रतिध्वनी उमटत असल्याने मराठी प्रतिकृती फारच हृदयंगम बनली आहे.

५६. **उमरखय्यामकृत रुबाया** (पुस्तक-परीक्षण) : 'काव्यरत्नावलि', जुलै १९३५/ पृ. २५–२९. [म. नि.]

५७. **द्राक्षकन्या** (परीक्षण) : अ. ज. करंदीकर / रत्नाकर, १९३३. (?)

५८. **द्राक्षकन्या** (परीक्षण) : रा. श्री. जोग / हं. प्रा. ठाकरसी महाविद्यालय, नाशिक, नियतकालिक, १९३१–३२.

'"अभिनव काव्यप्रकाश"कर्ते रा. श्री. जोग ह्यांनी नाशिक कॉलेजच्या नियतकालिकात जे सूक्ष्म परीक्षण केले आहे, त्यात त्यांनी स्पष्ट म्हटले आहे की, "किंबहुना इतक्या अडचणींतून मार्ग काढून ह्यापेक्षा अधिक यशस्वी भाषांतर करणे अशक्यप्रायच आहे असे म्हणता येईल." परंतु हे परीक्षण कोपऱ्यात पडून राहिले आणि

इतर प्रतिकूल परीक्षणांनी मात्र आपला कावा साधला.' [ माधवराव पटवर्धन, 'मी व माझे टीकाकार', पहा, पटवर्धन-वाङ्मय ब. १.६ ]

५९. द्राक्षकन्या ( अभिप्राय ) : अनाम / वागीश्वरी, माघ श. १८५३, व. ३ अं. ५ / पृ. २५०-२५३.
विरोधी अभिप्राय.

६०. द्राक्षकन्या ( पुस्तक-परीक्षण ) : ज. नी. कर्वे / 'यशवंत', मार्च १९३२, अं. ४० / पृ. ११८-११९. [ म. नि. ]

६१. द्राक्षकन्या ( परीक्षण ) : केसरी, १२ जानेवारी १९३२.

६२. द्राक्षकन्या ( परीक्षण ) : महाराष्ट्र (नागपूर), रविवार २१ फेब्रुवारी १९३२.

६३. द्राक्षकन्या ( परीक्षण ) : श्री. के. क्षीरसागर / लोकशिक्षण, मे १९३२, व. ५ अं. ५ / पृ. २६६-२७३.

सामान्य, प्रशंसापर परीक्षण. ( १ ) प्रास्ताविक. उमरखय्याम. त्याचा फिज्जेरल्डने केलेला अनुवाद. त्याचा लौकिक. ( २ ) पटवर्धनांचे भाषांतर. अत्यंत योग्य व्यक्ती. अभिमानाची गोष्ट. पटवर्धनांचे पद्धतशीर प्रयत्न ज्ञात आहेत.—नितांतरम्य ओळी म्हणून रु. ५७ ची दुसरी द्विपदी, रु ४९,६९ यांची अवतरणे. ( ३ ) त्यांच्यावर इतरांकडून टीका. पण ती अपेक्षाभंगामुळे. अपेक्षा : ही 'फिट्झजेरल्डने उमर खय्यामचे जे केले तेच आमच्या मते माधवरावांनी फिट्झजेरल्डचे करावयास हवे होते.' पण पटवर्धनांची भूमिका वेगळी.—भाषेच्या बाबतीत पटवर्धनांचे नवीन सिद्धांत, त्यात हरघडी होणारे नवीन फेरफार. वर्णलेखनपद्धतीतही धरसोड.— 'चिरकालीन महत्त्वाच्या ग्रंथाचे खरे चीज होण्यास चिरकालाचीच अपेक्षा असते.' —'अशी परिश्रमाची व किचकट पुस्तके निघू लागली म्हणजे काव्याचा झरा आटला असे समजावयाचे की काय?' भीती. पण परिश्रमांचा उपहास न व्हावा. ( ४ ) समारोप. फार्सीची इतर मराठी भाषांतरे. भाषांतरांची आवश्यकता.

६४. उमरखय्यामकृत "रुबाया" व "द्राक्षकन्या" : अ. ज. करंदीकर / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० ( पटवर्धन अंक ) / ५७९-५८९.

अनेक विवाद्य विधाने-माधवरावांसंबंधी, व त्यांच्या कवितेसंबंधी. म्हणून महत्त्वाचा लेख. करंदीकरांनी स्वतः मूळ फार्सीतून रुबाया भाषांतरिलेल्या. पटवर्धनांचा व त्यांचा या भाषांतराबाबत वाद झालेला. त्याचे संदर्भ या लेखात. १. उमरखय्यामविषयीचे 'माधव जूलियन'चे आकर्षण. उमरच्या व्यक्तिमत्त्वाची त्यांच्या मनावर इतकी छाप का पडली? ज्ञानोपासनेत यौवन गेल्यावर वार्धक्यात निसर्गप्रेरणा प्रबळ झाली—हा गतशोक उमरच्या रुबायांत. नैसर्गिक प्रवृत्ती बलवत्तर होतात. या जड-

वादाचा यौवनारंभी प्रत्येक तरुणात उद्‌भव. यामुळे प्रथम-यौवनात माधवराव तिकडे आकृष्ट. पण कीर्तिरूपाने उरण्याचा ध्यास लागणारे माधवराव तेथून पुढे पराङ्मुख झाले. २. उमरच्या अनुवादांची माहिती.—बंगाली, हिंदी, मराठी भाषांतरे. ३. भाषांतरकार माधवराव. माधवरावांची प्रणयकविता प्रारंभीची. ती यशस्वी. (१) पण प्रतिभेने दगा दिल्यावर भाषांतरे. म्हणून अयशस्वी. भाषांतराची आदर्श कल्पना त्यांना होती, पण त्याला शोभेल असे भाषांतर उतरावे अशी त्यांची इच्छाच नसावी! (२) प्राणयमकांचे वेड (उदाहरणे). (३) परभाषी कवितेचे मराठी भाषांतर करण्याइतके भाषाप्रभुत्व त्यांना प्राप्त झाले होते का? प्रश्न.—मैथिलीशरणांच्या भाषांतराचा माधवरावांनी उपयोग केलेला. (४) अपरिचित, लालित्यहीन वृत्त.

## ग ज्ज लां ज लि

**गज्जलांजलि** (परीक्षण) : गोपीनाथ तळवलकर / मालवसाहित्य, भाद्रपद श. १८५५, व. ५ अं. १ (इंदूर विशेषांक)./ पृ. २६३-२६७.

परिचयपर, गौरवपर अभिप्राय.

**६६. गज्जलांजलि : ज्ञानप्रकाश, २ जुलै १९३३.**

'गज्जलांजलीवरील एक निनावी विपर्यस्त परीक्षण' असा पटवर्धन, 'मी व माझे टीकाकार' [पहा, पटवर्धन-वाङ्मय, व. १·६] या लेखात या परीक्षणाचा उल्लेख करतात. या परीक्षणाला पटवर्धनांचे उत्तर, 'गज्जलांजलि आणि वाङ्मय-ऋण', ज्ञानप्रकाश, १६ जुलै १९३३ [पहा, पटवर्धन वाङ्मय, पृ. ३५ क्र. ८९.]

**६७. गज्जलांजलि (परीक्षण) : दिवाकर कृष्ण / सकाळ, ५ ऑगस्ट १९३३.**

**६८. माधव जूलियनची "गज्जलांजलि"** (काव्यपरीक्षण) : के. नारायण काळे / प्रतिभा, १४ ऑगस्ट १९३३.

विस्तृत, महत्त्वाचा परीक्षण लेख. (१) प्रस्तावनेबाबत पटवर्धनांचे अभिनंदन. (२) कवितेविषयी पटवर्धनांची भूमिका. (३) प्रेमगीते-एकसाच्याची. प्रेमविकास, पर्यवसान यांची मांडणी ठरीव पद्धतीची. प्रेमगीतांत भावनेची उत्कटता असते, पण प्रकटनात मोकळेपणा, आवेश पुरेसा नाही. वर्णनकुशलता व भाषासौष्ठव. प्रेमकल्पना अभौतिक व त्यागनिष्ठ असली तरी सौंदर्यसमीक्षा भौतिक व ऐंद्रिय आहे. (४) ध्येयात्मक, तात्त्विक, विचारप्रकटनात्मक गीते.—भावगीतांच्या मानाने तात्त्विक कविता दुर्बल. त्यात जीवनविषयक दृष्टिकोणाचा, विशिष्ट स्वतंत्र विचारसरणीच्या संदेशाचा अभाव. (५) देशभक्तिपर गीते. त्यांत संकुचित दृष्टी, अशास्त्रीय विचार.

( ६ ) परिष्करणाच्या आत्यंतिक हव्यासामुळे काही कवितांत मूळच्या रसवत्तेला, जिवंतपणाला धक्का.

**६९. गज्जलांजलि** : विविधवृत्त, २७ ऑगस्ट १९३३.

**७०. गज्जलांजलि** : महाराष्ट्र ( नागपूर ), रविवार, १० सप्टेंबर १९३३.

**७१. गज्जलांजलि** : केसरी, २७ ऑक्टोबर १९३३.

**७२. गज्जलांजलि** : ( पुस्तक परीक्षण ) रा. वि. काळी / 'वागीश्वरी', ऑक्टोबर १९३३, व. ४ अं. ६ / पृ. ४५४–४५७ [ म. नि. ]

**७३. गज्जलांजलि** : ( समीक्षण ) के. ग. उमराणी / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० / पृ. ५९०–५९९.

माधवरावांच्या गज्जललेखनाची पार्श्वभूमी व परिचय.–गज्जललेखनावरील विरोधी टीका. त्यांचा समाचार.—गज्जलांचा विशेष सांगण्याचा प्रयत्न.—माधवरावांची गज्जलरचनेतील कामगिरी.—'दारुण परिस्थितीच्या दावानलाने त्यांची काव्यलता होरपळून निघाली....त्यांच्या बुद्धीने जीवनाचा मार्ग विद्वत्तेच्या रूक्ष वैराणातून आक्रमिण्यास आरंभ केला.'

## स्व प्न रं ज न

**७४. स्वप्नरंजन** ( समीक्षण ) : काशीनाथ धोंडो पेडणेकर / राजारामीयन, डिसेंबर १९३४ / १२ पृष्ठे.

**७५. स्वप्नरंजन** ( परीक्षण ) : डॉ. रा. अ. राईरकर / ज्ञानप्रकाश ( साप्ताहिक ), रविवार, १६ डिसेंबर व २३ डिसेंबर १९३४, दोन लेखांक ( 'काव्यशास्त्रविनोद' ).

माधवरावांचा गौरव. तांबे, चंद्रशेखर, बी यांच्यानंतर माधवरावांचेच स्थान.— माधव ज्यूलियनांच्या प्रेमगीतांचे गोविंदाग्रज, तांबे यांच्या प्रेमगीतांपेक्षा वेगळेपण [ हे विवेचन थोडे महत्त्वाचे ].

**७६. स्वप्नरंजन** ( परीक्षण ) : महाराष्ट्र ( नागपूर ), रविवार, १० फेब्रुवारी १९३५.

**७७. स्वप्नरंजन** ( परीक्षण ) : नी. म. केळकर / प्रतिभा, १५ फेब्रुवारी १९३५, पृ. ६–८.

सामान्य परीक्षण. ( १ ) कवी म्हणूनच्या लोकप्रियतेपेक्षा विद्वत्तेचा अधिक लौकिक. म्हणून प्रेमापेक्षा आदराने जनता वागवते. ( २ ) कालक्रमानुसार कवीच्या कृतींतून दिसणाऱ्या बदलत्या मनोवृत्तीच्या अनुरोधाने परीक्षण. ( ३ ) माधवरावांच्या परिष्करणाच्या भूमिकेला चित्रकलेतील अनुभवाने पाठिंबा. स्फूर्तीच्या आवेगाने चैतन्य निर्माण होते, संस्करणाने कलावस्तूचे स्वरूप अधिक सफाईदार होते.

७८. **स्वप्नरंजन** : सौ. विमला भावे / संजीवनी (पाक्षिक), फेब्रुवारी १९३५ / व. २ अं. २७ / पृ. २०–२२.

गौरवपर, रसग्रहणपर. विशेष काही नाही. जवळच्या चाहत्याने भारावून केलेली स्तुती.—प्रेमभंगानंतरही माधवराव कोमलपणाने बालपणच्या आठवणी सांगतात. त्यांची बालगीते सरस आहेत.—पर्शियन भाषेचे त्यांना ज्ञान नसते तर बरे झाले असते. त्या ज्ञानाने त्यांच्या कवितेला उणेपण, जडत्व येते.—तांबे यांच्या जोडीचे कवी.

७९. **स्वप्नरंजन** (परीक्षण) : रा. श्री. जोग / सह्याद्रि, एप्रिल १९३५ / पृ. ३३१–३३६.

गौरवपर विवेचन.—पूर्वी प्रसिद्ध झालेल्या कवितांचे या संग्रहात संकलन; अभंग मात्र बहुतेक नव्याने उपलब्ध होत आहेत. 'स्वप्नरंजन' नाव अपरिचित, अव्यक्त-रमणीय.—अंतर्बाह्य वैचित्र्य. कोणत्याही परंपरेचे गुलाम नाहीत.—फार्सी, संस्कृत (हेच अधिक क्लिष्ट), अस्सल मराठी, इंग्रजी शब्द-संकेतयोजना. हे मिश्रण एके ठिकाणी झाल्याने वाचक बिचकून गेल्यास नवल नाही—शब्दचित्रांची मोहक माला. स्त्रियांप्रमाणे पुरुषांची अशी सुंदर चित्रे फारशी नाहीत. अभंगांत भावनेचा उत्कर्ष.—लढाऊ वृत्ती. आशावादी. रडवी किंवा हळवी वृत्ती नाही. उमरच्या तत्त्वज्ञानाचा सुदैवाने फारसा परिणाम नाही.—शिशुगीते वैशिष्ट्यपूर्ण.—वाङ्मयीन निर्देश.—संस्करण.—यमकांचे प्रेम. इतर बाह्य रचनेची थोडी चर्चा. पटवर्धन समकालीनांपेक्षा हमखास श्रेष्ठ असूनही त्यांचे योग्य तेवढे चीज होत नाही.

८०. **स्वप्नरंजन** : महाराष्ट्र शारदा, मे १९३५ / पृ. ५१.
त्रोटक, अर्धे पान अभिप्राय. सामान्य. गौरव, पण मार्मिकता नाही.

८१. कवि माधव जूलियन यांचे **स्वप्नरंजन** (परीक्षण) : भ. श्री. पंडित/विहंगम, मे १९३५, व. २ अं. २३ / पृ. २३८–२४६.

सर्वसाधारण गौरवपर अभिप्राय. [ बडोद्याच्या साहित्य संमेलनाला, काव्यविभागाचे अध्यक्ष म्हणून पटवर्धन जाताना वाटेत सासुरवाडीला नागपूरला उतरले होते. 'त्यांनी मी 'विहंगमा'त समीक्षण लिहावे अशी इच्छा प्रकट केली म्हणून मी प्रस्तुत लेख लिहिला होता. त्यातील स्पष्टवक्तेपणा त्यांना फारसा रुचला नाही असे वाटते.' भ. श्री. पंडित, मला आलेल्या दि. २६ डिसेंबर १९६६ च्या पत्रातून. सु. रा. चु. ]

८२. स्वप्नरंजन (परीक्षण) : गो. ग. तळवलकर / कला, जुलै १९३५, व. १ अं. ३ / पृ. ३६–३९.

सामान्यतः गौरवपर अभिप्राय.

८३. स्वप्नरंजन ( ग्रंथपरीक्षण ) : रामचंद्र रावजी नातू / सद्विचार, डिसेंबर १९३५ / पृ. ७–११.

गौरवपर सर्वसाधारण परीक्षण.–जिव्हाळ्याच्या प्रामाणिकपणाने व कणखर ओजाने कलाकृती नटली आहे.–प्रेमगीते व शिशुगीते सर्वांत प्रभावी व सुंदर.

८४. स्वप्नरंजन ( ग्रंथपरीक्षण ) : डॉ. रा. चिं. श्रीखंडे / लोकशिक्षण, डिसेंबर १९३५ / पृ. ३८५–३९८.

प्रमुख प्रतिकूल परीक्षण. या परीक्षणावर बरेच वादंग. 'लोकशिक्षण' च्या जानेवारी-फेब्रुवारी १९३६ च्या जोडअंकात माधवरावांनी 'उत्तर नव्हे, थोडे स्पष्टीकरण' करण्याचा प्रयत्न केला. [पहा, पटवर्धनांचे वाङ्मय, पृ १३,क्र. १५ ]. त्याला डॉ. श्रीखंड्यांचे उत्तर 'पुनश्च स्वप्नरंजन' [ पहा, क. ३. ८७ ]. श्रीखंड्यांनी इतरत्रही या परीक्षणाचा अनेक ठिकाणी उल्लेख केला आहे. माधवरावही या लेखाचा अनेकदा प्रत्यक्षाप्रत्यक्ष उल्लेख करीत. तांबे ( यांचे पत्र श्रीखंडे यांनी 'लोकशिक्षण', पटवर्धन–अंकात छापले आहे ), गिरीश यांनी यावर मत प्रकट केले आहे.–( १ ) चार पृष्ठे प्रास्ताविक. ( २ ) पाच पृष्ठे बाह्यांगासंबंधी. छंद-वृत्त–जाती, यतिभंग, समास, संधी यांतील दोषदर्शन. (३) वैयक्तिक प्रौढीचा आरोप. संघशक्ती व जाहिरात यांच्या प्रभावाने पटवर्धनांना लोकप्रियता लाभली. 'मुलांना खेळण्यासाठी रचलेल्या कवितांखेरीज' 'बऱ्या कविता' नाहीत –लेखनात उपहासाची धार. संस्कृत, जुने मराठी यांतील अनेक अवतरणे. संस्कृत पंडिती परंपरेचे परीक्षण.

८५. "स्वप्नरंजन" व डॉ. श्रीखंडे : 'महाराष्ट्र'तील टीकेला उत्तर. रा. चिं. श्रीखंडे / महाराष्ट्र, ९ फेब्रुवारी १९३६.

१२ जानेवारी १९३६ च्या 'महाराष्ट्र'तील लेखावरून "स्वप्नरंजन"च्या परीक्षणाबाबत डॉ. श्रीखंड्यांचे पत्र.

८६. संघशक्ती व जाहिरातकला : ग.त्र्यं. माडखोलकर / महाराष्ट्र, २३ फेब्रुवारी १९३६.

पटवर्धनांच्या 'माझ्या आयुष्याचा माझ्या लेखनावर परिणाम' लेखावर [ पटवर्धनांचे वाङ्मय, पृ १०,क्र.४] टीका. पटवर्धनांच्या लेखनकीर्तीचे श्रेय स्वतःकडे घेणारा लेख. [या आधी 'प्रतिभा', १२ ऑक्टोबर १९३४ च्या अंकातील 'कवि यशवंत' या परिचयलेखात माडखोलकरांचे पटवर्धनांच्या प्रसिद्धीचे श्रेय स्वतःकडे घेणारे विधान. ]

८७. पुनश्च थोडे "स्वप्नरंजन" : रा. चिं. श्रीखंडे / लोकशिक्षण, मार्च १९३६.

'लोकशिक्षणा'च्या जानेवारी–फेब्रुवारी १९३६ च्या जोडअंकातील पटवर्धनांचे 'स्पष्टीकरण' (पहा : पटवर्धनांचे वाङ्मय, पृ.१३,क्र.१५) प्रसिद्ध झाल्यावर त्याला हे उत्तर. या लेखातही मोकळेपणा, तात्त्विक प्रांजलपणा यापेक्षा खोचकपणा अधिक.— पटवर्धनांचे स्पष्टीकरण विपर्यस्त असून पटणारे नाही. त्यात आग्रही हेका आहे हा प्रतिपादनाचा मुख्य रोख.—(१) 'रसिकास मूळ सत्याशी कर्तव्य नाही' या विधानाला विरोध. 'सर्वां खल्विदं माया' कवितेतील भूमिका पटवर्धनांनाही लागू पडते. (२) स्वकवित्वाच्या वाखाणण्याचा अनुचित उल्लेख दुसऱ्या शिष्टमान्य कवीवर घालणेही अयोग्य. (३) केवळ परीक्षणलेखाच्या लांबीमुळे श्रीखंड्यांचे "स्वप्नरंजन"चे परीक्षण 'पुरुषार्थ'च्या संपादकांस स्वीकारता आले नव्हते.

८८. **डॉ.श्रीखंडे व माधव ज्यूलियन** : श्री. चंपाराम, कोल्हापूर / प्रकाश, ऑगस्ट १९३६ / पृ. ७–८.

श्रीखंडे यांच्या 'लोकशिक्षणा'तील "स्वप्नरंजना"वरील परीक्षणलेखावर [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय क्र. ३·८४ ] संतापून टीका उथळ. त्यात स्वतः चम्पारामच "स्वप्नरंजन" प्रसिद्ध झाले नसते तर बरे झाले असते' असे विक्षिप्त विधान करतो.

८९. **चंपाराम की तळीराम ?** : डॉ. रा. चिं. श्रीखंडे / प्रकाश, सप्टेंबर १९३६/ पृ. १२–१३.

'डॉ. श्रीखंडे व माधव ज्यूलियन' या चम्पारामांच्या लेखावर [ पहा, पटवर्धन-विषयक वाङ्मय, क. ३·८८ ] प्रतिलेख. त्या लेखातील एका विधानाच्या निमित्ताने "विरहतरंगा"वर एखादा स्तंभ थोडी औपरोधिक टीका.

९०. **माधव जूलियन आणि गंगातेली** : वि. वा. शिरवाडकर / विविधवृत्त, २३ मे १९३७ / १। पृष्ठ.

"स्वप्नरंजन"वरील डॉ. श्रीखंडे यांच्या लेखाला [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क. ३·८४ ] भडकपणे उत्तर देणारा लेख. माधव जूलियनांचा गौरव.

९१. **संगमोत्सुक डोहाची कहाणी** :—रसग्रहण : १; वा. के. कानेटकर / सह्याद्रि, नोव्हेंबर १९३८ / पृ. ८८७–८९०.

या कवितेत दोन नद्यांच्या संगमाची कल्पना नाही.–ध्येयवादी पण खडतर वर्तमान असणाऱ्या व्यक्तीचे डोह प्रतीक.–अंमळनेरच्या अज्ञातवासात या कवितेचे लेखन. ते सूचक. पटवर्धनांच्या अंतर्जीवनाशी संबंधित.

९२. **संगमोत्सुक डोहाचे रसग्रहण** : मनोहर, जानेवारी १९३९ / पृ. ६१–६२.

प्रा. म. श्री. पंडित यांची कानेटकरांच्या वरील लेखावाबत पृच्छा व मा. त्रिं. पटवर्धन आणि गिरीश यांचे उत्तर. [ म. नि. ]

**९३. सर्वां खल्वियं माया :** शं. के. कानेटकर / सह्याद्रि, जानेवारी १९४० / पृ. ७०–७३.

पटवर्धनांच्या ' सर्वां खल्वियं माया ' कवितेचे विवरण, तिची पार्श्वभूमी, रसग्रहण. त्या अनुषंगाने माधवरावांच्या जीवनावर भाष्य.–कवितेवर एवढे विस्तृत भाष्य करताना मूळ रेंदाळकरांच्या गीतातील हृदयस्पर्शी उत्कटता गवसली नाहीच. रेंदाळकरांच्या ' अजुनि चालतोचि वाट ' कवितेसह विचार.–' माधवरावांनी ही कविता जरी रेंदाळकरांची भावना रेखाटण्यासाठी लिहिली असली, तरी ते स्वतः तितकेच, किंबहुना अधिकच ध्येयवादी असल्याने त्यांनाही ही कविता तितक्याच यथार्थतेने लागू पडते. ' सर्वच ध्येयवाद्यांच्या जीवनात अशी भ्रमणे.–भास्करराव तांब्यांचे माधवरावांना उद्देशून उद्गार, ' ध्येयवादी रहा. ' माधवरावांच्या अखेरच्या धडपडीचे चित्रण. ही कविता त्यांचे आत्मचरित्रच. ( पटवर्धनांचे पुण्यावरील निस्सीम प्रेम. )

**९४. मराठी असे आमुची मायबोली :** शं. के. कानेटकर / सह्याद्रि, जानेवारी १९४०.

' मराठी असे आमुची मायबोली ' या माधवरावांच्या रेडिओवरील भाषणाचे [पहा, पटवर्धनांचे वाङ्मय,पृ.१४,क्र.१८] पूर्वसूत्र.अखेरच्या ५–६ दिवसांत ते लिहिले. त्यावेळचा प्रसंग.–( १३ डिसेंबर १९३९ ला कानेटकरांनी माधवरावांचे थोडक्यात चरित्र रेडिओवर सांगितले. )

**९५. स्वप्नरंजनातील काही स्वप्ने :** द. ल. गोखले / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० / पृ. ६००–६०७.

महत्त्वाचा लेख. माधवरावांच्या कवितांतील अल्लड कुमारिका आणि तरुण प्रेयसी यासंबंधीच्या कवितांतील स्वप्नविवेचन.–" स्वप्नरंजना " तील माधव जूलियनांच्या कवितांकडे कल्पनाविलासाच्या, कलोत्कर्षाच्या, व भाषासौकर्याच्या दृष्टीने पाहिल्यास त्यांत तीन कालखंड पडलेले आढळतात. ' मुरली 'पासून ' एक घाव ' पर्यंत पहिला खंड, ' कौमार्यस्मित'पासून ' संगमोत्सुक डोह'पर्यंत दुसरा खंड, व तेथून शेवटपर्यंत तिसरा खंड.–या तीनही विकासखंडांशी त्यांच्या आयुष्यातील हेलकाव्यांचा निकट संबंध आहे.

**९६. माधवरावांची स्वप्नभूमी :** शं. के. कानेटकर / प्रस्तावना, " स्वप्नरंजन ", आ. २ / ३१ डिसेंबर १९४९ / २३ पृष्ठे.

या लेखात काही ठिकाणी भाषेचा फुलोराच ( अर्थ नसणारा वा स्पष्ट न होणारा ) अधिक. लेखात विवाद्य वा ठोकळपणे केलेली विधाने अनेक; पण त्यांचा परामर्श घेताना अभ्यासासाठी काही मुद्दे निर्माण होतात. माधवरावांवरील अनेकांगी टीका

मनात ठेवून लेखन झाल्याचे दिसते. स्वतंत्र प्रतिपादनापेक्षा आक्षेपनिराकरणाचे स्वरूप.– १. माधवरावांसंबंधी तरुणांत अजून साशंकता. "आमची अकरा वर्षे" नेही शांतवन नाही. समग्र चरित्र व पत्रव्यवहार हवा. २. चरित्राची थोडक्यात रूपरेषा. स्नेही. फर्गसन कॉलेज प्रकरणाचा मोघम उल्लेख ('काही मतभेद होऊन' माधवराव बाहेर पडले). ह्यातीत स्वपराक्रमसंपाद्य यशावरही टीका. मृत्यूनंतर त्यांना न्याय मिळून शत्रू, टीकाकार लुळे पडले. ३. माधवरावांची काव्यकल्पना. "विरहतरंग", 'कलारहस्य' यांतील उतारे. "नकुलालंकार" संबंधी आठवण. काही सूचना. ४. चारित्र्य व व्यक्तिमत्त्वाचे वर्णन. (विधानांमध्ये चिकित्सकता नाहीच. मित्राची भाविकता, गौरववृत्ती). ५. काव्य. "स्वप्नरंजना"तील कवितांचे विषय वर्गवारीने विवेचन. (१) १/३ पेक्षा अधिक भाग शुद्ध प्रेमविषयक. [श्री. के. क्षीरसागरांच्या टीकेशी काही ठिकाणी प्रतिवाद दिसतो.] (२) वात्सल्य. 'जानू'ची आठवण. समर्थकाची भूमिका. (३) राष्ट्रीय वृत्ती. समाजसुधारणेची पोटतिडीक. देशाभिमान व मानवधर्म व्यापक. (४) सौंदर्यवाद. (५) मनाची आध्यात्मिकता. (६) भाषांतरे (७) संकीर्ण. ६. टीकाकार. (१) वा. अ. भिडयांसंबंधी कृतज्ञभाव. (२) श्रीखंडे यांच्यासंबंधी कडक, संतापयुक्त उद्‌गार. ७. खडबडीत भाषेच्या आक्षेपाला उत्तर. केशवसुतांची आठवण. ८. समारोप.

९७. **स्वप्नांचा सुगंध** : शं. के. कानेटकर / "स्वप्नलहरी" ची प्रस्तावना / २४ ऑगस्ट १९५३.

१. केशवसुतांनंतर समाजाला धक्के देणाऱ्या कवींपैकी माधवराव अग्रेसर. केवळ विस्तरण व व्यवस्थापन या दोन मापांत त्यांची कविता बसत नाही. अनेक गुणविशेष. २. त्यांची कविता त्यांच्या जीवनातून निर्माण झाली आहे. जीवन समजल्यावरच कविता अधिक समजेल. जीवनाची रूपरेषा. ३. जीवनातून ध्येयवादाकडे व कलेकडे. त्यांचे जीवन साकल्याने दुःखातच गेले. त्यांपैकी निम्मी दुःखे परिस्थितिजन्य, तर निम्मी त्यांच्या सौंदर्यजीवी ध्येयवादातून निर्माण झालेली. ४. माधवरावांची कविता. (१) दिव्य प्रेम. वास्तव प्रेमाचे शाहीर. (२) राष्ट्रीय व सामाजिक कविता. (३) वात्सल्यगीते. (४) आदर्श व्यक्ती व संस्था यांना उद्देशून. व्यापक मानवता. भारताबाहेरीलही विषय. (५) भाषांतरे उत्कृष्ट.

९८. **एका कवितेची कथा** : अनाम / आलोचना, ऑक्टोबर १९६७ / पृ. २२–२५, 'संशोधन विभाग.'

[समाविष्ट : "भ्रमर परागु नेती", लेखसंग्रह / म. ल. वराडपांडे / जून १९७३/ पृ. ३७–४०.]

"स्वप्नरंजन"चे डॉ. श्रीखंड्यांचे परीक्षण, त्यानिमित्ताने श्रीखंडे–पटवर्धन

यांच्यांतील उत्तर-प्रत्युत्तरे यांचा बराच उल्लेख. 'सर्वां खल्विदं माया' कवितेची [ स्व. रं. ९२ ] कथा. टिपणात विशेष काही नाही. माहितीवजा टिपण. शेवटचे वाक्य मान्य होणारे : 'रेंदाळकरांवरून ही कविता स्फुरली असली, तरी तीत स्वानुभवाचा भाग आहे हे नाकारता येत नाही. अर्थात् रेंदाळकरांची कविता 'अजुनि चालतोचि वाट' जास्त भावपूर्ण आहे.'

**९९. एका कवितेची कथा :** २ : म. ल. वराडपांडे / आलोचना, जुलै १९६८ / पृ. २८–३२. [ समाविष्ट : "भ्रमर परागु नेती" लेखसंग्रह / म.ल. वराडपांडे / जून १९७३ / पृ. ४१–४६ ]

'आत्मप्रतीति' [ स्व. रं. १०१ ] या कवितेची कथा. गिरीशांच्या वराडपांड्यांशी अलीकडील पत्रव्यवहाराचा संदर्भ. पण तो निरुपयोगी. 'आत्मप्रतीति' लिहिताना पटवर्धनांच्या पुढे 'आत्मजागृति' हे सुमंतांचे "भावनिनाद" मधील सुनीत असावे. 'या उपहासिकेचा एकंदर सूर पाहिला तर यात विनोदापेक्षा वैयक्तिक विद्वेषाचा विखारच जास्त आहे."—'क्षुद्रबुद्धि' कविता [ ? ]

**१००. माधव जूलियन :** भवानीशंकर पंडित / सत्यकथा, जून १९६९ / पृ. ७३–७५.

'ऐकव तव मधुबोल' [ स्व. रं. ४८ ] कवितेसंबंधीची आठवण. 'शांताबाई कशाळकरांना उद्देशून प्रस्तुत गीत आहे असा माझा कयास आहे.' माधवराव विद्यापीठाचे परीक्षक म्हणून मुंबईला जात, तेव्हा शांताबाईंना भेटत. [ कयास चूक, माधवरावांनी शांताबाईंना पाठवलेल्या पत्रात '१९३० पर्यंत तुमचे फक्त नाव माझ्याकडे शिल्लक असल्याचा' उल्लेख. मधल्या काळात गाठीभेटी नाहीत.— सु. रा. चु. ]

**१०१. माधव जूलियन :** गं. दे. खानोलकर / सत्यकथा, जुलै १९६९. चर्चा-टिपण. भवानीशंकर पंडितांच्या 'सत्यकथा', जून १९६९ मधील टिपणाच्या [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय क. ३. १०० ] निमित्ताने. त्याचे खंडन.

**१०२. माधव जूलियन :** रा. भि. जोशी / सत्यकथा, ऑगस्ट १९६९ / पृ. ७३–७४. चर्चा-टिपण. भवानीशंकर पंडितांच्या [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क. ३. १०० ] विवेचनाचे खंडन.

**१०३. मी कुठून आलो आई : एक प्रश्न दोन प्रेरणा :** दुर्गा भागवत / धरती, दिवाळी अंक, १९७३ / पृ. १३७–१४३.

माधव जूलियनांची 'मुलाचा प्रश्न' [ ऊर्फ 'विमला आणि अशोक', स्व. रं. ८ ] आणि रवीन्द्रनाथ टागोरांची 'जन्मकथा' ही "शिशु" या संग्रहातील कविता

यांचा एकत्र, तुलनात्मक विचार. चांगला लेख.–दोन्ही कवितांचा दर्शनी विषय एक असला, तरी त्यांच्या प्रेरणा भिन्न आहेत. [ दोन्ही कविता उद्धृत. टागोरांच्या कवितेचा मराठी अनुवादही दिला आहे. ]

**१०४. कवितेचा तोंडावळा व अंतरंग** : यशवंत दि. पेंढरकर / रविवार सकाळ, २५ नोव्हेंबर १९७३ / १/४ पृष्ठ.

भास्करराव तांबे यांची ' सखये या स्थानी ' आणि माधव जूलियनांची ' तेथे चल राणी ' या दोन कवितांच्या एकत्र वाचनातून सुचणाऱ्या विचारांचे टिपण.

## राजकवि भास्कर रामचंद्र तांबे यांची समग्र कविता

**१०५. तांबे यांची समग्र कविता** : [ परीक्षण ] म. सा. पत्रिका, ऑक्टोबर १९३५.

**१०६. कविवर्य तांबे आणि माधव जूलिअन** : म. ल. वराडपांडे / " भ्रमर परागु नेती " [ लेखसंग्रह ] / जून १९७३ / पृ. ३०-३६.

पटवर्धनांच्या ग्रंथसंग्रहात मायदेवप्रकाशित " भास्कर रामचंद्र तांबे यांची समग्र कविता " ची प्रत उपलब्ध झाली. पटवर्धनांनी आपली आवृत्ती छापण्यासाठी मुद्रणप्रत तयार केली, तेव्हा मूळ पाठात त्यांनी कोणते व कसे बदल केले याची या प्रतीवरून कल्पना येते. त्या प्रतीवरून पटवर्धनांच्या संस्करणाचा करून दिलेला परिचय. ' माधवरावांच्या स्पर्शाने तांब्यांच्या काव्यसुमनांचे सौंदर्य विकसित झाले आहे. '

**१०७. तांबे यांच्या कवितेचे परिष्करण** : भीमराव कुलकर्णी / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, डिसेंबर १९७३ / तांबे विशेषांक / पृ. १३९–१४९.

तपशीलच जास्त, म्हणून लेखाचा विस्तार. चिकित्सा नाही. तांब्यांच्या कवितांची वही त्यांच्या मुलाकडून मिळाली. तिचा उपयोग. पत्रे, पुस्तके यांतील उतारे पुष्कळ.– पटवर्धनांच्या संपादकीय कार्याबद्दल सार्थतेचे, गौरवाचे उद्गारच. पण तांब्यांच्या कवितांची यथामूल आवृत्ती काढण्याची सूचना. ( १ ) छंदनिर्देश. ( २ ) ध्रुवपद. ( ३ ) विरामचिन्हे. ( ४ ) शब्दबदल. ( ५ ) फेरबदल.

## छंदोरचना

**१०८. छंदोरचना** ( प्रथमावृत्ती. परीक्षण ) : ज्ञानप्रकाश, ८ ऑगस्ट १९२७ सुमार ( शुक्रवार ). [ संदर्भ : रा. वि. मराठ्यांना पत्र, १५ ऑगस्ट १९२७. ]

**१०९. छंदोरचना** ( प्र. आ. ) : महाराष्ट्र ( नागपूर ), रविवार, २१ ऑगस्ट १९२७.

" छंदोरचने " वरील न. चिं. केळकरांच्या अभिप्रायाच्या [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क. ३. १११ ] अगदी विरुद्ध अभिप्राय. 'हा ग्रंथ भाषेच्या दृष्टीने निकृष्ट दर्जाचा आहे.'

**११०. छंदोरचना** ( प्र. आ. ) : मासिक मनोरंजन / ( ? )

'( १९२७ त " छंदोरचना " प्रसिद्ध झाली. तिचे सर्वत्र स्वागत झाले. ) नाही म्हणायला एका बुद्धिमान पण उतावळ्या लेखकाने त्याच्यावर काहीतरी अनधिकारी टीका करून ती मासिक ' मनोरंजना ' त प्रसिद्ध केली होती.' [ पटवर्धन, ' मी व माझे टीकाकार. ' ].

**१११. छंदोरचना** : ( प्र. आ., अभिप्राय ) न. चिं. केळकर / केसरी, १३ सप्टेंबर १९२७. [ समाविष्ट : समग्र केळकर वाङ्मय, खं. १०, पृ. ७२६–७३३ ]

सर्वसाधारण परीक्षण. गौरवात्मक. परिचयपर. सहज वरवरच्या वाटणाऱ्या काही उणिवांचे, दोषांचे दिग्दर्शन. सर्वसाधारण वाचकासाठी सर्वसाधारणतः जाणकाराकडून लिहिलेला वृत्तपत्रीय लेख. ( १ ) परिचय. गौरव. कवित्व व चिकित्सक बुद्धी एकत्र. पूर्वग्रंथांपेक्षा वेगळेपण. ( २ ) वृत्त, छंद व जाती असे वेगळे प्रकार मानण्याचे कारण नाही. एकच ' वृत्त ' पुरे. ' छंद ' मानणे योग्य नाही. ( ३ ) जातिविस्तार प्रकरणात पटवर्धनांचे नावीन्य, स्वतंत्रत्व. मात्र पटवर्धनांनी दिलेली जातिनामे फारशी रूढ होणार नाहीत असे वाटते. ( ४ ) जाती आणि तिच्या व्याख्येतील क्लिष्टता यांची तीन उदाहरणे : भरत, मुद्रिका, मनी.—अशा चर्चेपासून विधायक साहाय्य फारसे होणार नाही ही तक्रार. ( ५ ) दोन परिच्छेद गौरवपर. भाषेबद्दल गौरव.

**११२. छंदोरचना** : ( प्र. आ., परीक्षण ) : वा. अ. भिडे / रत्नाकर, जुलै १९२८, व. ३ अं. ७ / पृ. ४८६–४८९.

रविकिरण मंडळाच्या वाङ्मयप्रकाशनांची प्रशंसा.—ग्रंथपरिचय,— ' ऋ 'बद्दल मतभेद.—नव्या गणपद्धतीची ग्राह्याग्राह्यता.—' छन्द ' हा ' जाती 'तच समाविष्ट व्हावा.—" छंदोरचने "चे विशेष.—' पद्यातील व्याकरणविशेष ' व ' पद्याची भाषा ' या प्रकरणांविषयी.—परभाषेतील शब्द किती व कोणते घेऊ द्यावेत ? — पटवर्धनांचे मनःपूर्वक अभिनंदन.

**११३. Chandoracana** : [ Review ] P. K. Gode / Oriental Literary Digest, 1937, No. 2 / $1\frac{1}{2}$ Column.

**११४. छंदोरचनेतील स्वकृत पद्ये** : गो. ग. तळवलकर / सह्याद्रि, ऑक्टोबर १९३७ / पृ. ७७८–७८०.

" छंदोरचने "तील पटवर्धनांनी स्वतः जे उदाहरणपद्यखंड रचिले आहेत त्यांतील सौंदर्याचे दर्शन.

**११५. छंदोरचना :** ( आवृत्ती दुसरी, समालोचन ) : न. चिं. केळकर / सह्याद्रि, जून १९३७. [ समाविष्ट : " केळकरांची निबंधमाला ", पृ. २१३–२३० ]

हा लेख अधिकारी लेखकाचा अभ्यासपूर्ण, तत्त्वचिकित्सात्मक लेख नसून सामान्य जिज्ञासू वाचकांकरिता लिहिलेला सर्वसाधारण परिचयलेख आहे. ( १ ) माधव ज्युलियनांचा मनोविकास. पटवर्धनांच्या काव्यबुद्धीपेक्षा त्यांच्या चिकित्सक बुद्धीविषयी आदर. ( २ ) " वृत्तदर्पण " ते " छंदोरचना ". पूर्वीचे ग्रंथ शालोपयोगी तरी किंवा वाढते संकलनात्मक. त्यांत संशोधन नाही.—पटपर्धनांच्या उद्योगशीलतेचे कौतुक. ( ३ ) विस्ताराने ग्रंथपरिचय. ( ४ ) काही सर्वसामान्य, किरकोळ सूचना. नामकरणावर टीका. या ग्रंथाला मुंबई विद्यापीठाने ' डॉक्टोरेट ' द्यावी अशी सूचना. ( ५ ) स्वैर पद्यरचनेविषयी सामान्य, प्रतिकूल अभिप्राय.

**११६. छंदोरचना :** महाराष्ट्र ( नागपूर ), रविवार, १८ जुलै १९३७.

गौरवपर, वृत्तपत्री, छोटा परिचयलेख.

**११७. छंदोरचना** ( ग्रंथपरिचय ) : के. नारायण काळे / ज्योत्स्ना, सप्टेंबर १९३७ / ३॥ पृष्ठे.

सर्वसाधारण परिचयपर, अभिनंदनपर लेख. ( १ ) विद्वत्त्व—कवित्व यांचा संगम. ( २ ) ग्रंथलेखनात कंटाळवाणेपणा नाही. त्यातही लाघव.

**११८. छंदोरचना** ( परीक्षण ) : विष्णु बापूजी आंबेकर / ज्ञानप्रकाश, शुक्रवार, १० सप्टेंबर १९३७.

**११९. एक अभिनंदनीय संशोधनकार्य :** यशवंत महादेव चक्रदेव / राजारामीयन, सप्टेंबर १९३८.

गौरवपर परीक्षण.

**१२०. छंदोरचना** (परीक्षण) : ना. ग. जोशी/महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर १९३८, व. ११ अं. ४ / २ पृष्ठे.

परिचय. पहिल्या व दुसऱ्या आवृत्तींतील अंतर. — पहिल्या आवृत्तीतील काही स्वकृत पद्ये गाळल्याची हळहळ.—नवीन वृत्तनामांबद्दल मतभेद.

**१२१. छंदोरचना** ( परीक्षण ) : ग. रा. हवालदार / विविधज्ञानविस्तार, डिसेंबर १९३८ / १३ पृष्ठे.

विस्तृत परीक्षण. आरंभीची ५–६ पृष्ठे सामान्य विवेचन. सामान्य प्रश्नांची चर्चा. पुढे विविध इंग्रजी ग्रंथांच्या आधारे ' पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना ' या पटवर्धनांच्या सूत्राची मीमांसा.—चिं. वि. वैद्यांनी गद्य व पद्य यांतील हेतुभिन्नत्वाचे केलेले विवेचन यात नसल्याची तक्रार.—इंग्रजीतील ऱ्हिदम आमच्या छंदोरचनेला

लागू करण्याचा पटवर्धनांचा प्रयत्न. इंग्रजी ऱ्हिदमच्या स्वरूपाचे विस्तृत वर्णन.· गौरवपर परीक्षण.

१२२. छंदोरचना-समालोचन : विद्याभूषण बाळाचार्य खुपेरकर / लोकशिक्षण, एप्रिल १९३९ / पृ. ६६८–६८५.

महत्त्वाचा टीकालेख. "छंदोरचने"ला 'छंदःशास्त्रविषयक महान ग्रंथ' म्हणूनही त्याच्यावर प्रखर टीका. सांगोपांग परामर्श.—ग्रंथात वापरलेल्या संज्ञांवर टीका.—उदाहरणे देण्याच्या रीतीवर टीका.—'पद्य म्हणजे लयबद्ध अक्षररचना हे तत्त्व मला स्पष्ट होत गेले....छंदःशास्त्राची काहीतरी व्यापक आणि पायाशुद्ध अशी घटना आता निश्चित केलेली आहे.' या पटवर्धनांच्या म्हणण्यावर टीका.—'पद्य हे काव्याचे केवळ शरीर होय.' या रचनाकारांच्या म्हणण्यावर टीका—पटवर्धनांच्या यमक, यती, अक्षर, गण यांच्या विचाराचा परामर्श.—''वृत्तविचार आणि वृत्तविस्तार' प्रकरणाचा परामर्श. वृत्तनामविचार.

१२३. छंदोरचना–समर्थन समीक्षा : बाळाचार्य खुपेरकर / लोकशिक्षण, सप्टेंबर १९३९ / पृ. १६४–१७५.

"छंदोरचने"वरील खुपेरकरांच्या परीक्षणलेखावर [पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क्र. ३. १२२] पटवर्धनांचा प्रतिलेख, "छंदोरचने"चे समर्थन करणारा [पहा, पटवर्धनांचे वाङ्मय, पृ. ३७, क्र. १०३]. त्या लेखाची समीक्षा.–"छंदोरचने"-तील नवीन शोधासंबंधी पुनर्विचार.

१२४. छंदोरचना (समीक्षण) : के. ना. वाटवे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ६२०–६२९.

परिचयात्मक लेख.–माधवराव 'पंडित-कवी'.–'प्रणयपंढरीचा वारकरी' पंडित झाला.–"छंदोरचने"चा जन्मेतिहास व पदवीलाभ.–छंदःशास्त्राचे स्थूल स्वरूप व पूर्वेतिहास.–"छंदोरचने"ची विषयव्याप्ती.–छंद, जाती, वृत्ते.–"छंदोरचने"चे वैशिष्ट्य. –मूळ कल्पनेचे श्रेय कोणाला?–मूळ कल्पनेच्या श्रेयाबद्दल चर्चा झाली तरी 'या कल्पनेच्या बळावर समग्र शास्त्राचे पर्यालोचन करून, अनेक ग्रंथ धुंडाळून, संस्कृत, प्राकृत, मराठी व इतरही भाषांतील व्यवस्था पडताळून, एक नवीन व्यवस्था निर्माण करणे हे अजस्र कार्य निःसंशय संशोधनात्मक आहे.' आणि त्याचा सर्व मान माधवरावांचा.–'मराठीचे पिंगलाचार्य.'–माधवरावांचे नवीन कर्तृत्व.–संज्ञाकोशाची उणीव.–'शास्त्रीय विषयाचे विवेचन करण्यात माधवरावांची दृष्टी पढीक पंडिताची नसून ती त्या त्या विषयाची नवीन व स्वतंत्र पाहणी करून आपले नियम बनविणाऱ्या संशोधकाची होती.

**१२५. " छंदोरचना " नि " छंद्रा "चे स्थान** ( पत्र ) : ना. ग. जोशी / सह्याद्रि, डिसेंबर १९४०.

**१२६. प्रो.माधवराव पटवर्धन आणि छंदःशास्त्रातील परिभाषा** : वि.ज.सहस्रबुद्धे / साधना, नोव्हेंबर १९४२ / पृ. १६३–१६७.

**१२७. छंदोरचनेविषयी ( १ ) गुजरातीत व ( २ ) मराठीत** : ना. ग. जोशी / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जानेवारी १९४३, व. १६ अ. १.

" छंदोरचना " प्रसिद्ध झाल्यावर ( १ ) गुजरातमध्ये तिचे झालेले स्वागत. गुजरात साहित्य सभेने फार सुंदर परामर्श घेतला.–१९४१-४२ मध्ये या विषयाचा ऊहापोह करणारी तीन व्याख्याने. प्रो. रामनारायण विश्वनाथ पाठक, चुनीलाल वर्धमान शाह, श्री. केशवराम शास्त्री यांची. यांच्या भाषणांचे स्वतःच्या टीपांसह उतारे. ( २ ) महाराष्ट्रातील स्वागत.–वि. ज. सहस्रबुद्धे यांची " पद्य-मीमांसा. "

**१२७. अ ' जातीचे छंद '** : वि. ज. सहस्रबुद्धे / युगवाणी, जून १९४८.

**१२८. ' जातीचे छंद '** ( कै. डॉ. माधवराव पटवर्धनांची बाजू ) : ना. ग. जोशी/ युगवाणी, ऑक्टोबर १९४८ / पृ. ३०६–३१२.

**१२९. छंदःशास्त्रकार पिंगलावरील काही आक्षेप** : य. ग. फफे / सह्याद्रि, मार्च १९४९, व. १५, अं. ३ / पृ. १६९–१७३. [ म. नि. ]

पटवर्धनांच्या ' लोकशिक्षण ', ऑक्टोबर १९३७ च्या अंकातील लेखाच्या संदर्भात.

**१३०. लयबद्धता आणि छंदोरचना** : ना. ग. जोशी / सत्यकथा, मे १९५१.

**१३१. " छंदोरचना " आणि आवर्तन—सिद्धान्त** : वि. ज. सहस्रबुद्धे / सत्यकथा, डिसेंबर १९५२.

**१३२. छंदोरचनेचा आद्य पुरस्कर्ता कोण?** : ( पत्र ) भास्करपंत चंदूरकर (' काव्यशेखर ') / दै. तरुण भारत ( पुणे ), ६ मे १९५९.

पटवर्धनांच्या " छंदोरचने "वर महत्त्वाचा आरोप करणारे पत्र.—१९१३–१४ साली चांद्याचे अंध सत्पुरुष श्री गुलाबराव महाराज यांचा " छंदोरचने "सारखा प्रयत्न झालेला. श्री. गुलाबराव महाराजांच्या ग्रंथातील " नवमयष्टी, उत्तरार्ध "मध्ये १२२ वृत्तांच्या मात्रा ठरवून त्यांचे नामाभिधान केले आहे. नावे नादमधुर. माधव रावांना हे पत्रलेखकाने सांगितले होते. पण ते बोलले नाहीत.

**१३३. छंदोरचना–काही विचार** : गु. ह. देशपांडे / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल १९६२, अं. १४० / पृ. ५–११. [ १९६१ च्या माधव जूलियन स्मृतिदिना-निमित्त योजलेले, पण न झालेले व्याख्यान ].

**१३४. छंदःशास्त्राची चाळीस वर्षे :** कृ. श्री. अर्जुनवाडकर / नवभारत, सप्टेंबर १९६२ / १५ पृष्ठे.

अभ्यासपूर्ण, अभ्यसनीय महत्त्वाचा लेख. पटवर्धनांच्या छंदोरचनेसंबंधानेच प्राधान्याने विवेचन. त्यातील उणिवा, अपुरेपणा यांचे दिग्दर्शन. प्रमेयांची चर्चा. त्यांवर नवीन सूचना, विचार.—ना. ग. जोश्यांच्या " मराठी छंदोरचने "वर बराच प्रतिकूल अभिप्राय, दोषदर्शन.—पटवर्धनांवरील आक्षेपांचाही विचार. ( १ ) समीक्षणीय ग्रंथ. ( २ ) छंदःशास्त्र की पद्यशास्त्र ? ( तात्पुरता आक्षेप पटवर्धनांनी टाळला. ' पद्यशास्त्र ' शब्द अयोग्यच, त्यापेक्षा ' छंदा 'ला वेगळा शब्द सुचवावा.—तसा येथे सुचविलेला : ' अक्षरी '. ) ( ३ ) पटवर्धनाचे छंदोलक्षण. ( ४ ) अन्य छंदोलक्षणे. ( ५ ) लय म्हणजे काय ? ( ६ ) ' अनावर्तनी 'वृत्ते आणि लय. ( ७ ) यती आणि लय.—मग यती आहे तरी कशासाठी ? ( ८ ) अक्षरगण आणि मात्रागण. ( त्रिकपद्धती व पटवर्धनांची पद्धती यातील गुणसमुच्चय साधणारी, सुबोध पद्धती सुचविणे शक्य. ) ( ९ ) काही विवाद्य छंद. ( १० ) ' छंदा 'चे अक्षरमूल्य. ( छंदातील अक्षरमूल्य द्विमात्रिक मानणे विसंगत. अनावश्यक. ) ( ११ ) छंद, चाल, ताल आणि प्लुती. ( १२ ) छंदांच्या निर्धारणाचे प्रयत्न. ( १३ ) मुक्तपद्य, मुक्तच्छंद, आणि मुक्तशैली. ( १४ ) छंदांचे परिगणन आणि नामकरण. ( १५ ) छंदांचा विकास आणि इतिहास. ( १६ ) लयबद्धता आणि भावनाविष्कार. ( गद्यगत सौंदर्याहून पद्यगत सौंदर्य अधिक. ) ( १७ ) उपसंहार. ' छंदाची घटना, रचना आणि परंपरा यांचे पद्धतशीर, रेखीव, प्रमाणाधिष्ठित असे विवेचन पुरेशा प्रमाणात ' अद्याप नाही.

## प द्य प्र का श

**१३५. पद्यप्रकाश :** मो. स. मोने / ( साप्ता. ) ज्ञानप्रकाश, रविवार, २५ जून, व रविवार २ जुलै १९३९. दोन लेखांक.

लेखक माधवरावांचे स्नेही, जिज्ञासू. " पद्यप्रकाश "च्या वाचनानंतर मनात आलेले विचार, शंका यांचे निवेदन. ( १ ) माधवरावांचा गौरव. त्यांचा अधिकार. ( २ ) जाति–वृत्तांची त्यांनी स्वतःच दिलेली नावे बदलली. वाचकांचा घोटाळा होण्याचा संभव. ( ३ ) माधवरावांची छंदःशास्त्रीय विशेष कामगिरी. धन्यवाद. ( ४ ) 'छंदा'-बद्दल शंका. सर्वच अक्षरे गुरूच म्हटली जातात असे निश्चयाने म्हणवत नाही. ' विद्युन्माला ' वृत्त का ? ' देवीवर ' छंद का ? ( ५ ) लयबद्धतेवर विशेष भर. ( ६ ) चाल म्हणजे पद्यप्रकार नव्हे, हे बरोबर. ( ७ ) सामान्य लोकांना सूचना. ( ८ ) लेखनपद्धतीसंबंधी शंका.—' ऋ 'संबंधी माधवरावांचे मत बरोबर वाटते.—शेवटी पुन्हा गौरव.

**भाषाशुद्धी**

[ भाषाशुद्धीसंबंधाने तत्कालीन वृत्तपत्रे, नियतकालिके इत्यादींतून अनेक लेख आले, उत्तर-प्रत्युत्तरे झाली. त्या सर्वांची नोंद येथे करणे आवश्यक वाटत नाही. ]

**१३६. खरी भाषाशुद्धी आणि तिचे खरे वैरी** अर्थात सावरकर आणि पटवर्धन : श्री. के. क्षीरसागर / सह्याद्रि, लेखांक १ : फेब्रुवारी १९३६ / लेखांक २ : मार्च १९३६. [ समाविष्ट : " व्यक्ति आणि वाङ्मय ", लेखसंग्रह / श्री. के. क्षीरसागर / १९३७ / पृ. १०१–१३१. ]

भाषाशुद्धिवादातील महत्त्वाचा लेख. भाषाशुद्धीच्या चळवळीचे मूळ कोणते, सावरकर-पटवर्धन या दोन वीरांच्या विचारांतून कोणते सिद्धान्त आणि उपसिद्धान्त उगम पावतात आणि या झुंजारांच्या अनुयायी सैन्याकडून व बाजारबुणग्यांकडून कशा प्रकारची जाळपोळ होत आहे याचा विचार.

**१३७. माझ्या भूमिकेचा पुनरुच्चार** : श्री. के. क्षीरसागर / सह्याद्रि, सप्टेंबर १९३६ / पृ. ८१८–८२०. [ समाविष्ट : " व्यक्ति आणि वाङ्मय ", पृ. १४३–१४९] पटवर्धन–सावरकरांच्या उत्तरांचा त्रोटक परामर्श.

**१३८. भाषाशुद्धिवाल्यांना विनंती** : श्री.पटवर्धन यांचा " फार्शी-मराठी-कोश " : श्री. दत्तात्रय दी. काळे / ज्ञानप्रकाश, शुक्रवार २९ ऑक्टोबर १९३७.

" फार्शी-मराठी-कोशा " साठी महत्त्वाचा.

**१३९. भाषाशुद्धीकरणातील तारतम्य** : न. चिं. केळकर / सह्याद्रि, जानेवारी १९३८. [ समाविष्ट : " केळकरांची निबंधमाला ", पृ. ७१–८७ ].

पटवर्धनांच्या महाराष्ट्र साहित्य संमेलनातील अध्यक्षीय भाषणाला [ पहा, पटवर्धनांचे वाङ्मय, क्र. व. ८. ११८ ] अनुलक्षून हा लेख. ( १ ) प्रास्ताविक. व्यक्तिगत. भाषाशुद्धीचे कैवारी व त्यांचे विरोधक यांच्या भूमिकांचे सूत्रनिवेदन. दोघांचे चुकते कोठे ? ( २ ) भाषादूषकांचे आठ प्रकार. ( ३ ) स्वतःचे या दोन पक्षांतील धोरण. हास्यास्पदतेपेक्षा असहायतेचा लाजीरवाणेपणा मी उचित मानीन. ( ४ ) भाषाशुद्धीसंबंधात वापरावयाचे तारतम्य. त्यातील अडचणी. तपशील, काही शंका यांबाबत पटवर्धनांना मार्गदर्शनाचे आवाहन. ( ५ ) या अनुषंगाने एक अन्य पृच्छा. देशाभिमान व हिंदुधर्म यासंबंधीच्या भूमिकेचे स्पष्टीकरण करण्यास आवाहन.

**१४०. तारतम्यातील तारतम्य** : न. चिं. केळकर / सह्याद्रि, एप्रिल १९३८. [ समाविष्ट : " केळकरांची निबंधमाला ", पृ. ८७–८९ ].

केळकरांच्या 'भाषाशुद्धीकरणातील 'तारतम्य' या लेखाला पटवर्धनांचे 'सह्याद्री'च्या

एप्रिल १९३८ च्या अंकात उत्तर [ पहा, पटवर्धन वाङ्मय, क्र. व. ८. १२३ ] आणि त्याच अंकात केळकरांनी त्या लेखातील बोध घेण्यास आपण तयार असल्याचे सांगून तो लेख मान्य केला, व थोडे भाष्य केले.

**१४१ : सिंहाचे कातडे पांघरलेले गाढव अर्थात् शब्दशुद्धी की भाषाशुद्धी?** ना. वि. चौकर / सह्याद्रि, ऑगस्ट १९३८.

**१४२ : शब्दशुद्धी की भाषाशुद्धी ?** : ना. वि. चौकर / सह्याद्रि, डिसेंबर १९३८

**१४३. भाषाशुद्धिविवेक अर्थात्** माधवरावांची भाषाशुद्धी : [ समीक्षण ]
द. वा. पोतदार / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० / पृ. ६३५–६४२.
[ समाविष्ट: " सुमन-सप्तक ", लेखसंग्रह / द. वा. पोतदार / १९५० / पृ. ३८–४९ ]
प्रचारकाची भूमिका माधवरावांची मूळची नव्हे. ते हाडाचे कवीच.— माधवरावांच्या भाषाशुद्धीविषयक विचारांचा परिचय.—सावरकर व माधवराव यांच्या भाषाशुद्धीची तुलना.

**१४४. भाषाशुद्धि-विवेक आणि माधवराव** [ चर्चात्मक ] : प्रा. न. रा. पारसनीस ज्योत्स्ना, मे १९४० / ५–५॥ पृष्ठे.

" भाषाशुद्धिविवेक " वर सामान्य परिचयात्मक लेख. माधवरावांची भूमिका त्यांच्या उताऱ्यांच्या आधारे स्पष्ट केली आहे. ( १ ) माधवरावांचा गौरव. कवी, पंडित, संशोधक, प्रचारक. ( २ ) त्यांच्या चळवळीची बैठक. ( ३ ) सावरकर-पटवर्धन यांच्या भूमिकांतील अंतर. ( ४ ) त्यांचे विरोधक.

## तुटलेले दुवे

**१४५. तुटलेले दुवे** [ परिचयपर ] : नी. म. केळकर / ' यशवंत ', जून १९३८ पृ. ८०.

सर्वसामान्य, प्रशंसापर लेख.

**१४५ अ. तुटलेले दुवे** [ –पुस्तक परिचय ] : वि. स. खांडेकर / ज्योत्स्ना, जुलै १९३८, व.३. अं. ३ / पृ. १८५–१८६. [म. नि.]

**१४६. तुटलेले दुवे** [ ग्रंथपरीक्षण ] : के. नारायण काळे / सह्याद्रि, मार्च १९३९/ पृ. २२०–२२७.

सुनीत या माध्यमाची बरीच चर्चा. कथाकथनासाठी ' सुनीत ' कितपत योग्य ? सुनीत हा स्वयंपूर्ण काव्यप्रकार. तो कथाकथनाचा दुवा कसा होईल ?–स्पेन्सर, सरे, वायट, शेक्सपियर यांच्या सुनीतपरंपरांत आणि माधव जूलियनांच्या सुनीतपरंपरांत अंतर आहे.–" तुटलेले दुवे "तील प्रत्येक सुनीत स्वतंत्र मानून त्याचा आस्वाद

घ्यावा. –वृत्तविषयक प्रयोग; अंतरंग; यमकरचना यांचा विचार.–विषय, भावना, विचार या अनुरोधाने सुनीताचे वर्गीकरण.–" तुटलेले दुवे "तील अनेक सुनीतांचे वर्गीकरण करून तंत्र व अंतरंग या दोनही दृष्टींनी त्यांचा विस्तृत परामर्श.

१४७. तुटलेले दुवे [ परीक्षण ] : ना.ग.जोशी / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल १९३९, व. १२ अं. ४ / पृ. ९८–१०२.

( " तुटलेले दुवे ", " नकुलालंकार ", " मधुलहरी " या तीनही पुस्तकांवरील डॉ. ना. ग. जोशी यांची परीक्षणे ' माधव जूलियन : महाराष्ट्राचे प्रातिनिधिक कवि ' या पूर्वनिर्दिष्ट व " साहित्यविवेचन ", ना. ग. जोशी, १९६८, लेखसंग्रहामध्ये समाविष्ट असलेल्या लेखात [ पहा, क. २. ९० ] अंतर्भूत. )

या लेखात चिकित्सकता असली तरी विशेषत्वाने आदरयुक्त गौरवपर. ' सुनीतांचा एक उत्तम संग्रह. ' ( १ ) काव्यवाचनाच्या प्रसन्न परिणामाचे आलंकारिक वर्णन. ( २ ) परिचय, अंतरंगदर्शन.–काही सुनीतांवर कल्पना. ( अ ) प्रणयपर सुनीते. ( ब ) इतर सुनीते. ( ३ ) सुनीत म्हणून बाह्यविचार. भाषासरणीचा विशेष. फार्सी-प्राचुर्य नाही, संस्कृतप्राचुर्य नाही; पण विरूपतेचे नि आत्यंतिक गद्यप्रायतेचे जंतू त्यांत दिसतात. ( ५ ) ह्यांतील किती सुनीते उत्कट या प्रश्नाचा विचार व मीमांसा.

१४८. तुटलेले दुवे [ चर्चा ] : महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जून १९३९.

दि. १२ मे १९३९ ला ( संध्याकाळी ६ वाजता. ८॥ला सभा संपली. ) महाराष्ट्र साहित्य परिषदेत झालेल्या चर्चेचा वृत्तांत. अध्यक्ष : डॉ. रा. ग. हर्षे.

प्रस्तावक के. नारायण काळे : यातील प्रणयगीतात प्रत्यक्षानुभूतीचा जिवंतपणा. त्यात सांकेतिकता, कृत्रिमता नाही.–गं.ब.ग्रामोपाध्ये : सुनीताच्या बांधणीवर शास्त्रीय चर्चा.–गोपीनाथ तळवलकर : " विरहतरंग ", " तुटलेले दुवे " यांच्यातील साम्य-भेद. परिष्करणावर टीका. त्यामुळे सौंदर्यहानी.–ना. म. भिडे, यशवंत : सुनीतरचने-संबंधी विचार.–नी. शं. नवरे : दुर्बोध व अप्रसन्न स्थळांचा उल्लेख.–ग. स. मराठे : परके शब्द पटवर्धनांना नकोत, तर परका काव्यप्रकार का ?—डॉ. हर्षे : " तुटलेले दुवे "तील सौंदर्यवर्णन. दुर्बोध, गद्यप्राय, गुंतागुंतीच्या रचनेविषयी मार्मिक टीकात्मक विवेचन.–डॉ. माधवराव पटवर्धनांचे उत्तर : १४ ओळींच्या साच्यात अर्थ ठासून भरावा लागत असल्याने दुर्बोधता. शार्दूलविक्रीडित वृत्त सुनीताला योग्य. भाषेची शब्दसंपत्ती व सर्गशक्ती वाढवणे हा अपरिचित पण सार्थ शब्दयोजनेत हेतू. परिष्करणासंबंधी टीकेला उत्तर.

१४९. तुटलेले दुवे [ समीक्षण ] : के. नारायण काळे / लोकशिक्षण, फेब्रुवारी-मार्च १९४० / पृ. ६०८–६१३.

"तुटलेले दुवे"च्या अंतरंगाचे तात्त्विक विश्लेषण व मूल्यमापन.—माधव जूलियनांच्या सर्व प्रकाशित काव्यसंग्रहांत "तुटलेले दुवे" गुणाने श्रेष्ठ, पण लोकप्रियतेच्या दृष्टीने कनिष्ठ.—'ज्यांच्यासाठी ते (माधव जूलियन) लिहितात, त्यांच्या अनुभवापेक्षा, त्यांच्या आकांक्षा–अपेक्षांपेक्षा, त्यांच्या भावविचारापेक्षा सर्वस्वी भिन्न स्वरूपाचे असे त्यांच्या काव्याचे अंतरंग नाही....हे सामान्यत्व 'माधव जूलियन्' व त्यांची कविता यांचे एक असामान्य वैशिष्ट्य आहे.'—''माधव जूलियन्' यांच्या अनेक सुनीतांतून [दिसणारी] सभोवारच्या सामाजिक परिस्थितीच्या अनुभवामुळे उद्रेक पावलेली आंतरिक आंदोलने आणि तत्संबंधी विचक्षणा व विचार जर समीक्षिली तर त्यातून द्रष्ट्याची किंवा मार्गदर्शक तत्त्वज्ञाची विशिष्ट दृष्टी प्रतीत न होता, केवळ प्रकृतीने पुरोगामी असलेल्या विचारशील सज्जनाचे प्रवृत्तिप्रवाह मात्र दृष्टोत्पत्तीस येतील.'—'प्रेम हा मराठी कवितेतील एक संकेत होता, त्याला त्यांनी वास्तव सृष्टीत आणिले.'

## न कु ला लं का र

१५०. **नकुलालंकार** (परीक्षण) : ना. ग. जोशी / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जून १९३९, व. १२ अं. ६ / पृ. १४६–१४९.

बव्हंशी परिचयपर सामान्य परीक्षण. (१) प्रास्ताविक. नकुल झब्बु–वर्गाचा प्रतिनिधी. (२) "सुधारक" — "नकुलालंकार"मधील फरक. (३) आर्यायोजनेचे औचित्य. थोडी अलंकारचर्चा.—काही आर्यांची चर्चा.

१५१. **नकुलालङ्कार** [पुस्तक–परीक्षण] : गोपीनाथ तळवलकर/'वाङ्मयशोभा', जुलै १९३९, व. १ अं. ३ / पृ. ९९. [म. नि.]

१५२. **नकुलालंकार** : य. न. केळकर / केसरी, १८ ऑगस्ट १९३९. [समाविष्ट : "वाङ्मयाचा वाफा", लेखसंग्रह / य. न. केळकर / ५ पृष्ठे.]

(१) अपेक्षा फोल ठरल्या. (२) गडकऱ्यांच्या संकल्पित 'शंखांचा बाजार'-प्रमाणे. स्वतःच्या प्रतिस्पर्ध्यांचा व निंदकांचा भरपूर सूड घेण्याचा प्रयत्न. (३) आर्यांचे चांगले विडंबन. पांडित्य शिल्लक राहिले. कवित्व मागेच संपले. त्याबद्दल हळहळ. (४) काही५–६ व्यक्तींचा उपहास अभिप्रेत. पण त्यांचीही यथातथ्य, प्रामाणिक, संपूर्ण चित्रे नाहीत. त्यांत भेसळ. ज्यांना हे संदर्भ माहीत आहेत त्यांनाच थोडेबहुत वाचनीय वाटेल. पात्रांची मूळ स्थाने जाणता ओळखू शकेल. (५) उपमा शब्दयोजना यांबाबत.

१५३. **नकुलालङ्कार** [पुस्तक-परीक्षण] : र. धों. कर्वे / 'समाजस्वास्थ्य', डिसेंबर १९३९, व.१३ अं. ६ / पृ. १७४–१७७. [म. नि.]

१५४. नकुलालंकार [ समीक्षण ] : वि. अ. कुलकर्णी / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ६१४–६१९.

माधवरावांच्या ठिकाणी नैसर्गिक प्रतिभा आणि अविश्रांत परिश्रमाने प्राप्त झालेले पांडित्य यांचे सुंदर संमिश्रण.–" नकुलालंकारा "चे रसिकावलोकन.–ते उपहासपर दीर्घकाव्य.–यातील व्यक्ती कोण असाव्यात हे विचक्षण वाचकाला सहज ओळखता येते हे याचे ठळक वैगुण्य.–यातील विनोद विद्वेषाच्या पायावर अधिष्ठित आहे असा भास होत असल्याने तो विशुद्ध वाटत नाही. शिवाय पक्षपातित्वाचाही दोष.–भरपूर स्वभाववैचित्र्य साधले आहे.–रचना बहारदार.–उत्कृष्ट वर्णनचातुर्य.

१५५. नकुलालंकार आणि आर्या छंद : य. ग. फफे / सह्याद्रि, एप्रिल १९४०.

१५६. नकुलालंकार [परिचय–परामर्श] : श्री.म.माटे / सह्याद्रि, डिसेंबर १९४०.

थोडक्यात लेख. ( १ ) पंतांच्या आर्यांची यथातथ्य अनुकृती. ( २ ) कवित्वाची साक्ष. (३) काही चेहऱ्यांची ओळख पटते. पण त्यावर लगेच निराळ्या रेषा काढल्या.

## मधुलहरी व इतर कविता

१५७. मधुलहरी [परीक्षण] : ना.ग.जोशी / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर १९४०, व. १२ अं. ६/ पृ. २८८–२८९.

( १ ) प्रकाशनापूर्वीच्या अपेक्षा–पण नंतर भंग. ( २ ) माधव जूलियनांच्या मृत्यूसंबंधाने थोडा भाग.— ते अंतर्मुख होत चालले होते. बाह्य बुद्धिविलासाबरोबर आत्माही विशाल होत होता.—माधव जूलियन भावकवी म्हणून प्रारंभी उत्कट. त्याला पुढे उतार. आणि पंडित कवी म्हणून अधिक ख्याती. पण रसिक महाराष्ट्राला भावकवी म्हणूनच ते श्रेष्ठ वाटतात.

१५८. मधुलहरी व इतर कविता [ परीक्षण ] : मा. गो. काटकर / ज्योत्स्ना, फेब्रुवारी १९४१ / पृ. ४७–४८.

## काव्यविहार

१५९. काव्यविहार [ परीक्षण ] : वि. स. खांडेकर / साहित्य, मे १९४९ / पृ. ६३–६५.

गौरवपर परीक्षण.

## काव्य चिकित्सा

१६० काव्यचिकित्सा [ परीक्षण ] : रा. श्री. जोग / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जुलै-सप्टेंबर १९६५, व. ३९ अं. १५४ / पृ. ६७.

सर्व कवितांच्या परीक्षणात पटवर्धनांनी सौंदर्यनिष्ठा राखली आहे, काव्यसमीक्षणाची चोखंदळ दृष्टी प्रकट केली आहे. त्यात भीड वा असूया नाही.—रस-व्यवस्थे-विषयीच्या लेखात मतभेदास अधिक वाव.

४. पत्रे[1]

१. साहित्य-सिंह [ श्रीपाद कृष्ण कोल्हटकर : जीवनगाथा ] : गं. दे. खानोलकर / १९७२.

यात कोल्हटकरांची पटवर्धनांना चार पत्रे. ( १ ) पृ. ४९७–४९८ : १३ डिसेंबर १९२५, जळगाव, वऱ्हाड : पटवर्धनांच्या "काहीतरी" वरील परीक्षणात्मक लेखावर [ पहा, पटवर्धनांचे वाङ्मय, क्र. व. २·५८ ] अभिप्राय. 'तो परीक्षणात्मक लेख इतका मार्मिक आहे की, तो तुमचा पहिलाच आहे हे खरे वाटत नाही.—आपली टीका एकंदरीत फारच आवडली.—मी स्वतः कवितेतील दर्दी मुळीच नाही.' ( २ ) पृ. २५६ : ( स्वतःला कवितेत फारसा रस नाही. ) माधव जूलियनांनी "विरहतरंग" छापावयाला टाकण्यापूर्वी त्यावरील कोल्हटकरांचा अभिप्राय समजून घ्यावयला ते काव्य त्यांच्याकडे पाठविले. त्यातल्या स्त्री-पुरुष मैत्रीविषयी आपले विचार मोकळेपणी त्यांनी कळविले. परंतु काव्य या दृष्टीने आपले मत व्यक्त करावयाचे त्यांनी विनयपूर्वक नाकारले. ( ३ ) पृ. ५७९ : ८ मार्च १९२८, जळगाव-जामोद : "सुधारक" बाबत पत्र. ( ४ ) पृ. ६०८ : ७ जुलै १९३० : वाचावयाला ठेवलेल्या मुलाच्या वाचनातून निर्माण होणारे विनोद.

२. कविवर्य भास्करराव तांबे यांचे पत्र : ज्ञानप्रकाश, दिवाळी अंक, १९४९.

३१ ऑगस्ट १९२७चे पत्र. लष्कर ( ग्वालियर ) : २८ ऑगस्ट १९२७ च्या माधवरावजींच्या कार्डाला उत्तर. रविकिरण मंडळाचे "प्रभा" त्यांना अर्पण केल्यासंबंधी कृतज्ञ उद्‌गार.–पुण्याच्या जनतेचा गौरव.–पुणेकरांनी मनावर घेतल्याने माझी कृती बाहेर पडली.–माधवराव, रविकिरण मंडळ सदस्य यांविषयी प्रेम.

३. कविवर्य भास्करराव तांबे यांनी कै. डॉ. माधवराव पटवर्धनांना पाठवलेली पत्रे ( निवडक उतारे ) : सह्याद्रि, फेब्रुवारी १९४२, व. ८ अं. २ / पृ. ११४–११५.

'काही साहित्यिकांची पत्रे' या शीर्षकाखाली. [ सर्व पत्रे "स्वप्नभूमी"त समाविष्ट. ]

१. पटवर्धनांचा पत्रव्यवहार मोठा होता. त्यांनी लिहिलेली जशी अनेक पत्रे आहेत, त्याप्रमाणे त्यांनाही आलेली पत्रे पुष्कळ असतील. त्यांपैकी जी पत्रे प्रकाशित झाली, तयतल्या काहींची येथे नोंद केली आहे.

( १ ) १२ डिसेंबर १९३१ : उमरखय्याम आणि 'सामान्य जनता :—उमरखय्यामचे लिखाण गूढार्थी असल्याची खात्री. त्याचे विचारस्वातंत्र्य आश्चर्यकारक. चिंतनपर काव्य. कालिदास–शेक्सपियरशी बरोबरी करता येणार नाही.

( २ ) १३ एप्रिल १९३५ : काव्य आणि संगीत : संगीताचा आणि काव्याचा अतीव निकट संबंध. संगीतामुळे काव्यातील भावना उठावदार होतात.

( ३ ) ५ डिसेंबर १९३५ : 'माझे भलते स्तोम माजवू नका.'

( ४ ) १९ डिसेंबर १९३८ : कल्पनीयवाद ( Idealism ). "छंदोरचने"ला पदवी मिळाल्याबद्दल अभिनंदन. पदवीच्या प्रलोभनाने लेखन केले नाही.

**४. कविवर्य तांब्यांचे माधवरावांना पत्र :** "राजकवी तांबे यांचा साहित्यविषयक पत्रसंग्रह", संपादक ना.बा.परांडकर / १९४९, मधून. [समाविष्ट : "स्वप्नभूमी"]

२४ नोव्हेंबर १९३७, ग्वाल्हेर : श्रीमंतांनी तांब्यांच्या केलेल्या गौरवाप्रीत्यर्थ माधवरावांनी पाठविलेल्या पत्रास छोटे, पण प्रेमळ उत्तर. —सरस्वतीच्या कृपेने तुमच्यासारखे अव्याज मित्र लाभले. 'तुमच्याशी बोलू लागलो म्हणजे मला सुमार राहात नाही.'

**५. कविवर्य तांब्यांचे माधवरावांना पत्र :** "राजकवी तांबे यांचा साहित्यविषयक पत्रसंग्रह" मधून. [ समाविष्ट : "स्वप्नभूमी" ]

( १ ) माधवरावांना डी लिट्. मिळाल्यानंतर अभिनंदनपर पत्र. माधवरावांच्या गुणांना भुलून, मत्सरग्रस्तांना न जुमानता पदवी त्यांच्याकडे चालत आली–अभिसारिकेसारखी. ( २ ) नभोवाणीवरील माधवरावांच्या तांब्यांवरील सुंदर भाषणाबद्दल अभिनंदन. [ पहा, पटवर्धनांचे वाङ्मय, क्र. ४.ब. ३५ ] —या संदर्भात एक टीकाविषयक प्रश्न.— माझ्या प्रेमकवितांत 'आन्तरः कोऽपि हेतू'ची असामान्य मादक पण उद्‌बोधक अशी रमणीय, चिरस्मरणीय छटा आढळत नाही हे तुमचे म्हणणे खरे आहे. [ संदर्भ : "काव्यविहार", पृ. २३, पृ. ४७ ]

**६. डॉ. माधवरावांना कविवर्य भास्करराव तांबे यांची पत्रे :** "स्वप्नभूमी", परिशिष्ट १० / पृ. ३३२–३६५.

४ ऑक्टोबर १९२८ पासून ३१ मे १९३९ पर्यंतची, तांब्यांनी पटवर्धनांना पाठवलेली २६ पत्रे. बहुतेक सर्वच पत्रांत माधवरावांविषयी अतीव जिव्हाळा, कौतुक, आदर, त्यांच्या वाङ्मयाचे मुक्त कौतुक.—यांतील काही पत्रे तांबे यांच्या काव्यसंग्रहाच्या संपादन—प्रकाशनासंबंधीची. तांब्यांच्या कवितेच्या अभ्यासालाही उपयोगी.—यांतील काही पत्रे यापूर्वी इतरत्र प्रकाशित.

[ तांबे-माधवराव पत्रव्यवहाराचा अतिशय समुचित समारोप म्हणजे 'लोकशिक्षणा'च्या संपादकांनी पटवर्धन-अंकासाठी तांब्यांकडे लेख मागितला असता

तांब्यांनी लिहिलेले उत्तर—' पटवर्धनांची विस्मृती कशी होईल हीच काळजी लागली आहे !...काळजाच्या आतील घाव कसा दाखवावा ? ' तांब्यांना माधवरावांविषयी किती जिव्हाळा वाटत होता, त्यांच्या निधनाने तांब्यांना किती दुःख झाले ते सांगणारे ना. वा. पराडकरांचे ३० डिसेंबर १९३९ चे पत्र 'वाङ्मयशोभे'च्या जानेवारी १९४० च्या अंकात प्रसिद्ध झाले आहे : "I am trying to forget—अहो, एक अक्षर लिहिण्याचा प्रयत्न केला तर I shall break down." चार वर्षांपूर्वी मुलाच्या निधनाने तांब्यांना असे दुःख झाले होते.

१९४०च्या नोव्हेंबरात माधवरावांच्या प्रथम-स्मृतिदिनी ग्वाल्हेरच्या व्हिक्टोरिया कॉलेजचे विद्यार्थी तांब्यांकडे अध्यक्ष होण्यास विनंती करावयाला गेले असता, कधी नाही तितके ते रागावले. "मला ते मुलाप्रमाणे होते." (नवशक्ति. रविवार, २८ फेब्रुवारी १९६०.)]

७. वा. ना. देशपांडे यांचे पत्र : "विश्रब्ध शारदा", खं. १ / संपा. ह. वि. मोटे व इतर / १९७२ / पृ. ३९०–३९३.

७ फेब्रुवारी १९२७, यवतमाळ : "विरहतरंगा"संबंधी पत्र. माधवरावांविषयी आदरभाव. एकूण काव्याचा गौरव. "विरहतरंगा"चे विशेष : (१) अत्यंत घोटीव, सफाईदार व अर्थगळी भाषा. त्यातील संदर्भप्राचुर्य, बहुश्रुतता लेखकाच्या उच्च अभिरुचीची साक्ष पटवितात. 'ह्या काव्योद्यानात विद्वत्त्व व कवित्व ह्यांच्या अधिदेवता हातात हात घालून सहल करताना दृष्टीस पडतात !'—टिळक, विनायक, लेंभे, चंद्रशेखर, गिरीश यांच्या स्वतंत्र खंडकाव्यांत कलाविलासाच्या दृष्टीने "विरहतरंग" पहिले. (२) फार पुढे गेलेल्या सुधारणावादी मतांमुळे ते व्हावे तसे लोकप्रिय होणार नाही अशी भीती. पुनर्विवाह, मिश्रविवाह एकत्र. कवटे-सागुती उल्लेख. 'ह्या काव्यावरून माझ्यासारख्याने भावी काळात आपणाकडून महाकाव्याची अपेक्षा केल्यास, ती मुळीसुद्धा अनाठायी ठरणार नाही.'

८. वा. ना. देशपांडे यांचे पत्र : [रा.वि. मराठे संग्रह] १४ सप्टेंबर १९३६ : माधवरावांच्या पत्राचे उत्तर. छंदोविषयक. त्यांच्या काही रचनांसंबंधी.

## ५. पटवर्धनविषयक ग्रंथांतर्गत उल्लेख[1]

१. राक्षस-विवाह (कादंबरी) : श्री. के. क्षीरसागर / १९४०.

यात पटवर्धनांसंबंधी २–३ उल्लेख. (१) या पुस्तकाची भूमिका स्पष्ट असूनही कित्येकांच्या ध्यानात येत नाही. त्यांपैकी माधवराव पटवर्धन. त्यांना ती भावकथा फार आवडली होती, त्यातील मध्यवर्ती प्रश्न माझ्याहीपेक्षा त्यांना अवगत. पण ते

१. त्या त्या पुस्तकांच्या प्रकाशनकालाच्या अनुक्रमाने येथे नोंदी केल्या आहेत.

तिचे वर्णन ' जरठ-कुमारी विवाह ' असा करीत. [ ' पूर्वेतिहास आणि स्वरूप ', पृ. १० ] ( २ ) एक अभिनंदनीय प्रीतिविवाह होत असताही वधूच्या जवळच्या एका 'पुरुषव्याघ्र' नातेवाईकाची चर्या असहाय झाली होती. हा 'पुरुषव्याघ्र' कै.माधवराव पटवर्धन. [ ' पूर्वेतिहास आणि स्वरूप ', पृ. २३; कादंबरी, पृ. ४. ]

२. **रसवंतीची जन्मकथा** : श्री. म. माटे / १९४३.

यात प्रा. माट्यांनी स्वतःच्या मताला पोषक म्हणून पटवर्धनांच्या तोंडचे काही उद्गार दिले आहेत. – जेथे रस नसेल तेथे संगीत सरसपणा आणते; सरसता असेल तेथे संगीत तिपटीची भर घालते हे माट्यांचे प्रतिपादन. भारत-इतिहास-संशोधक मंडळातून एक सभा आटपून येत असता, काव्याच्या संदर्भात पटवर्धन म्हणाले, " काव्याला शुद्ध गद्याचे रूप दिले तरच त्यात नैसर्गिक सौंदर्य किती आहे ते ठरविता येईल. " ( पृ. १२४ )

३. **फुलवात** [ कवितासंग्रह ] : अनिल / १५ जुलै १९३२ / प्रस्तावना.

आधुनिक काव्य आणि गूढवाद (Mysticism)–' प्रतीतिधर्म ' –यावरील विवेचनात पटवर्धनांच्या ' केशवसुत ' निबंधातील विवेचनाचे खंडन. ( १ ) प्रतीतिधर्म भारतीयच. ( २ ) ' तो मज गमले० ' वरील टीकेचे खंडन.

४. **गेल्या साठ वर्षांतील मराठी कविता** [ काही अंतःप्रवाहांचे समालोचन ] : ग. त्र्यं. माडखोलकर / १ जानेवारी १९३५ / " अर्वाचीन मराठी साहित्य " / संपादक मानेपाटील व इतर / १९३५.

समग्र आधुनिक कवितेवर प्रखर टीका करणारा विवाद्य, तितकाच महत्त्वाचा समालोचनात्मक लेख. आधुनिक कवी बहुजनसमाजापासून दूर आहेत; भोवती घडणाऱ्या ज्वलंत राष्ट्रीय चळवळीपासून अलिप्त आहेत; प्रणयविकारातच ते गुरफटून गेलेले आहेत; आधुनिक कवितेतील वातावरण स्त्रैण आहे हा मुख्य आक्षेप. सावरकर, विनायक यांचा गौरवास्पद अपवाद. बाकी केशवसुत, गोविंदाग्रज, माधव जूलियन प्रभृती सर्वांवर टीका —माधव जूलियनांना फार्सी वृत्त, शब्दयोजना याने आरंभी लोकप्रियता. प्रणय आणि पांडित्य. पण प्रणयविकार निरामय नाही, विकृत. स्त्रैण वातावरण. " सुधारक ", " विरहतरंग " यांचे नायक पौरुषहीन. निरीक्षण बारीक. स्वानुभूत जिव्हाळा.

५. **History of Modern Marathi Literature** [ 1800–1938 ] : Prin. G. C. Bhate / 17 February 1939 / Page 519.

माधवरावांच्या साहित्याविषयी तपशील फारसा नाही. पण त्यांच्या वैयक्तिक जीवनासंबंधाने काही स्पष्ट विधाने. म्हणून महत्त्व. भाटे १८९४ ते १९१९ पर्यंत

फर्गसन महाविद्यालयात प्राध्यापक, पुढे १० वर्षे विलिंग्डन महाविद्यालयात प्राचार्य. म्हणूनही महत्त्व. ( १ ) माधवरावांच्या आईवडिलांचे स्वभाव विक्षिप्त. परस्परविरोधी स्वभावामुळे त्यांचे पटत नसे. ( २ ) डेक्कन एज्युकेशन सोसायटीत ते राहिले असते तर संस्थेला भूषण ठरले असते. पण संस्थेत प्रवेश केल्यानंतर थोड्याच दिवसांत लाईफ मेंबरांच्या सभेत कंपू असल्याचे त्यांच्या लक्षात आले. 'There was a clique in the life member's body which wanted to keep all power in its own hahds.' पण पटवर्धनांच्या स्वाभिमानी, स्वतंत्र स्वभावाला ते न मानवून त्या गटाची दुष्कृत्ये उघड करण्यास त्यांनी आरंभ केला. म्हणून त्यांच्यावर एका विद्यार्थिनीशी गैरवर्तणूक ( indiscreet conduct ) केल्याचा आरोप आणून राजीनामा द्यावयाला लावला.

६. रामशास्त्री : [ 'रामशास्त्री 'कृत "प्रतिभे"च्या न्यायमंदिरातील निवडक स्फुटे, १९३९. ]

'प्रतिभे'च्या न्यायमंदिरातील निवडक स्फुटांत पटवर्धनांचा निर्देश अनेकदा. ( १ ) 'झेंडूची फुले मात्सर्याने फुलली'वरील भाष्य. ( २ ) 'प्रेम आणि मरण' आणि 'संगमोत्सुक डोह.' कवितेला तर्कशुद्धतेची कसोटी लावून चालणार नाही. डोह नदीचा पुत्र. ( ३ ) "यशोगंध" [ यशवंतांचा काव्यसंग्रह ] पेक्षा "स्वप्न-रंजन" निःसंशय सरस, पण त्याच्या निम्म्यानेही "स्वप्नरंजन"ची स्तुती होत नाही. काव्यगायनपराङ्मुखता हे कारण. ( ४ ) माडखोलकर–माधव जूलियन. ('प्रतिभे'-तील कवी यशवंतांवरील माडखोलकरांच्या लेखाच्या अनुरोधाने.) ( ५ ) पटवर्धनांची महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याच्या निमित्ताने अभिनंदन. टीकांना उत्तर.

७. दोन तपे : ग. त्र्यं. माडखोलकर / १९४५.

या पुस्तकात माधवरावांसंबंधी काही आठवणी. ( १ ) माधवरावांच्या कवितांचे प्रकाशन प्रथम माझ्यामुळे 'नवयुग'मध्ये. ( २ ) 'तप-शील' कोटी त्या काळी गाजलेली. ( ३ ) 'ज्ञानप्रकाश'च्या 'काव्यशास्त्रविनोद' पुरवणीचे स्वरूप—रवि-किरण मंडळाच्या विशिष्ट कल्पनांचे प्रतिपादन हा ठळक विशेष. ही पुरवणी रविकिरण मंडळाची मुखपत्रिका असे स्वरूप आले. आधुनिक कवितेला अंतर्बाह्य नवीन वळण देण्याचा मंडळाचा प्रयत्न. ( ४ ) रविकिरण मंडळाची स्थापना, ध्येयधोरण. ( वि. ह. कुलकर्ण्यांना माडखोलकरांनी यासंबंधी पाठविलेले पत्र.) ( ५ ) 'मैत्री' सुनीताची जन्मकथा. 'अशा कितीतरी कवितांची हृदयस्पर्शी कहाणी मी सांगू शकेन.'

८. अर्वाचीन मराठी काव्य : रा. श्री. जोग / आ. १, जुलै १९४६ / आ. २–

जून १९५१ / आ. १-पृ. १७६-१९५.

यातील सहावे प्रकरण 'रविकिरणमंडळ' ( १९२०-१९४० ), यामध्ये आणि एकूण सर्व पुस्तकात जास्त विस्तार माधव जूलियनांचा.

**९. टीका आणि टीकाकार** : वा. भा. पाठक / आ. १, २ जानेवारी १९४८ / आ. २, १५ मे १९७२.

प्र. १३ मध्ये ( १ ) काव्य. त्यात माधव जूलियनांच्या प्रणयकाव्याविषयी काही विचार. केशवसुतादी कवींच्या पार्श्वभूमीवर. सामाजिक निर्बंधामुळे स्त्रीपुरुषांत कृत्रिम अंतर निर्माण होऊन त्यांच्यांतील स्वाभाविक आकर्षणावर दुर्लभतेचा व दिव्यत्वाचा आरोप होतो हे माधव जूलियनांनी ओळखले होते. प्रणयिनी व प्रियकर यांना त्यांनी प्रथम एका पातळीवर आणले.—स्त्रीप्रेमाचे स्थान, महती, कार्य. ( "विरहतरंगा"-तील इंदूचा विवाहसंस्थेवर विश्वास नव्हता, प्रभाकराच्या दौर्बल्याची कीव येऊन ती त्याला पदरात घेते—ही या विवेचनातील विधाने गैरसमजोत्पन्न ).

**१०. आधुनिक मराठी कविता** : भ. श्री. पंडित / आ. १, १९५२ / आ. २, १९६८ / पृ. २३७-२४२.

( १ ) आधुनिक मराठी कवींची तिसरी 'प्रतिभासंपन्न कवीं'ची पिढी व चौथी 'कलावंत कवीं'ची पिढी यांतील अंतर. चौथ्या पिढीच्या काळातील मुख्य कवी माधव जूलियन. गिरीश व यशवंत यांच्यावरही त्यांची दाट छाया. ( २ ) त्यांच्या काव्यात स्त्रीकडे बघण्याची सरळ, स्वाभाविक दृष्टी. त्यातील बरीच कविता ऐन पंचविशीतील; म्हणून तिच्यात उत्तानपणाचा खळखळाट फार. ही वृत्ती उत्क्रांत होत होती. ( ३ ) परिष्करणाच्या उद्योगाची आत्यंतिकता. त्यात मूळ आविष्करणाचा अर्धाअधिक जीव खलास झाला.

**११. मराठीचा परिमल, खं. २** : दा. न. शिखरे / १९५३.

"विरहतरंगा"त कल्पकता व सुबोधता यांचे प्रमाण फार कमी. भाषेची क्लिष्टता, कल्पनांचा मर्यादितपणा, भाषालंकारांची दुर्मिळता या तीन उणिवा.

**१२. माझे वाङ्मयीन जीवन** ( आत्मचरित्रपर ) : काव्यविहारी [ धों. वि. गद्रे ] / १९५४.

रविकिरण मंडळ, पटवर्धन यांविषयी मजकूर. ( १ ) माधवरावांचा प्रथमपरिचय. त्यात ते तुसडे, घमेंडखोर असल्याचा समज. ( २ ) "नकुलालंकारा"तील एका व्यक्तीच्या स्वभावच्छटा श्री. नि. चापेकरांवरून रेखाटल्या असाव्यात. तसे करणे अयोग्य. ( ३ ) रविकिरण मंडळाच्या प्रकाशनांनी खळबळ. इतर सदस्यांपेक्षा माधव जूलियनांची कविता निराळी. वैयक्तिक प्रेमभावनेचा उघडा आविष्कार.—

निफाडकरांच्या विरोधी आघाडीची माहिती. (४) १९३२च्या आरंभी दृढ परिचय. तेव्हा मोकळेपणाने वागले.-माधवरावांचा तुसडेपणा स्वाभिमानाच्या तीव्र जाणिवेतून. उज्ज्वल प्रतिभा, अविश्रांत व्यासंग, जाज्वल्य तत्त्वनिष्ठा. साधी निगर्वी वागणूक.- "स्फूर्तिलहरी" [काव्यविहारींचा कवितासंग्रह, १९३६,] तील जाती व चाली यांची नावे माधवरावांनी दिली.-आणखी आठवणी. त्यांतून भाष्य.

१३. **तांबे : एक अध्ययन** : रा. अ. काळेले / आ. १, डिसेंबर १९५६ / आ.२, १९७३.

(१) माधव जूलियन वृत्तीने भावकवी असले, तरी वृत्तांत पंडित कवी. अधिकतर रचना अक्षरवृत्तांत. तांब्यांच्या जातिरचनेलाही ते वृत्ताचा वेष देतात. (२) तांब्यांच्या कवितांत माधवरावांनी केलेल्या काही सुधारणा अनावश्यकच नव्हे, तर अप्रयुक्तही वाटतात. (३) माधव जूलियनांना सौंदर्यामुळे प्रेम वाटते, तर तांब्यांना प्रेमामुळे सौंदर्य भासू लागते. (४) 'भेटती दूरान्तरें सप्रेम कृष्णाकोयना' या ओळीत [ग.४०] भग्नक्रमदोष.

१४. चित्पावन कौण्डिण्यगोत्री **पटवर्धन-कुल-वृतान्त** : विश्वनाथ गणेश पटवर्धन/ १९५८.

पटवर्धन आणि त्यांचे कुटुंबीय यांची चरित्रटिपणे वगैरे.

१५. **आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास** भाग २ : अ. ना. देशपांडे / आ १, १९५८ / पुनर्मुद्रण १९७० / आ. १, पृ. ३८९-३९९.

माधवरावांची वृत्ती आत्यंतिक स्वरूपाची स्वयंकेंद्रित. त्यातच त्यांच्या अनेक भावगीतांतील उत्कटतेचे आणि आकर्षकतेचे मूळ.-पटवर्धनांच्या सर्व काव्यरचनेचा धावता परिचय व परामर्श.-"विरहतरंगा"चे स्थान अपूर्व. त्यात कवीचे उत्कट भावजीवन आणि वस्तुनिष्ठा यांचा सुंदर संयोग. उत्तरोत्तर या उत्कटतेची इयत्ता सारखी खालावत गेली.-कवीच्या 'भावजीवी' वृत्तीवर त्याच्या वस्तुनिष्ठ वृत्तीने विजय मिळविलेला आहे.-पटवर्धनांच्या वृत्तीत अंतर्मुखतेची खोली दिसून येत नाही. -या कवितेच्या मर्यादा. तरी तिचे स्थान महत्त्वाचे.

१६. **कृष्णाकाठची माती** [ आत्मचरित्र ] : कृ. पां. कुलकर्णी / १९६१.

पटवर्धनांच्या काही आठवणी. (१) पृ.१५६-१५७ : पटवर्धनांच्या एका काव्य-गायनाच्या मैफलीची आठवण. त्यांचा साधा पण तालबद्ध आवाज.-दशग्रंथी ब्राह्मणाने स्वरांसहित वेद म्हणावा तशा सुरांवर फार्सी कवितेचा उद्‌घोष. (२) पृ. २१० : राजाराम महाविद्यालयातील भाषाशुद्धीचे वैयर्थ्य सांगणारे कुलकर्ण्यांचे व्याख्यान. (३) पृ.२२० : एल्फिन्स्टन महाविद्यालयात प्रोफेसर म्हणून कुलकर्ण्यांची नेमणूक झाली तेव्हा माधवरावांनी केलेले अभिनंदन.

**१७. 'जागृति'कार पाळेकर** भ. ब. पाळेकर / १९६१ / पृ. २९८–२९९.

**१८. वेचलेले क्षण** : बा. गो. मायदेव / फेब्रुवारी १९६२.

(१) पृ. ८९ : १९२३च्या सुमारला पटवर्धनांना जणू पुण्यातून उठवून लावण्याचा कट. त्याची आठवण. कानिटकर, व्ही. के. जोग हे विरोधक. (२) पृ. ९८ : "भाऊसाहेबांच्या बखरी"ला पटवर्धनांचा फार्शी शब्दांचा अर्थ सांगणारा कोश. "फार्शी–मराठी–शब्दकोशा"ची कल्पना त्यातून. (३) पृ. १८६–१८७ : तांबे समग्र कवितेच्या संपादनाबाबत. प्रस्तावनेवर मायदेवांची कातर. गं. दे. खानोलकरांची तक्रार. ह्यासंबंधीची हकिकत.

**१९. आधुनिक मराठी काव्याचे अंतःप्रवाह** : बा. भा. पाठक / १९६४.

पृ. ११–१२ (पटवर्धनांचा काव्यविचार); पृ. ५२, ५७–५८ (पटवर्धनांचा ध्येयवादी जीवनविषयक दृष्टिकोण); पृ. १०९–१११ (पटवर्धनांची निसर्गसौंदर्याकडे पाहण्याची वास्तव दृष्टी); पृ. १४७–१४८ (राष्ट्रीय, सामाजिक विचारसरणी); पृ. १६६–१६९ (प्रेमातील वास्तवता); पृ. २१३–२१६ ("सुधारक", "नकुलालंकार"); पृ. २३५ (उमरखय्यामच्या रुबाया)

(२) तांब्यांवरील लेखात पृ. ३७६–३७७ वर, तांबे कवितांत पटवर्धनांनी केलेल्या बदलावर टीका. तांब्यांच्या कवितेतील हिंदी संस्कार पुसले. तांब्यांच्या कवितेच्या गेय स्वरूपाकडे दुर्लक्ष झाले असावे.

**२२. गगनी उगवला सायंतारा** [आत्मचरित्र] : गजानन वाटवे / १९७१.

(१) पृ. ३९ : माधव जूलियनांच्या 'चल उडुनि पाखरा.', या कवितेने काव्यगायक गजानन वाटवे यांच्या जीवनाची मुहूर्तमेढ रोविली गेली. (२) पृ. ८७–८८ : माधवराव आजारी असताना त्यांनी वाटव्यांना घरी बोलावले [पुणे, १९३९]. 'तेथे चल राणी' प्रथम म्हटली. "गज्जलांजली"तील कविता जवळ जवळ तासभर म्हटल्या. शेवटी 'जीव तूझा लोभला', 'आई' म्हटल्या. माधवराव विशेष प्रसन्न झाले.

**२३. सांजवात** [आत्मचरित्र] : आनंदीबाई शिर्के / १९७२.

पटवर्धन जळगावला महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले, तेव्हा आनंदीबाई शिर्के स्वागताध्यक्ष. त्या संमेलनाचा वृत्तान्त.

**२४. कमलाकी** : विद्या बाळ / १९७२.

पृ. २०१ : दादा दिवेकरांवर हिंगण्याच्या संस्थेत पैशाच्या अफरातफरीचा आरोप. दादांच्या आयुष्यात घडलेल्या या दुःखद प्रसंगाला त्यांनी स्वतः कधीच वाचा फोडली नाही. एवढेच नव्हे, तर एकदा माधव जूलियनही दादांना म्हणाले होते,

" तुमची कागदपत्रं मला द्या. तुमची परवानगी असेल तर मी हे सारं जाहीरपणं लिहू इच्छितो. " दादांनी त्यांना परवानगी दिली नाही.

२५. **एका पिढीचे आत्मकथन** : संपादक : पु.शि.रेगे व इतर / १९७५ / पृ.२९७.
वा. रा. कान्त यांच्या लेखात माधवराव पटवर्धनांची आठवण.

२६ **तसबीर आणि तकदीर** [ आत्मचरित्र ] : श्री. के. क्षीरसागर / पॉप्युलर प्रकाशन, मुंबई / १९७६.

या पुस्तकात विखुरलेल्या स्वरूपात, क्षीरसागरांच्या संबंधात पटवर्धनांचा अनेक ठिकाणी उल्लेख आलेला आहे. पटवर्धनांचा उल्लेख असलेली पृष्ठे : १५, १७–१८, २१, २३–२७, ३०, ३२–३५, ४४, ६३, ६६, ७५, ७९, ८६, ९०–१०२, १३२–१३३, २१६, २५४, ४२५–४२६, ५१२.

२७ **स्वरगंगेच्या तीरीं** [ आत्मचरित्र ] : जी. एन्. जोशी / मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई / जून १९७७.

पृ. ३७–३८ : १९३२ साली माधव जूलियन यांची ' प्रेम कोणीही करीना ' ही कविता व पुढे ' सङ्गमोत्सुक डोह ' व इतर काही कविता जी. एन्. जोशांनी ध्वनिमुद्रित केल्यापासून त्यांचा व जी. एन्. जोशांचा चांगलाच स्नेह जमला.

२८. **बातचीत-भाऊसाहेब माडखोलकरांशी** : प्रा. भास्कर नंदनवार / विजय प्रकाशन, नागपूर / २७ डिसेंबर १९७६ / पृ. १०१ / किं. १० रु.
यात माधवरावांसंबंधी उल्लेख.

२९. **मर्ढेकरांचे सौंदर्यशास्त्र : पुनःस्थापना** : द. भि. कुलकर्णी / अमेय प्रकाशन, नागपूर / १२ ऑगस्ट १९८२.

या ग्रंथात ' मर्ढेकर आणि माधव जूलियन ' यावर विवेचन, पृ. ३८८–३९२.

## ६. पटवर्धन विषयक पुस्तकांवरील परीक्षणलेख

### आमची अकरा वर्षे

लीलाबाई पटवर्धन / १९४५.

१. **कै. माधवराव पटवर्धन यांचे, त्यांच्या पत्नींनी लिहिलेले चरित्र** : श्री. म. माटे / ' स्फुट परामर्श ' सदरात, दै. प्रभातमध्ये तीन लेखांक. लेखांक १ : २५ डिसेंबर १९४५ / लेखांक २ : २६ डिसेंबर १९४५ / लेखांक ३ : २७ डिसेंबर १९४५.

सर्वसाधारण. पहिल्या लेखात पुस्तकाचा अतिशय गौरव. पुढच्या दोन लेखांत पुस्तकातील उतारे.

२. **आमची अकरा वर्षे** : [ परिचय-परामर्श ] : रा. वि. ओतूरकर / सह्याद्रि, मार्च १९४६.

या पुस्तकात चिकित्सकपणा व प्रेम यांचे हृद्य मिश्रण. 'मात्र माधवरावांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचे लेखिकेस आकलन झाल्याचे पुस्तकावरून कळून येत नाही.'—'माधवरावांसारखा नीतिमान, धेडर व रम्य जीवनाचा पुरस्कर्ता क्वचितच आढळेल.'—"विरहतरंग", "सुधारक" समजण्यास माधवरावांचे जीवन व जीवनविषयक तत्त्वज्ञान जाणणारा मनुष्य हवा. अशी सांगड घालून माधवरावांवर लिहिणारा हवा आहे.

३. **आमची अकरा वर्षे** [ परीक्षण ] : श्री. के. क्षीरसागर / नवयुग, ३१ मार्च १९४६ / पृ. ८.

४. **आमची अकरा वर्षे** : ना. ग. जोशी / अभिरुचि, जून १९४६ / पाऊण पृष्ठ. 'नवे साहित्य' सदरात त्रोटक, गौरवपर अभिप्राय. (या पुस्तकाचे प्रकाशन २९ नोव्हेंबर १९४५ ला द. बा. पोतदारांच्या हस्ते.)

५. **आमची अकरा वर्षे** : लेखमाला : द. सी. पंगू / झंकार, जून १९४६. [ समाविष्ट : "पुष्पांजलि", लेखसंग्रह, द. सी. पंगू / १९४८ / पृष्ठे २४. ]

लीलाबाईंच्या पुस्तकाच्या परीक्षणाच्या निमित्ताने लिहिलेला दीर्घ लेख. या अनुषंगाने डी. लिट्. प्रकरणाची स्वतःची बाजू प्रा. पंगूंनी मांडली आहे. माधवरावांचे एक प्रमुख हितशत्रू म्हणून ज्यांच्यावर दोषारोप झाले, त्यांतल्या एका प्रमुख व्यक्तीने आपल्यावरील आक्षेपांबाबतचे केलेले निवेदन. म्हणून महत्त्वाचा लेख. १. "आमची अकरा वर्षे"वर टीका. ( १ ) लेखिका आत्मनिष्ठेमुळे पतीशी समरस होऊ शकली नाही, त्याचे अंतरंग जाणू शकली नाही. माधवरावांचे विकृत दर्शन घडविले आहे. ( २ ) निरपेक्ष, निर्भीड प्रामाणिकपणाने लेखन नाही. आत्मसमर्थन. व्यवहारी दृष्टी. ( ३ ) कुणा त्रयस्थाच्या सल्ल्याने लेखन झाले आहे. वस्तुस्थिती दडवून ठेविली गेली आहे. २. फर्गसन कॉलेज प्रकरण. मद्रदेशीय कॉलेजकन्यका. तिच्या पित्याची तक्रार. रविकिरण मंडळातील वशिष्ठाचेच अंग. ३. कौटुंबिक जीवन. लीलाबाईंची आत्मकेंद्रित वृत्ती मनोमीलनाआड. पत्नीबद्दल ध्येयवाद व आशावाद धुळीला मिळाला. ४. 'वेताळा'ची योग्य मीमांसा. ध्येयभंगातून ती मनोवृत्ती. ५. माधवरावांच्या काही स्नेह्यांसंबंधी आडून उल्लेख. कोल्हापूरस्थ व पुणे-मुंबईकडील स्नेही असा पक्षपात. ६. लेखाच्या अखेरच्या भागात डी. लिट्. प्रकरणातील अंतर्गत इतिहास. 'माधवरावांनीही माझ्या [पंगू–] विरुद्ध अकारण गवगवा केला. साप म्हणून जमीन धोपटली. मी आड आलो नाही.'

६. " आमची अकरा वर्षे " [ पुस्तक-परीक्षण ] : ' मंदार ' ( इन्दूर ) / जून १९४६, व. १ अं. १० / पृ. १३–१४. [ म. नि. ]

७. लीला–माधव : र. गो. सरदेसाई / हंस, मार्च १९४८ / पृ. १९–२५.

' बायकांच्या दृष्टिकोणातून नवरे ' या लेखमालेत स्त्रीलेखिकांच्या आत्मचरित्रांतून दिसणाऱ्या त्यांच्या वैवाहिक जीवनावर लेख. या पाच लेखांपैकी एक " आमची अकरा वर्षे "वर. लेख परिचयपर, पण अशा दृष्टीने बघितल्यामुळे वेगळेपणा, निःपक्षपातीपणा आला आहे. ( १ ) व्यावहारिक गरजांपायी दोघांकडून लग्न. लग्नानंतर प्रत्येक बाबतीत माधवरावांना तडजोड करावी लागली. या तडजोडीच्या यातना. संसाराच्या आरंभी दोघांचीही मने साशंक. परिस्थितीने एकत्र आणलेली. ( २ ) पत्नीकडे बघण्याचा माधवरावांचा दृष्टिकोण आणि संसाराविषयीची लीलाबाईंची सर्वसाधारण स्त्रीची अपेक्षा यांतील विरोध. हा संसार म्हणजे दोन विरोधी मनोधर्मांचा झगडा होता. ' नवरा-बायकोच्या मानसिक गुंतागुंतीच्या व्यापाराचा ठाव घेऊ पाहणारे पुस्तक. ' ( ३ ) माधवरावांनी लीलाबाईंच्या स्वतंत्र, प्रौढ, वाढलेल्या व्यक्तिमत्त्वाचा विचार केला नाही, आणि लीलाबाईंचा संकोची, निमूटपणाने आज्ञापालन करण्याचा स्वभाव. त्याचाही परिणाम. —' या पुस्तकात माधवरावांचा मानसिक व स्वाभाविक कायाकल्प कसा झाला, याचे उद्बोधक चित्रण पहावयास मिळते. '

## माधव जूलियन

गं. दे. खानोलकर / जुलै १९५१.

८. माधव ज्यूलियन [ परीक्षण ] : शं. के. कानेटकर / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, डिसेंबर १९५३.

९. ' माधव ज्यूलियन 'चे मारेकरी : [ प्र. के. अत्रे ] / अग्रलेख / मराठा, रविवार, २६ मे १९६८.

खानोलकरांचे " माधव जूलियन " ( आ. २, १९६८ ), व कानेटकरांचे " स्वप्नभूमि " ( १९६५ ) या दोन चरित्रपुस्तकांच्या निमित्ताने. विशेषतः खानोलकरांवर असभ्य, गलिच्छ टीका. या लेखातले बरे मुद्दे : ( १ ) माधवराव प्रतिभाशाली कवी याविषयी दुमत नाही. पण त्या व्यतिरिक्त अन्य कोणत्याही सार्वजनिक वा सांस्कृतिक कार्यात त्यांनी लक्ष घातले नव्हते. ( २ ) स्वतःच्याच उठावदार वैशिष्ट्यांना सोडचिठ्ठी देणारा हा विरळा साहित्यिक. धरसोड वृत्तीमुळे यातनामय जीवित. ( ३ ) " माधव जूलियन ", " स्वप्नभूमि " यांतच विरोध, विसंगती. माधवरावांचे ' परममित्र 'च त्यांची अधिक बदनामी करीत आहेत.–असत्य किंवा विपर्यास. ( ४ ) वरदा-प्रकरण इतके जुने आणि खासगी की, त्याची आता विस्ताराने चिकित्स

करण्यात स्वारस्य नाही.—" माधव जूलियन "वर टीका. ते माधवरावांच्या लौकिक हानीलाच कारण. माधवरावांच्या जीवनातील विसरल्या जाण्यायोग्य घटनांवरच त्यात जास्त भर दिला आहे.—यात माधवरावांच्या मनाची घडण नि त्यांना सोसाव्या लागलेल्या यातनांचे कारुण्यमधुर चित्र नाही; वाङ्मयावरही नवा, उद्बोधक प्रकाश नाही. 'असली चरित्रे म्हणजे साहित्यावरचेच कलंक म्हटले पाहिजेत.' खानोलकरांच्या मराठी भाषेवर टीका.

**१०. माधव ज्युलियन** [.आ. २, परीक्षण ] : रविवार सकाळ, २२ डिसेंबर १९६८ / पृ. ९.

त्रोटक, सामान्य प्रशंसावर अभिप्राय.

**११. 'माधव जुलियन' द्वितीयावृत्तीच्या निमित्ताने** : माधव मनोहर / नवशक्ति, रविवार, २९ डिसेंबर १९६८ / 'शब्दांची दुनिया' सदरात.

माधवरावांच्या पूर्वायुष्यातील सर्वाधिक महत्त्वाची घटना त्यांची स्वतःच्या संबंधातील पोरकेपणाची भावना.—त्यांचा व आईचा संबंध. या लोकविलक्षण घटनेचा अन्वयार्थ शोधण्याची वा लावण्याची बुद्धी चरित्रकाराला झाली नाही.—बापाविषयी काही एक बोलणे चरित्रकाराने बुद्धिपुरस्सरच टाळलेले दिसते.—आईबाप वा त्यांचा अभाव माणसाचे संपूर्ण चरित्र घडवितात. रामभाऊ मराठ्यांना बापाच्या ठिकाणी त्यांनी कल्पिले.—माधवराव–लीलाबाई वैवाहिक जीवनाचे स्वरूपही शोधण्याचा खानोलकर प्रयत्न करीत नाहीत.—माधवरावांचे गूढ व्यक्तित्व हे एक निरंतर आव्हान आहे.— चरित्र आणि चरित्रकार यांवर तीव्र प्रतिकूल टीका. 'चरित्रकाराचा अहंकार.'—माधवरावांच्या उत्तरायुष्यातील मानसजीवनाविषयी काही नाही.—चरित्रसाधनांचा संग्रह करावा लागतो, तसा त्यांचा अन्वय लावावा लागतो.

**१२. माधव जूलियन** [ आ. २ चे परीक्षण ] : रा. श्री. जोग / सत्यकथा, मे १९६९ / पृ. ७२–७५.

खानोलकर चरित्रलेखनात तटस्थ राहिले. हा दोष. यात कागदपत्रे आहेत, पण वकिलाचे आर्ग्युमेंट नाही.—मैत्रीण, भगिनी नाती एक वेळ मान्य; पण मातेचे नाते पचावयास कठीण वाटते.—' तुमची आमची मैत्री आता शक्य नाही.' असे निर्वाणीचे उद्गार श्री. बा. रानडे विनाकारण काढतील असे वाटत नाही.—कविचरित्रलेखनाचे प्रयोजन. कवीचे काव्य सम्यक् कळणे ? की, लक्षणीय व्यक्तीच्या अंतर्बाह्य जीवनाचे वास्तव दर्शन ?—माधव जूलियनांचे वाङ्मय त्यांच्या व्यक्तित्वापेक्षा मोठे आहे.

**स्वप्नभूमि**

शं. के. कानेटकर / २८ नोव्हेंबर १९६५.

१३. **माधव जूलियन यांचे चरित्र** [ "स्वप्नभूमि," समीक्षण ] : के. नारायण काळे / किर्लोस्कर, फेब्रुवारी १९६६ / पृ. ३०–३२.

शंकररावांच्या [ कानेटकरांच्या ] काव्यविवेचनाला फार मर्यादा.–ललित प्रबंध-आलेखन म्हणून ढिसाळ.

१४. **स्वप्नभूमी** [ परीक्षण ] : रा. श्री. जोग / सत्यकथा, मे १९६६ / पृ. ८३–८५.

अतिशय परखड परीक्षण.—हे पुस्तक 'व्यक्ति आणि वाङ्मय' या स्वरूपाचे झाले आहे. पण यांपैकी कोणत्याही अंगास लेखकाकडून न्याय मिळाला नाही.–ग्रंथाच्या वाङ्मयविषयक भागात कात्री आणि डिंक यांचा भरपूर उपयोग झाला आहे.—माधवरावांच्या आंतरजीवनाचे दर्शन घडावे या अपेक्षेबाबतही फार निराशा होते.

१५. **स्वप्नभूमि** [ समीक्षण ] : अनुराधा पोतदार / केसरी, रविवार, ५ जून १९६६ / २–२॥ स्तंभ.

एकूण प्रतिकूल अभिप्राय. 'कवि तो होता कसा जीवनी' पाहण्याचे कुतूहल असते.–रितेपणाचा आणि विषादाचा अनुभव हे चरित्र वाचून संपल्यावर त्यासंबंधी उरतो.

**माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन**

सु. रा. चुनेकर / १९७३.

१६. **माधवराव पटवर्धनांच्या समग्र वाङ्मयाचे दर्शन घडविणारा अभ्यासपूर्ण विवेचनात्मक ग्रंथ** : नरेंद्र बोडके / रविवार नवप्रभा ( पणजी ), २९ सटेंबर १९७३/ सुमारे अर्धा पृष्ठ.

परिचयपर, प्रशंसात्मक अभिप्राय.

१७. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** [ अभिप्राय ] : बलवंत, १० ऑक्टोबर १९७३.

१८. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** [ समालोचन ] : आकाशवाणी, पणजी, १६ ऑक्टोबर १९७३, रात्रो ९l.

१९. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** : व. दि. कुलकर्णी / आकाशवाणी, मुंबई ब, शुक्रवार ९ नोव्हेंबर १९७३, रात्री ९l. [ मुद्रित, 'ललित शिफारस' ललित, जानेवारी १९७४ / पृ. १०–१४. ]

या ग्रंथाच्या वैशिष्ट्यांचे दर्शन. ' पटवर्धनांच्या सर्व वाङ्मयाचा साक्षेपी चिकित्सक अभ्यास. ' ' एक नेटके, साक्षेपी, शास्त्रशुद्ध संशोधनात्मक लेखन म्हणून चुनेकरांचा प्रस्तुत ग्रंथ हा उत्तम ठरावा ! '

२०. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** : मु. श्री. कानडे / आकाशवाणी पुणे, रविवार दि. ९ डिसेंबर १९७३, रात्री ९।.

२१. **माधवराव पटवर्धनांच्या वाङ्मयाचा जीवनसंबद्ध अभ्यास** : डॉ. द. न. गोखले / समाज प्रबोधन पत्रिका, जानेवारी–फेब्रुवारी १९७४ / पृ. ७२–७८.

वाङ्मयाच्या जीवनसंबद्ध अभ्यासाच्या दृष्टीने परीक्षण. चुनेकरांना पटवर्धनांच्या जीवनाच्या प्रतीत झालेल्या अर्थाविषयी काही आक्षेप, मतभेद.—शांताबाई-संबंधावरील विवेचनातील अपुरेपणा, त्यावर आक्षेप. ' शांताबाईंच्या सहवासावरून वासनारहित स्त्री-पुरुषसंबंधाचा चुनेकरांनी काढलेला निष्कर्ष सदोष किंवा गैरसमज उत्पन्न करणारा आहे. '— वरदा-प्रकरणासंबंधीचे विवेचन काही मर्यादेपर्यंत पटण्यासारखे, पुढे नाही.—' श्रेय '–' प्रेय ' विचाराबाबत मतभेद.—' पटवर्धनांच्या जीवनात काव्याला केंद्रस्थान देऊन काव्यातून इतर कार्ये उद्‌भवली असे दाखविणे वास्तवाशी सुसंगत ठरणार नाही. ' काही आक्षेप, मतभेद नोंदवून ' अभ्यास एकंदरीने चांगला उतरला असल्याचा ' अभिप्राय.

२२. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** [ अभिप्राय ] : पद्माकर चितळे / ' वाचनालय ', मार्च १९७४ / २ स्तंभ.

२३. **माधवराव पटवर्धन यांच्या वाङ्मयाचे वेधक दर्शन** : डॉ. द. न. गोखले / केसरी, रविवार दि. ११ एप्रिल १९७४ / सुमारे अर्धे पृष्ठ.

एकंदरीत प्रशंसापर अभिप्राय.

२४. **माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन** [ परीक्षण ] : डॉ. द. न. गोखले / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, एप्रिल–मे–जून १९७४, अंक १८९ / पृ. १०१–१०९.

चुनेकरांच्या ग्रंथातील वेगवेगळ्या विवेचन–अंगांचा समावेशक परामर्श.–जीवनसंबद्ध अभ्यासाच्या दृष्टीतून काही मतभेद. पटवर्धनांच्या कवितेतील आत्मानुभूतीच्या विवेचनाबाबत काही मतभेद. काही कवितांच्या चुनेकरांच्या मूल्यमापनाविषयी मतभेद.—" सुधारक "च्याकडे बघण्याच्या चुनेकरांच्या भूमिकेत डळमळीतपणा.

२५. **माधवराव पटवर्धन यांचे यथार्थ वाङ्मयदर्शन** : दुर्गा भागवत / महाराष्ट्र टाइम्स, रविवार ७ जुलै १९७४ / सुमारे पाव पृष्ठ.

' मार्मिक पण संयत रसग्रहण किती जीवनाभिमुख असते याचा प्रत्यय या वाङ्मयदर्शनात पदोपदी येतो. '

२६. आत्ममग्न साहित्यकाराचा समर्थ शोध : प्रा. दत्ता पवार / नवशक्ति, रविवार २८ जुलै १९७४.

२७. माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन : डॉ. बि. रा. करंदीकर / 'सत्यकथा', जानेवारी १९७५ / पृ. ३१–३७. [समाविष्ट : "ग्रंथवेध", डॉ. बि. रा. करंदीकर, मे १९७८, पृ. २४५–२५६.]

पटवर्धनांच्या व्यक्तिमत्त्वातील लोकविलक्षणता. अनेक दृष्टींनी ते आपल्या काळाच्या बरेच पुढे —पटवर्धनांचे कोणते दीर्घकाव्य अधिक काल टिकेल? "विरहतरंग."– जीवनाचा व कवितेचा अन्वय लावून दाखवण्याचे कार्य स्थूलपणाने चुनेकर करतात; पण पुरतेपणाने करीत नाहीत.—ग्रंथातील काही अनुल्लेख. 'हा ग्रंथ वाचल्यावर एक सुबद्ध अभ्यासपूर्ण लेखन वाचल्याचे समाधान.' 'एखाद्या लेखकाच्या वाङ्मयाचे इतके नीटस, रेखीव आणि मर्मग्राही दर्शन अशा समतोल वृत्तीने व मनोज्ञ शैलीत केलेले क्वचितच आढळेल.'

## डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन

द. न. गोखले / १ मे १९७८.

२८. डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन [परीक्षण] : डॉ बि. रा. करंदीकर / 'वाणी', आकाशवाणी पुणे केंद्र, ९ ऑगस्ट १९७८, रात्री ९॥-९॥।.

डॉ. द. न. गोखले यांच्या चरित्रग्रंथावरील भाषण.

२९. डॉ. माधवराव ऊर्फ माधव जूलियन [परीक्षण] : श्री.के.क्षी. / रविवारचा सकाळ, १३ ऑगस्ट १९७८.

डॉ. द. न. गोखले यांच्या चरित्रग्रंथाचे परीक्षण.

३०. एक आगळे व्यक्तिमत्त्व, एक आगळे चरित्र [समीक्षण लेख] : डॉ. बि. रा.करंदीकर / समाज प्रबोधन पत्रिका, नोव्हेंबर–डिसेंबर १९७८ / पृ. ३६५–३७२.

डॉ.बि.रा.करंदीकर / समाज प्रबोधन, नोव्हेंबर–डिसेंबर १९७८ / पृ.३६५–३७२.

डॉ. द. न. गोखले यांच्या "डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन"वर समीक्षण लेख.–माधवरावांचे सारे जीवन केवळ यशाने मंडित झाले आहे असे वाटते. पण तसे नाही. शोक त्यांच्या उभ्या जीवनाचा स्थायिभाव होता. त्यांच्या प्रत्येक यशाला दुःखाची व विलक्षण तीव्र अशा मनस्तापाची एक किनार जोडली गेली आहे.–माधव-रावांची लोकविलक्षण व्यामिश्र मनःप्रवृत्ती व लोकविलक्षण मनोवांच्छित. नियतीचाही वाटा.–व्यामिश्र व जटिल व्यक्तिमत्त्वाचे दर्शन.–माधवराव पुरुष असूनही त्यांच्या जीवनात–स्त्रीच्याच संदर्भात सामान्यपणे घडू शकणारे–उदात्त प्रेमाचे कारुण्यात

पर्यवसित झालेले भीषण नाट्य घडून गेलेले दिसते. माधवराबात खोलवर एक स्त्रीत्व लपून राहिलेले.–गोखल्यांमध्ये तटस्थ नि अलिप्त चित्रण करण्याची सूक्ष्मता. अनेकांगी अवधान. शब्दचित्रे हा एक विशेष त्यातही संयम. पक्षपाती चित्रण नाही. सावधगिरीचा कोठे कोठे अतिरेक. यामुळे निवेदनात एक प्रकारचा निर्जीवपणा व तोचतोचपणा. चरित्रकथन व वाङ्मयविवेचन यांचा सांधा जोडावा लागल्याने निवेदनाचा ओघ खंडित. चरित्रलेखनात सत्य आणि सौंदर्य यांचा मिलाफ. ' गोखल्यांच्या या ग्रंथामुळे मराठीतील चरित्रवाङ्मय अनेक अर्थांनी समृद्ध झाले आहे. '

३१. **गुणग्राहक, मर्मभेदक चरित्रग्रंथ** : कु. श्री. पेडणेकर / ' महाराष्ट्र टाइम्स ', रविवार, दि. ११ फेब्रुवारी १९७९.

डॉ. द. न. गोखले यांच्या " डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन "वर अभिप्राय.

३२. **डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव ज्युलियन** : नरहर कुरुंदकर, ' ललित ', एप्रिल १९७९, पृ. १८–२१.

डॉ. गोखल्यांच्या ग्रंथाची ' ललित शिफारस '. खुद्द त्या पुस्तकावरील लेखनापेक्षा अवांतरपणाच जास्त आहे.

३३. **डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन** : शशिन ओझा / ' ग्रंथ ' ( गुजराती मासिक ), मार्च १९७८, व. १६ अं. ३ / पृ. ५–१०, ३९.

या चरित्रग्रंथाच्या आधाराने माधवराव पटवर्धनांविषयी परिचयपर लेख. सामान्यतः चरित्रग्रंथावर अनुकूल अभिप्राय. [ गुजराती ]

३४. **डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन** : विनायक गंधे / ' प्रतिष्ठान ', डिसेंबर १९७९, जानेवारी १९८० / पृ. २७–३१.

सर्वसाधारण परिचयपर, प्रशंसापर परीक्षणलेख.

३५. **प्लेटॉनिक प्रेम आणि माधवरावांचे चरित्रकार** : श्री. के. क्षी./महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जुलै-सप्टेंबर १९७९, अं. २१० / पृ. १४–२१.

डॉ. गोखले यांच्या पटवर्धन-चरित्रातील माधवराव-वरदा प्रकरणासंबंधीचे विवेचन–त्याच्यावर टीका. डॉ. गोखले एकाच वेळेला माधवरावांना आणि श्री. बा. रानड्यांनाही वरदा-माधवराव मुंबई-भेटीबाबत दोषमुक्त करू पाहातात यावर टीका. या लेखात पूर्वी अनेकवार जे क्षीरसागरांनी लिहिले आहे त्याचाच पुनरुच्चार. श्री. बा. रानड्यांवर असभ्य टीका. भडक लेख. भडक भाषा.

३६. **माधवरावांचे चरित्र आणि श्री. के. क्षी.** : डॉ. द. न. गोखले / महाराष्ट्र साहित्य पत्रिका, ऑक्टोबर–डिसेंबर १९७९, अं. २११ / पृ. १–९.

श्री. के. क्षीरसागरांच्या उपरोक्त ( क. ६. ३५ ) लेखाला उत्तर. यातही नवे नाही.

हे दोन लेख म्हणजे वाचकांच्या व अभ्यासकांच्या दृष्टीने अकारण, वृत्तपत्रीय पातळीवर निर्माण केलेला वाद आहे.

## समग्र माधव जूलियन

संपादक : रा. श्री. जोग, द न. गोखले, सु. रा. चुनेकर / १९७७.

**३७. समग्र माधव जूलियन :** आनंद यादव / सोबत, २२ फेब्रुवारी १९७७. पुस्तकाचे प्रयोजन, स्वरूप काहीच न समजता लिहिलेला लेख.

**३८. समग्र माधव जूलियन :** वि. बा. प्रभुदेसाई / लोकमत, २७ फेब्रुवारी १९७७. परिचयपर लेख.

**३९. समग्र माधव जूलियन यांच्या समग्र काव्याचे दोन खंड :** श्री. के. क्षीरसागर / रविवार सकाळ, २७ नोव्हेंबर १९७७

डॉ. गोखले, डॉ. चुनेकर यांच्या प्रस्तावनांचा परामर्श. काही आक्षेप.–‘मूळ अपरिष्कृत स्वरूपातील कविता किंवा पाठ देणे जरूर होते.’

* *

इ त र

## १. पटवर्धन-स्मृतिदिन-भाषणे[1]

**१. माधव जूलियन यांची कविता व तिचा आधुनिक कवितेवर झालेला परिणाम :** रा. श्री. जोग / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / ५ डिसेंबर १९४३ / अध्यक्ष : न. चिं. केळकर. केळकर. ( याच प्रसंगी श्री. बोराबके यांच्या हस्ते नी. म. केळकरांनी तयार केलेल्या पटवर्धनांच्या तैलचित्राचे अनावरण. बोराबके पतिपत्नींची मिळून रु. ९०० देणगी.

**२. माधव जूलियन यांची काव्यव्यक्ति :** गो. के. भट / म. सा. परिषद, पुणे / १९४४ / अध्यक्ष : न. चिं. केळकर. [पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क, २. १०१ ]

**३. माधवरावांचे कविमन :** वि. स. खांडेकर / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९४५ / अध्यक्ष : द. वा. पोतदार ( याच प्रसंगी लीलाबाई पटवर्धनांच्या " आमची अकरा वर्षे "चे प्रकाशन. लीलाबाईंचा सत्कार. यशवंत, सोपानदेव चौधरी यांचे काव्यगायन. गोपीनाथ तळवलकर, श्री. के. क्षीरसागर, गं. भा. निरंतर यांची भाषणे. )

---

१. महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, मध्ये प्रतिवर्षी पटवर्धन–स्मृतिदिन साजरा होतो. सामान्यतः पटवर्धनांसंबंधी किंवा संबद्ध वाङ्मयीन विषयावर त्या दिवशी व्याख्यान होते, किंवा अन्य कार्यक्रम होतो. ३० नोव्हेंबर १९४२ला फलटण संस्थानचे अधिपती मालोजीराव निंबाळकर यांच्या हस्ते माधवराव पटवर्धन सभागृहाचे उद्घाटन झाले, आणि तेव्हापासून प्रायः प्रतिवर्षी हा पटवर्धन-स्मृतिदिन साजरा होत आला आहे. या सर्व स्मृतिदिन प्रसंगांच्या कार्यक्रमांची नोंद येथे केलेली आहे. इतरत्रही पटवर्धन-स्मृतिदिन काही ठिकाणी साजरा होतो. अशाही काही उपलब्ध व्याख्यानांच्या नोंदी येथे केल्या आहेत. पटवर्धनांच्या अभ्यासाच्या काही दिशा या नोंदींवरूनही लक्षात येतील. पटवर्धनांचे अभ्यासक व अभ्यासविषय यांचीही यामुळे ओळख होईल.

४. **माधवराव पटवर्धन स्मृतिदिन** : पु. म. लाड / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे/ २९ नोव्हेंबर १९४६.

५. **माधवराव पटवर्धन स्मृतिदिन** : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९४७ / अध्यक्ष : रा. अ. काळेले. [ १९४७, १९४८ या वर्षी वार्षिक वाङ्मय–समालोचन व्याख्यानसत्र. ]

६. **गेल्या वर्षातील मराठी काव्य** : म. ना. अदवंत / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९४८ / अध्यक्ष : अनंत काणेकर.

७. **विरहतरंग** : रा. श्री. जोग / म सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९४९. प्रा. जोग यांनी " विरहतरंगा"वरील आक्षेपांचा मुख्यतः परामर्श घेतला.

८. **माधवराव पटवर्धन व उमरखय्याम** : डॉ. म गो. माईणकर / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५०.

९. **माधवरावांचे व्यक्तिमत्त्व** : ग. के. कानेटकर / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५१.

१०. **ब्रह्मानंदसहोदर** : अनंत काणेकर / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५२.

११. **माधवराव पटवर्धन यांच्या काव्याचे रसग्रहण** : वसंत बापट / मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई / २९ नोव्हेंबर, १९५२.

१२. **प्रणयपंढरीचा वारकरी** : भ. श्री. पंडित/म. सा. परिषद, पुणे/२९ नोव्हेंबर १९५३. [ पहा, पटवर्धनविषयक वाङ्मय, क्र. २. १०५ ]

१३. **आजच्या मराठी साहित्यातील सामाजिक जाणिवा** : वा. रं. सुंठणकर / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५४.

१४. **माधव जूलियन स्मृतिदिन** : द. ल. गोखले / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५५ / अध्यक्ष, वि. द. घाटे.

१५. **बोलींचा अभ्यास** : वा. भ. बोरकर / म सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५६.

१६. **सामाजिक चळवळींचे ललितकृतीत पडणारे प्रतिबिंब** : भों. वि. देशपांडे / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५७.

१७. **माधवरावांची प्रेमविषयक आणि सामाजिक दृष्टि** : श्री. के. क्षीरसागर / म. सा. परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९५८.

माधवरावांचे प्रेम ध्येयात्मक, स्त्रीपूजक, प्रेमपूजक. त्यांच्या कवितेतील प्रेम प्रसन्न आहे, पण प्रेमाच्या अभिव्यक्तीत किचकट. कवितेत वैदग्ध्य आहे, स्फूर्ती नाही.– पर्शियन काव्याच्या अभ्यासाने त्यांच्या प्रेमात स्वतःचा आब राखून असणारी दरबारी रुबाबाची समर्पणशीलता आहे.– "विरहतरंगा"वर बरीच टीका. डेक्कन जिमखाना संस्कृतीच्या लोकांना त्यांनी वाजवीपेक्षा जास्त किंमत दिली.

**१८. "छंदोरचना" आणि "छंदोरचना"कार** : ना. गो. जोशी / म.सा.परिषद' पुणे / २९ नोव्हेंबर १९५९.

"छंदोरचना" छंदःशास्त्रातला युगप्रवर्तक ग्रंथ.–अखेर माधवराव स्वतःच्या प्रतिपादनात फिरत राहिले.

**१९. कवि माधव जूलियन : एक अभ्यास** : अनुराधा पोतदार / महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे / २९ नोव्हेंबर १९६०. [पहा : पटवर्धनविषयक वाङ्मय, क. २.११०]

**२०. माधव जूलियन यांचे व्यक्तिमत्त्व** : रा. श्री. जोग / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६१. [रात्री मुशायरा. बा. बा. पाटणकर यांच्या "मराठी शायरी"चे श्री. के. क्षीरसागर यांच्या हस्ते प्रकाशन.]

**२१. माधव जूलियन यांची प्रेमकविता** : श्री. के. क्षीरसागर / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६२.

**२२. माधवराव पटवर्धन : व्यक्ति आणि प्रेमकवि** : गोपीनाथ तळवलकर / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६३. [पहा : पटवर्धनविषयक वाङ्मय, क. २.११८.]

**२३. माधव जूलियन** : (१) प्राचार्य ग. ह. पाटील, (२) सौ. यमुताई शहाणे, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६४.

सौ. यमुताई शहाणे माधवरावांच्या बहीण. माधवरावांसंबंधी घरगुती आठवणी त्यांनी सांगितल्या. माधवराव व त्यांच्या आई यांच्यांत वितुष्ट असल्याचा समज खोडण्यावर भर.

**२४. मराठी भाषी छंद आणि अन्य भाषी छंद–तौलनिक विचार** : ना. ग. जोशी / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६५.

**२५. उमरखय्यामची भाषांतरे** : सु. रा. चुनेकर / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६६.

**२६. सत्याचा शोध** : त्र्यं. वि. सरदेशमुख / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६७.

**२७. माधव जूलियन यांची नवता :** गोपीनाथ तळवलकर / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६८.

**२८. माधव जूलियन यांची खंडकाव्ये :** ह. कि. तोडमल / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९६९.

**२९. भारतातील पर्शियन साहित्याची आणि अभ्यासाची परंपरा :** सेतुमाधवराव पगडी / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७०.

[ २९ नोव्हेंबर १९७१ ला डॉ. द. न. गोखले यांचे व्याख्यान आयोजित केले होते. पण युद्धजन्य परिस्थितीमुळे ते रद्द करावे लागले. ]

**३०. कै. पटवर्धन आणि "विरहतरंग" :** श्री. बा. रानडे / श्री शिवाजी संदर्भ ग्रंथालय, नागपूर / २९ नोव्हेंबर १९७१.

**३१. माधव जूलियन :** मो. शा. शहाणे / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७२ / अध्यक्ष, आचार्य स. ज. भागवत.

**३२. माधवराव पटवर्धनांच्या जीवनातील गाजलेले वरदा-प्रकरण :** डॉ. द. न. गोखले / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७३.

[ १९७१ साली व्हावयाचे ठरलेले, पण आयत्या वेळी प्रकाशबंदी जाहीर झाल्याने तेव्हा न झालेले व्याख्यान. ]

**३३. माधव जूलियन : वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व :** माधव मनोहर / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७४.

**३४. माधव जूलियन : एक रोमँटिक :** डॉ. द. न. गोखले / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / ५ एप्रिल १९७५.

**३५. मराठीतील काव्यानंदचर्चेचा मूलस्रोत :** प्रा. पंडित वैंकटेशशास्त्री जोशी / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७५.

**३६. काव्यवाचन :** महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७६.
पुण्यातील महाविद्यालयातील कवि-कवयित्रींचे आपल्या कवितांचे वाचन. प्रमुख पाहुणे श्री. ना. धों. महानोर.

**३७. सावरकर आणि पटवर्धन :** डॉ. म. वि. गोखले / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७७ / अध्यक्ष : प्रा. स. शि. भावे.

**३८. "डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन" :** [ डॉ. द. न. गोखले यांच्या चरित्र-ग्रंथावर चर्चा. ] महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७८. सहभागी : मो. रा. वाळंबे, गोपीनाथ तळवलकर, अनुराधा पोतदार, प्र. न. जोशी, स. शि. भावे. चर्चेच्या अनुरोधाने डॉ. द. न. गोखले यांचे उत्तर.

३९. **काव्यवाचन** : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९७९.
पुण्यातील वीस नवोदित कवींचे काव्यवाचन. प्रमुख पाहुणे डॉ. वसंत सावंत.

४०. **कविसंमेलन** : महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९८०.

४१. **साहित्यास्वादाच्या काही दिशा** : प्रा. कृ. य. निकुम्ब / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / नोव्हेंबर १९८१ / अध्यक्ष, वि. म. कुलकर्णी.

४२. **"विरहतरंग"** : प्रा. शंकर वैद्य / आलोचना प्रस्थान आयोजित ग्रंथ-परिशीलन व्याख्यानमाला; मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई / ७ जानेवारी १९८२.

४३. **माधव जूलियन यांची खंडकाव्ये** : प्रा. शंकर वैद्य / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९८२ / अध्यक्ष, गोपीनाथ तळवलकर.

४४. **नवोदितांचे कवि संमेलन** : संचालन : राजा दीक्षित / महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे / २९ नोव्हेंबर १९८३.

## २. पटवर्धन यांच्यावरील काही कविता

[ कालानुक्रमाने ]

१. **झुलिया-यादव** : पद्मपाणी, एम्. ए. / मौज, दिवाळी अंक १९२४
स्वप्नभूमि", पृ.२८५-२८६वर या काव्याचा परिचय. [फर्गसन महाविद्यालयातील कारकून जोशी यांच्या मुलाने ही कविता लिहिल्याची कानेटकरांची माहिती.] पटवर्धनांवर विडंबनात्मक काव्य.

२. **"सुधारक" काव्य वाचून** : श्री. अब्दुल रहिमान / वागीश्वरी, फाल्गुन श. १८५१, व. १ अं. ६.
पटवर्धनांविषयी आदरभावनेतून "सुधारका"च्या थाटावर दहा कडव्यांची कविता.

३. **प्रेम होईना तुझ्याने** : सीता प्रभु, मुंबई / महिला, ऑक्टोबर १९३३, व. १ अं. ४.
'प्रेम होईना तुझ्याने' या पटवर्धनांच्या गज्जलाला प्रियेचे उत्तर. ८ द्विपद्या. "प्रेम होईना तुझ्याने", ही तुझी फिर्याद खोटी.'

४. **माधव जूलियन यांस** : सौ. विमला भावे / संजीवनी, १२ जुलै १९३४.

५. **मराठीचा मोहरा** : के ग.उमराणी / वाङ्मयशोभा, जानेवारी १९४०/ओवीबद्ध.

६. **अश्रुमाला** : गोपीनाथ / वाङ्मयशोभा, जानेवारी १९४० / रुबाई.

७. **माधवराव पटवर्धन** : बा.सी.मर्ढेकर / सह्याद्रि, जानेवारी १९४०. [समाविष्ट, "मर्ढेकरांची कविता"].

८. मराठीचा विलाप : विंदा करंदीकर / २९ जानेवारी १९४०. [ समाविष्ट, " स्वेदगंगा ", आ. २, पृ. १७१-१७२ ].

पटवर्धनांच्या निधनावर शोककाव्य.

९. मित्रा, हुतात्म्या कवे ! : यशवंत / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४०/पृ.५०६.

१०. " स्वच्छंदमाणिक्य " (श्लोक) : पु. म. लाड / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४० / पृ. ६२९–३०.

११. स्वर्गस्थ माधवरावांस ! : विष्णु गर्दे / लोकशिक्षण, फेब्रुवारी–मार्च १९४०/ पृ. ६६६-६६७.

१२. माधव जूलियन : गो. रा. दोडके / ज्योत्स्ना, मे १९४०.

१३. प्रिय सुहृद्, माधवराव पटवर्धन यांस ( सुनीत ) : गिरीश / सांगली, २९ सप्टेंबर १९४१. [ समाविष्ट, " मानसमेघ ", क्र. ३८; १९४३. ]

१४. ' कवि माधव ज्यूलियन ' : यशवंत/सातारा, ३ डिसेंबर १९४३. [ समाविष्ट, " यशोगिरी ", पृ. ६९. ]

१५. अर्घ्य ( ' कै. माधवराव पटवर्धन यांच्या स्मृतीस ' ) : बा. रा. कान्त / प्रतिभा ( औरंगाबाद ), डिसेंबर १९४७. [ समाविष्ट, " वेलांटी " ]

१६. निजे इथे झुंजार : वसंतराव चिंधडे / प्रतिभा (औरंगाबाद), डिसेंबर १९४७.

१७. माधवा : राजस / प्रतिभा ( औरंगाबाद ), डिसेंबर १९४७.

१८. कै. माधव जूलियन यांस ( सुनीत ) : मनोहर शिरवाडकर / प्रतिभा ( औरंगाबाद ) / डिसेंबर १९४७.

१९. माधव जूलियन ( कणिका ) : गोविंद झोकरकर / प्रतिभा ( औरंगाबाद ), डिसेंबर १९४७.

२०. कै. माधव जूलियन यांस : वसंत अ. काळेले / प्रतिभा ( औरंगाबाद ) / डिसेंबर १९४७.

२१. निवांत ( सुनीत ) : गिरीश / १९५१. [ समाविष्ट, " चंद्रलेखा " ].

२२. वंचित सत्कवीस : मो. शा. शहाणे, वॉशिंग्टन / साप्ताहिक तरुण भारत ( नागपूर ), रविवार, २९ नोव्हेंबर १९५९.

२३. माधव जूलियन : पंडित आवळीकर. [ समाविष्ट, " प्रेयसी ", १९५८. ]

% %

## प रि शि ष्ट

### माधव जूलियन यांच्या काही ध्वनिमुद्रित कविता, भाषणे

| कविता | गायक / गायिका |
| --- | --- |
| १. ऐकव तव मधुबोल | गोविंदराव जोशी ( एच. एम. व्ही. ) |
| २. चल उडुनि पाखरा | ललिता देऊळकर ( सौ. ललिता फडके ) |
| ३. जीव तुझा लोभला | गजानन वाटवे |
| ४. तुजवीण सखे, मज कोणि नसे | बाई आझमबाई, रुबी रेकॉर्ड्स्, |
| ५. प्रेम होईना तुझ्याने | एस. बी. २२०८ |
| ६. तेथे चल राणी | बाळकृष्ण दाभाडे ( औंध ) |
| ७. दूर तुझ्याबीण जीव | बाई आझमबाई, रुबी रेकॉर्डस्, |
| ८. वेड आधी सांग कोणी | एस. बी. २१५१, २१५२. |
| ९. प्याला भरला तुझ्याचसाठी | बाई आझमबाई |
| १०. प्रेमस्वरूप आई | ( १ ) "माझं बाळ" चित्रपटातील शशी हा गज्जल गाते. [ 'खांडेकरांची पाठशुद्ध गीते', एस्. एस्. भोसले, 'समाज प्रबोधन पत्रिका', जुलै-ऑगस्ट १९७९, पृ. २७० ] |
| | ( २ ) मिस् सुशीला गोडबोले, ट्विन, ओ एम् एल् ११७१·१. |
| | ( ३ ) लता मंगेशकर |
| ११ प्रेम कोणीही करीना | गोविंदराव जोशी (एच.एम.व्ही). १९३२ |
| १२. मराठी असे आमुची मायबोली | ज्योत्स्ना भोळे |
| १३. संगमोत्सुक डोह | गोविंदराव जोशी ( एच. एम. व्ही. ) एचटी १३ |

| कविता | गायक / गायिका |
|---|---|
| १४. सतेज काळे टपोरे डोळे | बाई आझमबाई, ओडियन |
| १५. हे काय असे होई | ( १ ) बाई आझमबाई<br>( २ ) ज्योत्स्ना भोळे |
| १६. (१) यशवंतांची कविता (भाषण) | माधवराव पटवर्धन |
| (२) मराठी असे आमुची मायबोली | जी. एन. जोशी |
| १७. (१) यशवंतांची कविता (भाषण) | माधवराव पटवर्धन |
| (२) माधवराव पटवर्धन स्मृति-सुमनांजलि (भाषण) | बि. द. घाटे |

श्री. प्रभाकर दातार यांच्या संग्रहात माधव जूलियन यांनी स्वतःच्या म्हटलेल्या कविता आहेत. [ ' दुर्मिळ स्वरानंद देणारे प्रभाकर दातार ', 'प्रभाकर जठार, रविवारची लोकसत्ता / ३० जुलै १९७९. ]

%%

# ले ख क - नि र्दे शि का



पटवर्धनविषयक वाङ्मयाच्या [ विभाग २ ] लेखांची ही निर्देशिका आहे. निर्देशिकेत लेखनिर्देश करताना प्रथम लेखकाचे नाव, आणि त्याच्यापुढे "माधवराव पटवर्धनविषयक वाङ्मय–सूची" तील लेखाचा अनुक्रम नोंदविला आहे. निर्देशातील पहिले अक्षर हे त्या लेखाच्या उपविभागाचे दर्शक आहे. नंतर येणारा अंक हा त्या उपविभागातील पोटविभागाचा दर्शक आहे, आणि त्यानंतर येणारा अंक हा त्या पोटविभागातील त्या लेखाच्या अनुक्रमाचा दर्शक आहे. उदाहरणार्थ, 'जोग रा. श्री. क. २.६२' म्हणजे, रा. श्री. जोग यांचा 'लेख' या उपविभागांतील [ क ] 'व्यक्ती आणि वाङ्मय' या पोटविभागातील [ २ ] 'कविवर्य माधव जूलियन' हा लेख [ क्र. ६२ ] अनुक्रमणिकेवरून उपविभाग, पोटविभाग चटकन लक्षात येतील. [ अ = ग्रंथ; ब = नियतकालिकांचे विशेषांक; क = लेख; ड = इतर. ]

१. ज्या लेखांच्या लेखकाचे नाव निर्दिष्ट नाही, अशा सर्व लेखांची नोंद 'अनाम' या नोंदीपुढे एकत्र संकलित केली आहे.

* *

"डॉ. माधवराव पटवर्धन : वाङ्मयदर्शन" या डॉ. सु. रा. चुनेकरांच्या ग्रंथाला प्रस्तुत "डॉ. माधवराव पटवर्धन : वाङ्मय–सूची" हा सूचिग्रंथ पूरक आहे.

डॉ. माधवराव पटवर्धन ( माधव जूलियन ) हे आधुनिक मराठी साहित्यातील एक प्रमुख नि महत्त्वाचे साहित्यिक. त्यांचे जीवन व व्यक्तिमत्त्व जसे वादळी, तसेच त्यांचे सर्वच साहित्य विवाद्य व बहुचर्चित. त्यांच्या समग्र वाङ्मयाचे आणि त्यांच्यावरील वाङ्मयाचे अतिशय थोडक्यात, नेमकेपणाने नि मार्मिकपणाने दर्शन या वाङ्मय-सूचीत घडते – नितळ, स्वच्छ सरोवराने समग्र आकाश पेलावे तसे.

एका अर्थाने ही सूची म्हणजे 'अक्षर न् अक्षर माधवराव' आहे. या सूचीला संशोधनात्मक नि समीक्षात्मक असे दुहेरी मोल आहे. ती केवळ डॉ. पटवर्धनांच्याच अभ्यासाला उपयुक्त आहे असे नाही, मराठी समीक्षेच्या विकासाच्या अभ्यासालाही ती महत्त्वाचे साधन ठरेल.

डॉ. सु. रा. चुनेकर हे डॉ. माधवराव पटवर्धनांचे निदिध्यासी अभ्यासक म्हणून मान्य झालेले आहेत. डॉ. माधवराव पटवर्धनांवरील वेगवेगळ्या स्वरूपाचे त्यांचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. पीएच्.डी. पदवीच्या अभ्यासाच्या निमित्ताने १९५८ पासून ते डॉ. पटवर्धनांच्या अभ्यासात रमलेले नि गढलेले आहेत. त्यांच्या पटवर्धनांच्या अभ्यासाचे हे रौप्यमहोत्सवी वर्ष. या वर्षात त्यांच्या अभ्यासाचे आणखी एक अभिनव फलित या सूचीच्या स्वरूपाने प्रकाशित होत आहे.

मराठी सूचि-वाङ्मयाला या सूचीने नवी दिशा प्राप्त होत आहे.

---

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ
मुंबई